**माझी वसुंधरा अभियान-६.०**
**राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक मावअ २०२४/ प्र.क्र. २४/ तां.क.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२
**दिनांक : १३ जून, २०२५**

**वाचा** : (१) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक अभियान-२०२०/ प्र. क्र.१३४/ तां.क.१, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२०
(२) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक अभियान-२०२१/ प्र. क्र.१६/ तां.क.१, दिनांक २१ जानेवारी, २०२१
(३) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक मावआ-२०२१/ प्र. क्र.७५/ तां.क.१, दिनांक २२ डिसेंबर, २०२१
(४) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक मावआ-२०२२/ प्र. क्र.१०८/ तां.क.१, दिनांक ०७ नोव्हेंबर, २०२२
(५) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक मावआ-२०२३/ प्र. क्र.८३/ तां.क.१, दिनांक २७ सप्टेंबर, २०२३
(६) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक मावआ-२०२४/ प्र. क्र.२४/ तां.क.१, दिनांक ०४ सप्टेंबर, २०२४

**प्रस्तावना:**

पर्यावरणातील वातावरणीय बदलाचे महत्व लक्षात घेता, पर्यावरण विभागाचा **"पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग"** असा नामबदल करण्यात आला आहे. निसर्गाशी असलेली कटिबद्धता निश्चित करण्यासाठी पृथ्वी, वायू, जल, अग्नी, आणि आकाश या निसर्गाशी संबंधित पंचतत्वावर पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग कार्य करीत आहे.

२. पर्यावरणाचे जतन, संवर्धन व संरक्षण करण्यासाठी **"माझी वसुंधरा (माय अर्थ)"** हा अभिनव उपक्रम विभागाने हाती घेतला आहे. जो निसर्गाच्या **"पंचमहाभूतां"** पाचही घटकांवर लक्ष केंद्रित करतो. त्यात भूमी (जमीन), जल (पाणी), वायू (हवा), अग्नी (ऊर्जा), आकाश (जनजागृती) यांचा समावेश आहे. या उपक्रमातून वातावरणीय बदल आणि पर्यावरणाच्या समस्यांबद्दल नागरिकांना जागरूक करून पर्यावरणाच्या सुधारणेप्रती प्रयत्न करण्यात येतात.

३. **माझी वसुंधरा अभियान:**

३.१ पृथ्वी, वायू, जल, अग्नी, आणि आकाश या निसर्गाशी संबंधित पंचतत्वांवर आधारित **"माझी वसुंधरा अभियान"** राज्यामध्ये दिनांक २ ऑक्टोबर, २०२० पासून राबविण्यात येत आहे. या अभियानांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्था व ग्राम पंचायती या स्थानिक संस्थां मार्फत पर्यावरणाचे संरक्षण व संवर्धन करणाऱ्या योजना प्रभावीपणे व मिशन मोड पध्दतीने राबविण्यासाठी दरवर्षी स्पर्धा घेण्यात येते.

३.२ निसर्गाच्या पंचतत्वावर आधारित पर्यावरणाचे संरक्षण व संवर्धन करणाऱ्या विविध शासकीय योजना / कार्यक्रम / उपाय योजना एकत्रित करून त्या प्रभावीपणे व मिशन मोड पध्दतीने राबविण्यासाठी इंडिकेटर स्वरूपात असलेली टुलकिट तयार करून स्थानिक स्वराज्य संस्थांना दिली जाते. ज्यामध्ये त्यांनी केलेल्या कामाचे मुल्यमापन करण्यासाठी गुण ठेवण्यात येतात. या टूलकिटनुसार विविध उपाययोजना स्थानिक संस्थांमध्ये एप्रिल ते मार्च या एक वर्षाच्या कालावधीत राबवावयाच्या आहेत.

३.३ माझी वसुंधरा अभियानात सहभागी सर्व स्थानिक संस्थांनी एप्रिल ते मार्च या कालावधीत माझी वसुंधरा अभियानांतर्गत केलेल्या कामाची माहिती एम.आय.एस. स्वरूपात माझी वसुंधरा अभियानाच्या वेब पोर्टलवर भरावयाची आहे. त्यानंतर, स्थानिक संस्थांनी भरलेल्या एम.आय.एस. चे डेस्कटॉप मुल्यमापन त्रयस्त यंत्रणेमार्फत करण्यात येते.

३.४ डेस्कटॉप मुल्यमापनात गुणानुक्रमे उच्चत्तम कामगिरी करणाऱ्या स्थानिक संस्थांचे क्षेत्रीय मुल्यमापन त्रयस्त यंत्रणे मार्फत संबंधित स्थानिक संस्थेमध्ये प्रत्यक्ष भेट देवून करण्यात येते.

३.५ डेस्कटॉप मुल्यमापन व क्षेत्रीय मुल्यमापन यामध्ये प्राप्त होणाऱ्या एकूण गुणांच्या आधारे उच्चत्तम कामगिरी करणाऱ्या स्थानिक संस्थांची विजेते म्हणून निवड करून या स्थानिक संस्थांचा सन्मान जागतीक पर्यावरण दिनी म्हणजे दिनांक ५ जून रोजी करण्यात येतो.

## ४. माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० व ५.० ची अंमलबजावणी:

**४.१ माझी वसुंधरा अभियान १.०** या अभियानाच्या पहिल्या वर्षात (२०२०-२१) राज्यामधील ६८६ स्थानिक स्वराज्य संस्थांनी (अमृत शहरे ४३ , नगरपरिषदा २२२, नगरपंचायती १३० व ग्रामपंचायती २९१) सहभाग घेतला होता. माझी वसुंधरा अभियान १.० मध्ये (१) अमृत, (२) नगर परिषद, (३) नगर पंचायत, (४) ग्राम पंचायत असे ०४ गट ठेवण्यात आले होते. या अभियानात निसर्गाशी संबंधित पंचतत्वांवर स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या कामांचे मुल्यमापन करण्यासाठी १,५०० गुण ठेवण्यात आले होते. या अभियानाचा कालावधी २ ऑक्टोबर, २०२० ते दिनांक ३१ मार्च २०२१ असा होता. या अभियानात सर्वोत्तम कामगिरी करणाऱ्या विजेत्यांचा सन्मान दिनांक ५ जून, २०२१ रोजी माझी वसुंधरा अभियान ऑनलाईन सन्मान सोहळ्यात करण्यात आला.

**४.२ माझी वसुंधरा अभियान २.०** मध्ये माझी वसुंधरा १.० पेक्षा ५ पट जास्त म्हणजेच एकूण ११,९६८ (४०६ नागरी, ११,५६२ ग्राम पंचायती) एवढ्या स्थानिक स्वराज्य संस्थांनी नोंदणी करून सहभाग घेतला होता. माझी वसुंधरा अभियान २.० मध्ये (१) अमृत, (२) नगर परिषद, (३) नगर पंचायत, (४) ग्राम पंचायत ०१ व (५) ग्राम पंचायत ०२ असे ०५ गट ठेवण्यात आले होते. या अभियानात निसर्गाशी संबंधित पंचतत्वांवर स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या कामांचे मुल्यमापन करण्यासाठी, अमृत गट- ६,००० तर अमृत गट वगळून इतर गटासाठी ५,५०० गुण ठेवण्यात आले होते. हे अभियान दिनांक १६ एप्रिल २०२१ पासून ३१ मार्च २०२२ या कालावधी मध्ये राबविण्यात आले होते. या अभियानात विजेत्यांचा सन्मान दिनांक ५ जून, २०२२ रोजी आयोजित माझी वसुंधरा अभियान सन्मान सोहळ्यात करण्यात आला.

४.३ **माझी वसुंधरा अभियान ३.०** मध्ये एकूण १६,८२४ (माझी वसुंधरा २.० पेक्षा ४,८५६ ने अधिक) (४११ नागरी, १६,४१३ ग्राम पंचायती) स्थानिक स्वराज्य संस्थांनी सहभाग घेतला होता. माझी वसुंधरा अभियान ३.० मध्ये मोठया प्रमाणात स्थानिक संस्थांनी सहभाग घेतल्याने लोकसंखेच्या प्रमाणात एकूण ११ गट करण्यात आले होते. या अभियानात निसर्गाशी संबंधित पंचतत्वांवर स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या कामांचे मुल्यमापन करण्यासाठी] अमृत गट- ७,६०० तर, अमृत गट वगळून इतर गटासाठी ७,५०० गुण ठेवण्यात आले होते. माझी वसुंधरा अभियान ३.० चा कालावधी १ एप्रिल २०२२ ते ३१ मार्च २०२३ पर्यंत होता. या अभियानात विजेत्यांचा सन्मान दिनांक ५ जून, २०२३ रोजी आयोजित माझी वसुंधरा अभियान सन्मान सोहळ्यात करण्यात आला.

४.४ **माझी वसुंधरा अभियान ४.०** मध्ये एकूण २२,६३२ (माझी वसुंधरा ३.० पेक्षा ५८०८ ने अधिक) (४१४ नागरी, २२,२१८ ग्राम पंचायती) स्थानिक स्वराज्य संस्थांनी सहभाग घेतला होता. माझी वसुंधरा अभियान ४.० मध्ये मोठया प्रमाणात स्थानिक संस्थांनी सहभाग घेतल्याने लोकसंखेच्या प्रमाणात एकूण १२ गट करण्यात आले होते. या अभियानात निसर्गाशी संबंधित पंचतत्वांवर स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या कामांचे मुल्यमापन करण्यासाठी, अमृत गट-८,३०० , अमृत गट वगळून इतर नागरी संस्थांसाठी ८,१०० तर, ग्राम पंचायतींसाठी ८,२०० गुण ठेवण्यात आले होते. माझी वसुंधरा अभियान ४.० चा कालावधी १ एप्रिल २०२३ ते ३१ मार्च २०२४ असा होता. परंतु, लोकसभेच्या सार्वत्रिक निवडणूकीमुळे हा कालावधी दिनांक ३१ मे, २०२४ पर्यंत वाढविण्यात आला होता. माझी वसुंधरा अभियान ४.० चा निकाल दिनांक २७ सप्टेंबर २०२४ रोजी जाहिर करण्यात आला आहे.

४.५ **माझी वसुंधरा अभियान ५.०** मध्ये राज्यातील सर्व म्हणजे एकूण २८,३१७ (४२२ नागरी, २७,८९५ ग्राम पंचायती) स्थानिक स्वराज्य संस्थांनी सहभाग घेतला होता. माझी वसुंधरा अभियान ५.० मध्ये मोठया प्रमाणात स्थानिक संस्थांनी सहभाग घेतल्याने लोकसंख्येच्या प्रमाणात एकूण १४ गट करण्यात आले होते. या अभियानात निसर्गाशी संबंधित पंचतत्वांवर स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या कामांचे मुल्यमापन करण्यासाठी, अमृत गट- १५,४००, अमृत गट वगळून इतर नागरी संस्थांसाठी १४,९०० तर, ग्राम पंचायतींसाठी १४,००० गुण ठेवण्यात आले होते. माझी वसुंधरा अभियान ५.० चा कालावधी १ जून, २०२४ ते ३१ मार्च २०२५ असा होता. स्थानिक स्वराज्य संस्थांनी या कालावधीत केलेल्या कामाचे डेस्कटॉप मुल्यमापन व फिल्ड मुल्यमापन करण्याची कार्यवाही सुरू आहे.

५. माझी वसुंधरा अभियानांतर्गत स्थानिक संस्थांनी पर्यावरणाचे संरक्षण व संवर्धन करणाऱ्या विविध योजनांची मागील वर्षांमधील प्रभावीपणे अंमलबजावणी केल्यामुळे झालेली फलनिष्पती विचारात घेवून स्थानिक स्वराज्य संस्थांच्या काही प्रतिनिधीशी व या क्षेत्रात काम करणाऱ्या काही स्वयंसेवी संस्थांशी चर्चा करून **“माझी वसुंधरा अभियान ६.०” ची प्रारूप टूलकिट** तयार करण्यात आली आहे. सदर प्रारूप टूलकिटचे विमोचन मा. मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल महोदयांच्या हस्ते **“जागतिक पर्यावरण दिनी”** दिनांक ५ जून, २०२५ रोजी करण्यात आले आहे. त्यानुसार, माझी वसुंधरा अभियान

६.० हे राज्यामधील स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून, पृथ्वी, वायू, जल, अग्नी, आणि आकाश या सर्वांशी संबंधित पंचतत्वांवर आधारित **"माझी वसुंधरा अभियान ६.०"** हे राज्यातील माझी वसुंधरा अभियानांतर्गत नोंदणी केलेल्या सर्व म्हणजे २८,३१७ स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये (नागरी स्थानिक स्वराज्य संस्था ४२२ व ग्राम पंचायती- २७,८९५) राबविण्यास शासन मान्यता देत आहे.

२. तसेच, **"माझी वसुंधरा अभियान ६.०"** करिता स्थानिक स्वराज्य संस्थांचे लोकसंख्या निहाय खालील प्रमाणे गट करून त्यानुसार स्पर्धेची अंमलबजावणी करण्यासही शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | लोकसंख्या निहाय गट | | समाविष्ट स्थानिक संस्थांची संख्या |
|---|---|---|---|
| **(अ)** | **नागरी स्थानिक स्वराज्य संस्था : ४२२** | | |
| (०१) | **अमृत शहरे (४३)** | **१० लक्ष पेक्षा अधिक लोकसंख्या** | **१०** |
| (०२) | | **३ लक्ष पेक्षा अधिक परंतु १० लक्ष पेक्षा कमी लोकसंख्या** | **१७** |
| (०३) | | **१ लक्ष पेक्षा अक्षिक परंतु ३ लक्ष पेक्षा कमी लोकसंख्या** | **१६** |
| (०४) | **नगरपरिषद व नगर पंचायत (३७५)** | **४० हजार पेक्षा अधिक परंतु १ लक्ष पेक्षा कमी लोकसंख्या** | **७७** |
| (०५) | | **२५ हजार पेक्षा अधिक परंतु ४० हजार पेक्षा कमी लोकसंख्या** | **८८** |
| (०६) | | **१५ हजार पेक्षा अधिक परंतु २५ हजार पेक्षा कमी लोकसंख्या** | **१०१** |
| (०७) | | **१५ हजार पेक्षा कमी लोकसंख्या** | **११३** |
| **(ब)** | **ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्था : २७,८९५** | | |
| (०८) | **ग्राम पंचायती** | **१० हजार पेक्षा अधिक लोकसंख्या** | **३३६** |
| (०९) | | **५ हजार पेक्षा अधिक व १० हजार पेक्षा कमी लोकसंख्या** | **१,३८३** |
| (१०) | | **३ हजार पेक्षा अधिक व ५ हजार पेक्षा कमी लोकसंख्या** | **३,२३१** |
| (११) | | **२ हजार पेक्षा अधिक व ३ हजार पेक्षा कमी लोकसंख्या** | **५,२१३** |
| (१२) | | **१.५ हजार पेक्षा जास्त व २ हजार पेक्षा कमी लोकसंख्या** | **४,९००** |
| (१३) | | **१ हजार पेक्षा जास्त व १.५ हजार पेक्षा कमी लोकसंख्या** | **६,८१३** |
| (१४) | | **१ हजार पेक्षा कमी लोकसंख्या** | **६,०१९** |

३. माझी वसुंधरा अभियान ६.० अंतर्गत स्थानिक स्वराज्य संस्थांनी पृथ्वी, वायू, जल, अग्नी, आणि आकाश या निसर्गाशी संबंधित पंचतत्वांवर केलेल्या कामांचे मुल्यमापन करण्यासाठी विविध इंडिकेटर असलेली प्रारूप टूलकिट (नागरी व ग्रामीण साठी स्वतंत्र) स्थानिक स्वराज्य संस्थांच्या काही प्रतिनिधीशी व या क्षेत्रात काम करणाऱ्या काही स्वयंसेवी संस्थांशी चर्चा करून तयार करण्यात आली असून, सदर **नागरी व ग्रामीण** स्थानिक स्वराज्य संस्थांसाठीची प्रारूप टुलकिट अनुक्रमे ***<u>परिशिष्ट-१ व परिशिष्ट-२</u>* म्हणून या शासन निर्णया सोबत जोडली आहे.** या प्रारूप टूलकिट मध्ये गुणांचे सविस्तर वितरण व मुल्यांकन या बाबतची कार्यपध्दती दर्शविली आहे.

४. सदर प्रारूप टूलकिटच्या अनुषंगाने काही सूचना / अभिप्राय असल्यास त्या **दिनांक १५ जुलै, २०२५ पर्यंत** पाठविण्यात याव्यात. प्राप्त होणाऱ्या सूचनांचा विचार करून प्रारूप टूलकिट अंतीम करण्यात येईल.

५. माझी वसुंधरा अभियान ६.० च्या प्रारूप टूलकिट नुसार, स्थानिक स्वराज्य संस्थांनी पृथ्वी, वायू, जल, अग्नी, आणि आकाश या निसर्गाशी संबंधित पंचतत्वांवर केलेल्या कामांचे मुल्यमापन करण्यासाठी खाली दिलेल्या विगतवारीनुसार **अमृत गटासाठी १५,१२५ व अमृत गट वगळून इतर नागरी संस्थांच्या गटांसाठी १४,६२५ तर ग्राम पंचायतींसाठी १३,६२५** गुण ठेवण्यात आले आहेत.

| **विषय / गुण** | **भूमी / Earth** | **वायू / Air** | **जल / water** | **अग्नी / Energy** | **आकाश / Enhancement** | **Early Bird*** |
|---|---|---|---|---|---|---|
| नागरी स्थानिक संस्था (अमृत) (१५,१२५) | ४,३७५ | ३,८२५ | १,७२५ | १,७०० | ३,३०० | २०० |
| नागरी स्थानिक संस्था (अमृत वगळून) (१४,६२५) | ४,३७५ | ३,३२५ | १,७२५ | १,७०० | ३,३०० | २०० |
| ग्राम पंचायती (१३,६२५) | ४,०७५ | २,५०० | १,७५० | १,८०० | ३,३०० | २०० |

६. माझी वसुंधरा अभियानांतर्गत नागरी व ग्रामीण स्थानिक संस्थांमध्ये राबवावयाच्या पंचतत्वांमधील उपरोक्त विविध इंडिकेटर अंतर्गत उपक्रमांचा विस्तृत तपशील व त्यासाठीच्या गुणांचे सविस्तर वितरण खालील तक्त्यात नमूद केले आहे. तर, मुल्यांकना बाबतची सविस्तर कार्यपध्दती प्रारूप टूलकिट मध्ये देण्यात आली आहे.

| **अ.क्र.** | **निर्देशक (अभियान काळातील कार्यवाहीसाठीच्या बाबी)** | **गुण** | |
|---|---|---|---|
| | | **नागरी** | **ग्रामीण** |
| **१** | **भूमी** | | |
| | **हरित आच्छादन आणि जैवाविविधता** | | |
| (१) | वृक्ष योजना : किमान ३३% हरित आच्छादन प्राप्त करण्यासाठीची योजना | २०० | -- |
| (२) | माझी वसुंधरा अभियाना दरम्यान लावलेली आणि जगलेली एकूण झाडे | १५०० | १५०० |
| (३) | नवीन हरित क्षेत्रांचा विकास व देखभाल | ३०० | ३०० |
| (४) | महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम, १९७५ ची अंमलबजावणी | १५० | |
| (५) | जिओ-टॅगिंगसह वृक्षगणना - तयारी आणि प्रकाशन | १२५ | १२५ |
| (६) | रोपवाटिकांची निर्मिती | १०० | १०० |
| (७) | लोकजैवविविधता नोंदवही (PBR) तयार करणे. | १५० | १५० |
| (८) | बीज संकलन केंद्र | १५० | १५० |
| (९) | वातावरण अनुकुल शेती | -- | २५० |
| | **हरित आच्छादन आणि जैवाविविधता-एकूण** | **२६७५** | **२५७५** |

| अ.क्र. | निर्देशक<br>(अभियान काळातील कार्यवाहीसाठीच्या बाबी) | गुण | |
|---|---|---|---|
| | | नागरी | ग्रामीण |
| | **घनकचरा व्यवस्थापन** | | |
| (१) | घनकचरा व्यवस्थापन: निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण आणि संकलन | २५० | २५० |
| (२) | ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया | ३५० | ३५० |
| (३) | सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया/विल्हेवाट | २५० | २०० |
| (४) | जुन्या साठलेल्या कचऱ्यावर (Legacy Waste) शास्त्रोक्त प्रक्रिया | १०० | १०० |
| (५) | प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल यूज प्लास्टिकवर (SUP) बंदी) | ३५० | ३०० |
| (६) | जैव-वैद्यकीय (बायो-मेडिकल) कचरा व्यवस्थापन | १०० | १०० |
| (७) | ई-कचरा व्यवस्थापन | १०० | १०० |
| (८) | स्वच्छतेचा दर्जा | २०० | १०० |
| | **घनकचरा व्यवस्थापन-एकूण** | **१७००** | **१५००** |
| | **भूमी-एकूण** | **४,३७५** | **४,०७५** |
| **२.** | **वायू** | | |
| (१) | वायु गुणवत्ता परिक्षण - पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEF&CC) किंवा NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेद्वारे | ६०० | २०० |
| | **वायू प्रदूषण कमी करणे** | | |
| (२) | फटाक्यांवर बंदी घालण्याकरिता पुढाकार | १७५ | १७५ |
| (३) | नागरिकांमध्ये चांगल्या सवयींना प्रोत्साहन- सायकलिंग ट्रॅकची निर्मिती आणि पादचारी मार्ग | १२५ | -- |
| (३) | कृषी कचरा व्यवस्थापन | -- | ३०० |
| (४) | बांधकाम व पाडकाम कचऱ्याचे व्यवस्थापन | ३०० | ३०० |
| (५) | गॅस कनेक्शन | -- | २०० |
| | **इलेक्ट्रिक वाहन धोरणाची प्रभावी अंमलबजावणी** | | |
| (६) | इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरण : इलेक्ट्रिक वाहनांची संख्या | १००० | ५०० |
| (७) | इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्टेशनची संख्या | ६०० | ३०० |
| (८) | ध्वनी प्रदूषण कमी करणे | १७५ | १७५ |

| अ.क्र. | निर्देशक<br>(अभियान काळातील कार्यवाहीसाठीच्या बाबी) | गुण | |
|---|---|---|---|
| | | नागरी | ग्रामीण |
| (९) | वातावरणीय बदल आणि आपत्ती व्यवस्थापनाची तयारी | ३५० | ३५० |
| (१०) | वातावरणीय कृती नियोजन (फक्त अमृत गटासाठी) | ५०० | - |
| | **वायू-एकूण अमृत गटासाठी** | **३,८२५** | |
| | **वायू-एकूण (अमृत गट वगळून इतर गटांसाठी)** | **३,३२५** | **२,५००** |
| **३.** | **जल** | | |
| (१) | जल संसाधन संवर्धन आणि पुनरुज्जीवन | ३०० | ४०० |
| | **जल संवर्धन** | | |
| (२) | सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग) | २५० | २०० |
| (३) | भूजल पूनर्भरण | २२५ | २५० |
| | पाण्याचे नुकसान मोजणे आणि गुणवत्तेचे निरिक्षण करणे | | |
| (४) | जल लेखापरीक्षण | ३०० | १५० |
| (५) | जल गुणवत्ता निरीक्षण | १०० | - |
| (६) | पाणी पुरवठा यंत्रणेतील पाण्याचे मोजमाप | १०० | १०० |
| (७) | सांडपाणी प्रक्रिया व प्रक्रिया करण्यात आलेल्या पाण्याचा पुनर्वापर | १५० | -- |
| (८ ) | पाणीपुरवठा सांडपण्याचे नियोजन | - | २५० |
| (९) | शाश्वत सणांचा प्रचार | २०० | २०० |
| (१०) | जलचर परिसंस्थेचे संवर्धन | १०० | १०० |
| (११) | पंचायत प्रगती निर्देशांक | - | १०० |
| | **जल-एकूण** | **१,७२५** | **१,७५०** |
| **४.** | **अग्नी** | | |
| (१) | नुतनीकरणयोग्य ऊर्जा स्त्रोत आणि निव्वळ शून्य कार्बन उसर्जनाबाबत प्रसार व प्रचार | ४०० | ४०० |
| | **कार्बन उत्सर्जन कमी असलेल्या उर्जा स्त्रोतांचा अवलंब** | | |
| (२) | हरित पथदिवे | २०० | २०० |
| (३) | सार्वजनिक आणि खाजगी इमारतीवर सौर उर्जा प्रकल्प बसविणे | ५०० | ५०० |
| (४) | हरीत इमारती | ३०० | -- |
| (४) | अक्षय ऊर्जेचे स्त्रोत म्हणून बायोगॅस संयंत्रे | -- | ३०० |
| (५) | सार्वजनिक इमारतींचे ऊर्जा लेखापरीक्षण | २०० | -- |

| अ.क्र. | निर्देशक (अभियान काळातील कार्यवाहीसाठीच्या बाबी) | गुण | |
|---|---|---|---|
| | | नागरी | ग्रामीण |
| (५) | सोलार (सौर) पंप | -- | २०० |
| (६) | नैसर्गिक उर्जा कार्यक्षम इमारत रचना (Passive Building Design) | १०० | - |
| (७) | विकेंद्रिय सौर उर्जा संयंत्रे | - | २०० |
| | **अग्नी-एकूण** | **१,७००** | **१,८००** |
| **५.** | **आकाश** | | |
| | **सुधारणा** | | |
| (१) | ई-प्लेज (#Epledge) नोंदणी आणि पूर्तता | ६०० | ६०० |
| (२) | सोशल मिडियाचा वापर करून माझी वसुंधरा अभियानाची जनजागृती करणे | ४०० | ४०० |
| (३) | स्पर्धा आणि जनजागृती उपक्रमांद्वारे माझी वसुंधरा अभियानाची जनजागृती करणे | ४०० | ४०० |
| (४) | तरुणांचा सहभाग आणि पर्यावरण दूतांची निवड | ३०० | ३०० |
| (५) | सार्वजनिक ठिकाणी माझी वसुंधरा तत्त्वे दर्शवणाऱ्या बाबींच्या माध्यमातून प्रचार आणि प्रसिध्दी | ८०० | ८०० |
| (६) | बचत गटांचा सहभाग | १०० | १०० |
| (७) | पर्यायी निधी मिळवण्याचे मार्ग : सीएसआर, सामुदायिक सहभाग व इतर | २०० | २०० |
| (८) | निसर्ग पर्यटन | १०० | १०० |
| | **शिक्षण** | | |
| (९) | पर्यावरण सेवा योजनेत शाळांचा सहभाग | २०० | २०० |
| (१०) | महाराष्ट्र युथ फॉर क्लायमेट ॲक्शन (MYCA) उपक्रमाद्वारे हवामान बादलाबाबत तरुणांमध्ये जागरूकता | २०० | २०० |
| | **आकाश- एकूण** | **३,३००** | **३,३००** |
| **भूमी, वायू, जल, अग्नी, आकाश एकूण (अमृत गटाकरिता)** | | **१४,९२५** | |
| **भूमी, वायू, जल, अग्नी, आकाश एकूण (अमृत गट वगळता इतर नागरी स्थानिक संस्थांसाठी)** | | **१४,४२५** | |
| **भूमी, वायू, जल, अग्नी, आकाश एकूण ग्रामपंचायती करिता** | | | **१३,४२५** |
| दिनांक १ ते ५ एप्रिल, २०२६ या कालावधीत MIS सादर केल्यास अर्ली बर्डचे गुण | | **२००** | **२००** |

| अ.क्र. | निर्देशक (अभियान काळातील कार्यवाहीसाठीच्या बाबी) | गुण | |
|---|---|---|---|
| | | नागरी | ग्रामीण |
| **भूमी, वायू, जल, अग्नी, आकाश व अर्ली बर्ड मिळून एकूण (अमृत गटाकरिता)** | | **१५,१२५** | - |
| **भूमी, वायू, जल, अग्नी, आकाश व अर्ली बर्ड मिळून एकूण (अमृत गट वगळता इतर नागरी स्थानिक संस्थांसाठी)** | | **१४,६२५** | - |
| **भूमी, वायू, जल, अग्नी, आकाश व अर्ली बर्ड मिळून एकूण ग्रामपंचायती करिता** | | - | **१३,६२५** |

७. **स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये सदर अभियान प्रभावीपणे राबविण्याची जबाबदारी संबंधित आयुक्त, महानगरपालिका, मुख्याधिकारी, नगरपरिषद/ नगरपंचायत व ग्रामसेवक / ग्राम विकास अधिकारी, ग्रामपंचायत यांची राहील. तर, जिल्हयाच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे प्रमुख म्हणून संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी, जिल्हयाच्या ग्रामीण संस्थांचे प्रमुख म्हणून संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी व संबंधित महसूली विभागाचे प्रमुख म्हणून विभागीय आयुक्त यांनी त्यांचे विभागातील / जिल्हयातील स्थानिक संस्थांना प्रोत्साहन देवून त्यांच्याकडून सदर अभियानात उच्चत्तम कामगिरी करून घेण्याची जबाबदारी सोपविण्यात येत आहे**.

८. सदर अभियानाचा कालावधी दिनांक १ एप्रिल, २०२५ ते दिनांक ३१ मार्च, २०२६ असा राहिल. या अभियानांतर्गत स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या कामाचे डेस्कटॉप मुल्यमापन दिनांक ६ एप्रिल, २०२६ ते दिनांक ३० एप्रिल, २०२६ या कालावधीत करण्यात येईल व डेस्कटॉप मुल्यमापनात यशस्वी ठरलेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांचे फिल्ड मुल्यमापन दिनांक २ मे, २०२६ ते २५ मे, २०२६ या कालावधीत त्रयस्त यंत्रणांमार्फत करण्यात येईल व त्याचा निकाल जागतिक पर्यावरण दिनी म्हणजे दिनांक ५ जून, २०२६ रोजी जाहिर करून बक्षिस वितरण करण्याचे प्रस्तावित आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०६१३१३२२५६१४०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHAHEEN SHOUKAT JAMADAR

Digitally signed by SHAHEEN SHOUKAT JAMADAR
DN: CN = SHAHEEN SHOUKAT JAMADAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT
Date: 2025.06.13 13:25:29 +05'30'

**(शाहीन शौ. जमादार)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
२) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
४) मा. मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
५) मा. मंत्री, ग्राम विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

७) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग विभाग, मुंबई
९) प्रधान सचिव, (नवि-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
१२) विभागीय आयुक्त (सर्व)
१३) आयुक्त, तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
१४) जिल्हाधिकारी (सर्व)
१५) आयुक्त, सर्व महानगरपालिका
१६) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१८) राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) मुंबई
१९) सह आयुक्त / उप आयुक्त, नगरपालिका शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
२०) सह आयुक्त / उप आयुक्त, नगरपालिका शाखा, जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
२१) गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
२२) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायती (सर्व)
२३) ग्रामसेवक, ग्रामपंचायत (सर्व)
२४) निवडनस्ती,

महाराष्ट्र शासन

Majhi Vasundhara

पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग

# माझी वसुंधरा अभियान ६.०

## प्रारूप टूलकीट (नागरी) २०२५ - २०२६



परिशिष्ट-१

# अनुक्रमणिका

# माझी वसुंधरा अभियान

**महाराष्ट्र शासनाच्या पर्यावरण व वातावरणीय बदल विभागामार्फत** नागरी आणि ग्रामीण क्षेत्रांसाठी राबविण्यात येणारा अनोखा एकात्मिक असा उपक्रम आहे. यामध्ये नैसर्गिक परिसंस्थांचे जतन व संरक्षण करण्यासाठीच्या विविध उपायांची अंमलबजावणी करणे आणि वातावरणीय बदलाच्या अनुषंगाने राबविण्यात येणाऱ्या पर्यावरणपूरक कृती उपक्रमांवर नागरिकांच्या सहभागास प्रोत्साहित करणे, या बाबी समाविष्ट केल्या आहेत.

या अभियानाची रचना **कार्बन पृथक्करण, हरित वायूचे उत्सर्जन कमी करणे आणि नागरिकांमध्ये शाश्वत जीवनशैलीचा प्रचार करणे** या वातावरणीय बदलाच्या तीन महत्त्वाच्या बाबींवर लक्ष केंद्रित करण्यासाठी करण्यात आली आहे.

**अधिक माहितीसाठी भेट दया. :** *https://majhivasundhara.in*

# शाश्वत विकास उद्दिष्टे

- शाश्वत विकास उद्दिष्टे (SDGs), ज्यांना जागतिक उद्दिष्टे म्हणूनही ओळखले जाते, २०१५ मध्ये संयुक्त राष्ट्रांनी गरिबी समाप्त करण्यासाठी, आणि आपल्या पृथ्वीचे संरक्षण करण्यासाठी सार्वत्रिक आवाहन म्हणून स्वीकारले होते.
- ही उद्दिष्ट्ये जनसमुदायाच्या आणि पृथ्वीच्या शांतता आणि समृद्धीसाठी सामायिक योजना प्रदान करतात.
- ही १७ शाश्वत विकास उद्दिष्टे एकात्मिक आहेत म्हणजेच एका क्षेत्रातील कृतीचा इतर क्षेत्रांवर परिणाम होतो हे जाणून सर्वांगीण विकासाने सामाजिक, आर्थिक आणि पर्यावरणीय शाश्वततेचे संतुलन साधले पाहिजे.

## शाश्वत विकास उद्दिष्टे आणि माझी वसुंधरा अभियान

- माझी वसुंधरा अभियान संयुक्त राष्ट्रांच्या शाश्वत विकास उद्दिष्टांशी संरेखित आहे कारण दोन्ही सर्वांगीण सामाजिक विकासाला संबोधित करतात.
- माझी वसुंधरा अभियान निसर्गाच्या पाचही घटकांवर (पंचमहाभूते) लक्ष केंद्रित करते – भूमी, वायू, जल, अग्नी आणि आकाश.
- निसर्गाच्या पाच घटकांना संबोधित करून आणि नागरिकांच्या सहभागाला प्रोत्साहन देऊन, माझी वसुंधरा अभियान शाश्वत विकास उद्दिष्टे साध्य करण्यासाठी योगदान देते.



# वेळापत्रक -
## माझी वसुंधरा अभियान ६.०

१ एप्रिल –
१५ एप्रिल २०२६
**MIS सबमिशन**

६ एप्रिल –
२५ एप्रिल २०२६
**डेस्कटॉप मूल्यमापन**

१ एप्रिल २०२५ –
३१ मार्च २०२६
**अभियान कालावधी**

२ मे –
२० मे २०२६
**क्षेत्रीय तपासणी**

५ जून २०२६
**पुरस्कार वितरण**

# माहिती संकलन कार्यपद्धती

- माझी वसुंधरा अभियान ५.० मध्ये सहभागी झालेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांचा माझी वसुंधरा अभियान ६.० मध्ये थेट समावेश होईल.
- माझी वसुंधरा अभियान ५.० मध्ये सहभागी न झालेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांनी माझी वसुंधरा अभियान ६.० मध्ये सहभागी होण्यासाठी अभियानाच्या MIS पोर्टलवर नोंदणी करावी. अधिक माहितीसाठी https://abhiyanmis.majhivasundhara.in/ या संकेतस्थळाला भेट द्या.
- स्थानिक स्वराज्य संस्थांनी अभियान कालावधीत विविध उपक्रम राबवावेत आणि सदर उपक्रमांची माहिती MIS पोर्टलवर सादर करण्यासाठी आवश्यक तो सर्व तपशील तयार ठेवावा.
- स्थानिक स्वराज्य संस्थांनी टूलकिटमध्ये नमूद केल्याप्रमाणे MIS मध्ये त्यांची प्रगती आणि कामाचा अहवाल सादर करावा.
- माझी वसुंधरा अभियानाच्या MIS पोर्टलवर विहित स्वरूपात MIS सादर करावा.
- माझी वसुंधरा अभियान पोर्टलवरील माहिती अचूक, विश्वासार्ह आणि सत्य असल्याबाबतची जबाबदारी **स्थानिक स्वराज्य संस्थेच्या प्रशासकीय प्रमुखांची** असेल.

***टीप:*** *स्थानिक स्वराज्य संस्थांनी सर्व कागदपत्रांच्या मूळ प्रती जतन कराव्यात. अभियान संचालनालयात, संबंधित कागदपत्रे पुन्हा सादर करावे लागू शकतात.*

# महत्त्वाचे मुद्दे

- माझी वसुंधरा अभियान ६.० च्या कालावधीत म्हणजे, **दिनांक १ एप्रिल २०२५ ते दिनांक ३१ मार्च २०२६** या कालावधीत केलेल्या सर्व उपाययोजनांचा मूल्यमापनासाठी विचार केला जाईल.

- माझी वसुंधरा अभियान संचालनालयाने विहित केलेल्या नमुन्यामध्येच (फॉरमॅट/टेम्प्लेट्स) तपशील सादर करणे आवश्यक आहे. सदर नमुने MIS पोर्टलवर डाऊनलोड करण्यासाठी उपलब्ध असेल.

- कोणत्याही निर्देशकासाठी, जर सादर केलेले दस्तऐवज वैध/सुवाच्य नसतील आणि/किंवा गुगल लिंक्स अवैध असतील, तर त्यासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

- MIS वर नोंदवलेल्या माहितीच्या आधारे त्रयस्त यंत्रणेद्वारे डेस्कटॉप मूल्यमापन करण्यात येईल. त्यानंतर क्षेत्रीय तपासणी व मूल्यमापन (फील्ड मूल्यमापन) त्रयस्त यंत्रणेद्वारे करण्यात येईल.

# माझी वसुंधरा अभियान ६.०

## नागरी स्थानिक स्वराज्य संस्था (ULBs)-गट

| गट | लोकसंख्या | संख्या |
|---|---|---|
| अमृत शहरे (०१) | लोकसंख्या १० लक्षपेक्षा अधिक | १० |
| अमृत शहरे (०२) | लोकसंख्या ३ लक्ष ते १० लक्ष | १७ |
| अमृत शहरे (०३) | लोकसंख्या १ लक्ष ते ३ लक्ष | १६ |
| नगरपरिषद व नगर पंचायत (०४) | लोकसंख्या ४० हजार ते १ लक्ष | ७७ |
| नगरपरिषद व नगर पंचायत (०५) | लोकसंख्या २५ हजार ते ४० हजार | ८८ |
| नगरपरिषद व नगर पंचायत (०६) | लोकसंख्या १५ हजार ते २५ हजार | १०१ |
| नगरपरिषद व नगर पंचायत (०६) | लोकसंख्या १५ हजारपेक्षा कमी | ११३ |
| नागरी | | ४२२ |

*टीप: सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्था आपल्या लोकसंख्येनुसार संबंधित गटात स्पर्धा करतील. सदर लोकसंख्येचे गट २०११ च्या जनगणना अहवालानुसार तयार करण्यात आले आहेत.*

# प्राथमिक माहिती संकलन

## नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांची माहिती

**स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव आणि प्रकार**

**स्थानिक स्वराज्य संस्थेचे भौगोलिक क्षेत्रफळ**

**लोकसंख्या**

**शहरातील घरांची संख्या**

**प्रशासकीय प्रमुख यांचा तपशील** (नाव, संपर्क क्रमांक)

**समन्वय (नोडल) अधिकारी यांचा तपशील**
(नाव, पदनाम, संपर्क क्रमांक)

**अधिकृत सोशल मिडिया पेज किंवा संकेतस्थळाची लिंक**

टीप: *सदर लोकसंख्येचे गट २०११ च्या जनगणना अहवालानुसार तयार करण्यात आले आहेत.*

# जिओटॅगिंगसाठी मार्गदर्शक सूचना

**माझी वसुंधरा अभियान ६.० अंतर्गत छायाचित्रे जिओटॅग करण्यासाठीच्या सूचना:**

- ❖ मोबाईलमध्ये प्ले स्टोअर उघडा, जिओटॅगिंग ॲप्स शोधा, सूचीमधून कोणतेही जिओ-टॅगिंग ॲप डाउनलोड करा आणि इंस्टॉल करा.
- ❖ जिओटॅगिंग ॲप उघडा आणि पूर्वी/दरम्यान/नंतरची छायाचित्रे घेताना एकाच ठिकाणाहून (angle) क्लिक करा.
- ❖ क्लिक केलेली जिओटॅग छायाचित्रे फोल्डरमध्ये सेव्ह करा.
- ❖ छायाचित्रे अपलोड करण्यापूर्वी त्यांची Size १ ते २ MB असल्याची खात्री करा.

**भूमी थीमॅटीक क्षेत्रासाठी : प्रत्येक ठिकाणाची (वृक्षारोपण करण्यापूर्वी/दरम्यान/नंतर) विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओ-टॅग केलेली छायाचित्रे पीडीएफ (PDF) स्वरूपात एकत्र संकलित करून अपलोड करावीत.**

**सर्व जिओटॅग केलेल्या छायाचित्रांमध्ये खालील घटक असल्यानंतरच छायाचित्रे वैध मानले जातील:**

- ❖ अक्षांश आणि रेखांश
- ❖ दिनांक (जेव्हा छायाचित्र काढण्यात आली.)
- ❖ ठिकाणाचे नाव

# जिओटॅग छायाचित्रांसाठी मार्गदर्शक सूचना

**छायाचित्रे वैध मानली जाण्यासाठी खालील तपशील जिओटॅग केलेल्या छायाचीत्रांवर नमूद असणे आवश्यक आहे:**

**१. पंचायत राज संस्थेचे नाव**

**२. जिल्ह्याचे नाव**

**३. अक्षांश (Longitude) आणि रेखांश (Latitude)**

**४. दिनांक आणि वेळ**









# MIS मध्ये गुगल मॅप लिंक कशी टाकायची याविषयी मार्गदर्शक सूचना:




टप्पा १: तुमच्या संगणकामध्ये गूगल मॅप सुरू करा.



टप्पा २: तुम्ही शेअर करू इच्छित असलेल्या दिशानिर्देश, नकाशा किंवा मार्ग शोधा. यानंतर वर डावीकडे असलेल्या मेनू या पर्यायावर क्लिक करा.

टप्पा ३: शेअर किंवा एंबेड मॅप यावर क्लिक करा.






टप्पा ४: लिंक कॉपी करा आणि आवश्यक त्या ठिकाणी पेस्ट करा.

स्थानिक स्वराज्य संस्थांनी निर्देशकांमध्ये दिलेल्या गुगल मॅप लिंक डेस्कटॉप असेसारद्वारे तपासल्या जातील. फिल्ड मूल्यांकनासाठी, असेसरला समान लिंक दिली जाईल. त्यामुळे, स्थानिक स्वराज्य संस्थांनी अचूक गुगल मॅप लिंक पुरवावी.

# IEC/प्रचारात्मक उपक्रमांच्या छायाचित्रांसाठी मार्गदर्शक सूचना

- जनजागृती उपक्रमांसाठी सादर केलेली सर्व छायाचित्रे ही उपक्रम ज्या तारखेला झाला त्या तारखेसह जिओटॅग केलेली असावीत.

- प्रत्येक उपक्रमासाठी, उपक्रमाची पार्श्वभूमी/बॅनर स्पष्टपणे दर्शवेल, असे किमान एक छायाचित्र काढणे आवश्यक आहे.

- बॅनरवर माझी वसुंधरा अभियान ६.० व MissionLiFE चे बोधचिन्ह (लोगो) व नाव असणे आवश्यक आहे.

- बॅनरवर कार्यक्रमाचे शीर्षक असावे. उदाहरणार्थ, जर वातावरणीय बदलाविषयी जनजागृती निर्माण करणारा उपक्रम असेल तर "वातावरणीय बदलाबाबत जागरूकता" असे स्पष्ट शीर्षक असावे.

- छायाचित्रात कार्यक्रमात सहभाग घेतलेल्या सहभागींचा समावेश असणे आवश्यक आहे.

- जनजागृती उपक्रमांमध्ये वातावरणीय बदलाची मूलभूत व्याख्या, संकल्पना, शासकीय नियम आणि धोरण आणि त्या विषय/निर्देशकासंबंधी राष्ट्रीय - आंतरराष्ट्रीय परिस्थिती या मुद्यांचा समावेश असावा.

- #majhivasundhara आणि #MissionLiFE हे हॅशटॅग वापरुन समाज माध्यमावर उपक्रम व कार्यक्रमांच्या पोस्ट कराव्या.

## १. भूमी (नागरी)- ४,३७५

| | |
|---|---|
| १.१ हरित आच्छादन आणि जैवविविधता | २,६७५ |
| १.२ घनकचरा व्यवस्थापन | १,७०० |

# १.१ हरित आच्छादन आणि जैवविविधता

| अ.क्र. | कृती बिंदू | गुण |
|---|---|---|
| १.१.१ | वृक्ष योजना: किमान ३३% हरित आच्छादन प्राप्त करण्यासाठीची योजना | २०० |
| १.१.२ | माझी वसुंधरा अभियान दरम्यान लावलेली आणि जगवलेली एकूण झाडे | १,५०० |
| १.१.३ | नवीन हरित क्षेत्रांचा विकास व देखभाल | ३०० |
| १.१.४ | महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) वृक्ष संरक्षण व जतन अधिनियम, १९७५ची अंमलबजावणी | १५० |
| १.१.५ | जिओटॅगिंगसह वृक्षगणना- तयारी व प्रकाशन | १२५ |
| १.१.६ | रोपवाटिकेची निर्मिती | १०० |
| १.१.७ | लोकजैवविविधता नोंदवही (PBR) तयार करणे | १५० |
| १.१.८ | बीज संकलन केंद्र | १५० |
| | एकूण | २,६७५ |

| १.१.१ | वृक्ष योजना: किमान ३३% हरित आच्छादन प्राप्त करण्यासाठीची योजना | गुण २०० |
|---|---|---|

३३% हरित आच्छादन प्राप्त करणे हा केंद्र शासनाच्या दीर्घकालीन उद्दिष्टाचा एक भाग आहे . हरित आच्छादन वाढवण्याच्या प्रगतीचा मागोवा घेण्यासाठी केंद्र शासनाने अनेक पुढाकार घेतले आहेत. असाच एक उपक्रम म्हणजे हरीत भारत अभियान (ग्रीन इंडिया मिशन), ज्याचे उद्दिष्ट ५ दशलक्ष हेक्टरपर्यंत जंगल/वृक्ष हरित आच्छादान वाढवणे आणि अजून ५ दशलक्ष हेक्टरपर्यंत हरित आच्छादान सुधारणे आहे. महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) वृक्षांचे संरक्षण आणि जतन अधिनियम, १९७५ (जुलै २०२१ मध्ये सुधारित) नुसार, स्थानिक स्वराज्य संस्थांनी शहरी मालकीच्या जमिनीवर, "किमान ३३% मर्यादेपर्यंत हरित क्षेत्र आच्छादान" तयार करणे अनिवार्य आहे. हे निर्देशक स्थानिक प्राधिकरणाद्वारे किमान ३३% हरित आच्छादन मिळवण्यासाठी घेतलेल्या पुढाकारांचे मूल्यमापन करते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | GIS/ रिमोट सेन्सिंगचा वापर करून जमीन वापराच्या नकाशाची प्रत | | ५० |
| २. | स्थानिक स्वराज्य संस्थेत ३३% हरित आच्छादन आहे का? | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| ३. | स्थानिक स्वराज्य संस्थेचा वृक्ष योजना आराखडा आहे का? | | ५० |
| | स्थानिक स्वराज्य संस्थेने ३३% हरित आच्छादनाची पूर्तता केली आहे व ते पुढे वाढविण्यासाठी वृक्ष योजना आहे. (ही वृक्ष योजना स्थानिक स्वराज्य संस्थेच्या संकेतस्थळावर प्रकाशित करण्यात आलेली असावी) | ५० | |
| | स्थानिक स्वराज्य संस्थेने ३३% हरित आच्छादनाची पूर्तता केलेली नाही पण किमान ३३% हरित आच्छादन प्राप्त करण्यासाठी वृक्ष योजना आहे. (ही वृक्ष योजना स्थानिक स्वराज्य संस्थेच्या संकेतस्थळावर प्रकाशित करण्यात आलेली असावी) | ५० | |
| ४. | वृक्ष योजना आराखड्याची अंमलबजावणी | | ५० |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० साठी अपेक्षित ध्येय प्राप्त झाले. | ५० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० साठी अपेक्षित ध्येय प्राप्त झाले नाही. | ० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ GIS/ रिमोट सेन्सिंगचा वापर करून हरित आच्छादन दर्शविण्यात आलेल्या जमीन वापराच्या नकाशाची (Land Use Map) प्रत – ही प्रत स्थानिक नियोजन प्राधिकरणाद्वारे अधिकृत करण्यात आलेली असावी.
- ❑ ३३% ग्रीन कव्हर गणना निर्दिष्ट करणारा दस्तऐवज.
- ❑ किमान ३३% हरित आच्छादन मिळवण्यासाठी वृक्ष योजना. आराखड्यात सध्या अस्तित्वात असलेल्या झाडांची संख्या आणि वृक्षाच्छादन असावे.
- ❑ वृक्ष योजना स्थानिक स्वराज्य संस्थेच्या अधिकृत संकेतस्थळावर प्रकाशित केली असेल तरच ती प्रकाशित मानली जाईल.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/ सुवाच्य नसल्यास,या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

  टीप: हरित आच्छादनात शेतजमीन ग्राह्य धरली जाणार नाही.

| SDG १५: जमिनीवरील जीवन | १५.२ : सर्व प्रकारच्या जंगलांच्या शाश्वत व्यवस्थापनाच्या अंमलबजावणीला चालना देणे, जंगलतोड थांबवणे , खराब झालेली जंगले पुनर्संचयित करून जागतिक स्तरावर वनीकरण आणि पुनर्वनीकरणात लक्षणीय वाढ करणे.<br>१५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण |
|---|---|

# १.१.२ माझी वसुंधरा अभियान दरम्यान लावलेली आणि जगवलेली एकूण झाडे — गुण १,५००

वृक्षारोपण हे आपल्या पृथ्वीचे आणि परिसंस्थेचे रक्षण करण्यासाठीचे एक आवश्यक पाउल आहे. झाडे हवेतील कार्बन डायऑक्साइड शोषून, झाडे आणि मातीमध्ये कार्बन साठवून, वातावरणात ऑक्सिजन सोडून वातावरणीय बदल रोखण्यास मदत करतात . सदर निर्देशकाद्वारे स्थानिक स्वराज्य संस्थांनी वृक्षारोपण मोहीमा हाती घेतल्या होत्या की नाही आणि त्यांनी लावलेल्या एकूण झाडांपैकी (स्थानिक झाडांसह) किती झाडे जगवली आणि त्यांची काळजी घेतली का हे तपासले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० अंतर्गत लागवड केलेल्या व जगवलेल्या वृक्षांची (सर्व स्थानिक प्रजाती आणि बांबूसह) एकूण संख्या **(Relative Marking)** | २०० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान लागवड केलेल्या आणि जगवलेल्या एकूण वृक्षांपैकी स्थानिक वृक्षांची एकूण संख्या **(Relative Marking)** | ३०० |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान लागवड केलेल्या आणि जगवलेल्या एकूण वृक्षांपैकी बांबूची एकूण संख्या **(Relative Marking)** | ५०० |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान लागवड केलेल्या आणि जगवलेल्या एकूण वृक्षांपैकी खस / शेवगा वृक्षांची एकूण संख्या **(Relative Marking)** | ३०० |
| ५. | **अपकीप (Upkeep):** माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान लावलेले आणि जगवलेले वृक्षांची एकूण संख्या **(Relative Marking)** | २०० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ लागवड केलेल्या आणि जगवलेल्या वृक्षांची एकूण संख्या (सर्व स्थानिक प्रजाती आणि बांबूसह)
- ❑ लावलेल्या आणि जगवलेल्या स्थानिक वृक्षांची, बांबूची आणि खस / शेवगा वृक्षांची संख्या
- ❑ स्थानाचे तपशील: संपूर्ण पत्ता, प्रकल्पाचे गुगल मॅपवरील स्थान इत्यादी माहिती विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- ❑ भूखंडांवर वृक्षारोपण: विकसित केलेली एकूण हरित क्षेत्रे चौरस मीटर (चौ. मी.) मध्ये
- ❑ रस्त्याच्या कडेला वृक्षारोपण: रस्त्याच्या कडेला करण्यात आलेल्या वृक्षारोपणाची एकूण लांबी (मीटर मध्ये).
- ❑ वृक्षारोपण उपक्रमांचे कार्यारंभ आदेश आणि कार्य पूर्णत्वाचे प्रमाणपत्र.
- ❑ वृक्षारोपण उपक्रमाची आर्थिक माहिती: अंतिम पावत्यांसह सर्व देयके. जर, वृक्षारोपण व्यावसायिक सामाजिक जबाबदारी (CSR) च्या माध्यमातून झाले असेल तर त्याची पोचपावती सादर करावी.
- ❑ पुढील १-२ वर्षांसाठी आवश्यक असलेल्या देखभालीसाठीची योजना.
- ❑ टप्प्यानुसार (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे. (अधिक तपशील वर दिलेल्या मार्गदर्शक तत्त्वांमध्ये जोडलेला आहे.)
  - वृक्षारोपण कार्यक्रमापुर्वी (Size १ ते २ MB)
  - वृक्षारोपण कार्यक्रमादरम्यान (Size १ ते २ MB)
  - माझी वसुंधरा अभियान ६.० च्या शेवटच्या दोन महिन्यांत (Size १ ते २ MB)
  - *वरील सर्व छायाचित्रे त्याच ठिकाणाहून (अँगलमध्ये) क्लिक केले असावेत.*
- ❑ *सादर केलेली कागदपत्रे वैध/ सुवाच्य नसल्यास,या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.*
- ❑ *स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेली माहिती माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.०, ५.० दरम्यान MIS मध्ये भरलेल्या माहितीशी जुळत नसल्यास, कोणतेही गुण दिले जाणार नाहीत. **(केवळ अपकीपसाठी लागू)***

| | SDG १५: जमिनीवरील जीवन | १५.२ : सर्व प्रकारच्या जंगलांच्या शाश्वत व्यवस्थापनाच्या अंमलबजावणीला चालना देणे, जंगलतोड थांबवणे , खराब झालेली जंगले पुनर्संचयित करून जागतिक स्तरावर वनीकरण आणि पुनर्वनीकरणात लक्षणीय वाढ करणे.<br>१५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण |
|---|---|---|

# स्थानिक प्रजातींच्या वृक्षांची सूचक यादी

### दक्षिण उष्णकटिबंधीय निम-सदाहरित वने

१. टर्मिनलिया पॅनिक्युलाटा (किंजल)
२. मेमोसायलॉन अंबेलेटम (अंजनी)
३. टर्मिनलिया चेबुला (हिरडा)
४. सिझिजियम क्युमीनी (जांभूळ)
५. ओलिया डायोसिया (परजामुन)
६. मॅंगीफेरा इंडिका (आंबा)
७. ऍक्टिनोडाफ्ने हुकेरी (पिसा)

### दक्षिण उष्णकटिबंधीय ओलसर पर्णपाती वने

१. टेक्टोना ग्रँडिस (सागवान)
२. टर्मिनलिया टोमेंटोसा (ऐन)
३. डेलबर्गिया लॅटिफोलिया (शिशम)
४. आदिना कार्डिफोलिया (हलदू )
५. मधुका इंडिका (मोहा)
६. टेरोकार्पसमार्सुपियम (बिजा)
७. मित्राज्ञा परविफ्लोरा (कलाम)
८. सालमालिया मालाबारिकम (सेमल)

### दक्षिणी उष्णकटिबंध काटेरी वने

१. अकेशिया अरेबिका (बाबुल)
२. अकेशिया ल्युकोफ्लेका (हिवर)
३. झिझिफस जुजुबा (बोर)
४. बुटीया मोनोस्पर्मा (पलास)
५. बेलानिट्स रेक्सबर्गी (हिंगणबेट)

## मनरेगा योजनेद्वारे शिफारस केलेल्या झाडांची यादी

१. टर्मिनलिया अर्जुन (अर्जुन)
२. टर्मिनल इलिप्टिका (आसन)
३. साराचा अशोक (अशोक)
४. टर्मिनलिया बेलिरिका (बेहेडा)
५. एगल मार्मेलोस (बेल)
६. ओरोक्सिलम इंडिकम (टेटू)
७. गार्डेनिया गम्मीफेरा (डिकेमाली)
८. टेरोकार्पस सँटलिनस (रक्त चंदन)
९. सपिंडस मुकोरोसी (रिठा)
१०. ग्मेलिना आर्बोरिया (शिवन)
११. सिम्प्लोकोस रेसमोसा (लोधरा)
१२. पोंगामिया पिनाटा (करंज)

*टीप:ही यादी संपूर्ण नाही, वरील माहिती ही फक्त संदर्भासाठी आहे. अधिक नावे Untitled-2 (mahaforest.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.*

# बांबू/शेवगा /खसची लागवड

## लागवडीसाठी योग्य बांबूच्या प्रजाती

1. *बांबूसा टूलडा*
2. *डेंड्रोकॅलामास ब्रॅंडीसी*
3. *बांबूसा बल्कोवा*
4. *डेंड्रोकॅलामास स्टोकसी*
5. *डेंड्रोकॅलामास स्रीकटस*
6. *बांबूसा अस्पेर*

## टिशू कल्चर केलेल्या रोपांची उपलब्धता

1. ईशवेद बायोटेक लॅब्स प्रा. लि.
2. अलमॅक बायोटेक लॅब्स प्रा. लि. , लातूर
3. ग्रोमोर बायोटेक प्रा. लि., तमिळनाडू

## लागवडीसाठी योग्य जागा



निकृष्ट जमिनीवर लागवड करणे



रस्त्यालगत लागवड



आंतरपीक लागवड



नदीकाठी लागवड

*टीप:* स्थानिक स्वराज्य संस्था राष्ट्रीय बांबू मिशनने सुचवलेल्या प्रजाती लावू शकतात:
*https://nbm.da.gov.in/Bamboo-Species*

## १.१.१ माझी वसुंधरा अभियानादरम्यान लावलेली आणि जगवलेली एकूण झाडे







सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

# १.१.३ नवीन हरित क्षेत्रांचा विकास व देखभाल

**गुण ३००**

**हरित क्षेत्र हे प्रदूषणाचे परिणाम कमी करण्यास मदत करतात. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थानी देवराई, पंचवटी, नगरवन, मियावाकी , घनवन, अमृत वन, स्मृती वन, जैवविविधता उद्यान, पक्षी उद्यान, इत्यादी प्रकारच्या हरित क्षेत्रांची निर्मितीस व देखभालीस महत्व दिले आहे का हे तपासतो.**

| मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|
| १. | नव्याने तयार केलेल्या हरित क्षेत्रांची (देवराई/पंचवटी/घनवन/मियावकी/ नगरवनसह) संख्या<br>*तयार केलेल्या हरित क्षेत्रांच्या संख्येच्या आधारे मूल्यांकन केले जाईल. तयार करण्यात आलेल्या प्रत्येक हरित क्षेत्राला २० गुण मिळतील.* | १०० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान तयार करण्यात आलेले हरित क्षेत्रांचे देवराई/पंचवटी/घनवन/मियावकी/ नगरवनसह) एकूण एकत्रित क्षेत्र<br>(Relative Marking) | १०० |
| ३. | **अपकीप (Upkeep):**<br>माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान तयार केलेल्या हरित क्षेत्राची देखभाल<br>*देखभाल करण्यात आलेल्या प्रत्येक हरित क्षेत्राला ०५ गुण मिळतील.* | १०० |

**आवश्यक तपशील :**

- ❑ नवीन तयार केलेल्या हरित क्षेत्रांचा (देवराई/पंचवटी/घनवन/नगर वन/मियावाकी/नगरवनसह) तपशील: क्षेत्रफळ आणि वापर - विहित एक्सेल स्वरूपात
- ❑ प्रकल्पाच्या प्रगतीनुसार विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ नव्याने तयार केलेल्या हरित क्षेत्राचे कार्यारंभ आदेश आणि आर्थिक प्रगती अहवाल.
- ❑ नव्याने तयार केलेल्या हरित क्षेत्रांच्या विहित एक्सेल फॉरमॅटमध्ये तयार केलेल्या हरित क्षेत्रांचा तपशील.
- ❑ गुगल मॅपवर स्थान.
- ❑ माझी वसुंधरा १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान तयार केलेल्या हरित क्षेत्रासाठी पुढील १-२ वर्षांसाठी देखभाल योजना (देखभाल यंत्रणेचा उल्लेख करणे आवश्यक)
- ❑ या निर्देशकासाठी, हरित क्षेत्र म्हणजेच, किमान ७०% क्षेत्र ज्यावर झाडे, झुडपे इ. आहेत. हरित क्षेत्र विकासासाठी किमान क्षेत्राची आवश्यकता:
  - अमृत शहरांसाठी = १०,००० चौ. फुटांपेक्षा कमी नसलेले क्षेत्रफळ
  - अमृत शहरांमध्ये समावेश नसलेल्या शहरांसाठी = ५,००० चौ. फुटांपेक्षा कमी नसलेले क्षेत्रफळ
- ❑ सादर केलेले दस्तऐवज वैध / सुवाच्य नसल्यास आणि Google लिंक चुकीची असल्यास या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेली माहिती माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान MIS मध्ये भरलेल्या माहितीशी जुळत नसल्यास, कोणतेही गुण दिले जाणार नाहीत. (केवळ अपकीपसाठी (Upkeep) लागू)

| | | |
|---|---|---|
| | **SDG११: शाश्वत शहरे व समुदाय** | ११.७: २०३० पर्यंत, सुरक्षित, सर्वसमावेशक आणि प्रवेशयोग्य, हरित आणि सार्वजनिक जागांवर, विशेषतः महिला आणि मुले, वृद्ध व्यक्ती आणि अपंग व्यक्तींसाठी सार्वत्रिक प्रवेश प्रदान करणे. |
| | **SDG १५: जमिनीवरील जीवन** | १५.१ : आंतरराष्ट्रीय करारांच्या बंधनांनुसार स्थानिक आणि अंतर्देशीय गोड्या पाण्याच्या साठ्यांचे संवर्धन, पुनर्संचयित आणि शाश्वत वापर आणि त्यांच्या सेवा, विशेषतः जंगले, पाणथळ प्रदेश, पर्वत आणि कोरडवाहू यांच्या संवर्धनाची खात्री करणे. |

# पंचवटी वृक्षारोपण




# देवराई वृक्षारोपण




टीप : *वृक्षारोपण योजनेसंबंधीत अधिक माहिती जाणून घेण्यासाठी देवराई फाउंडेशन यांची माहितीपुस्तिका खाली दिलेल्या लिंकवर पहा.*

*https://majhivasundhara.in//assets/docs/Devrai_Foundation.pdf*

# मियावाकी वन वृक्षारोपण






**जागेची निवड:**

निकृष्ट / नापीक जमीन निवडा.



**माती तयार करणे:**

- माती सर्वेक्षण करा
- सेंद्रिय पदार्थ टाकून मातीचा दर्जा सुधारा.
- मातीमध्ये हवा/पाण्याचा निचरा होईल हे सुनिश्चित करा



**वृक्षांची निवड:**

- मूळ/स्वदेशी झाडांच्या प्रजाती निवडा.
- झाडे, झुडुपे आणि ग्राउंड कव्हर यांचे मिश्रण सुनिश्चित करा.
- विविध वाढ दर असलेल्या झाडांच्या प्रजातींचा समावेश करा.



**वृक्षारोपण मांडणी:**

- दाट लागवड मांडणी तयार करा (प्रति चौरस मीटर 3-5 रोपे).
- वेगवेगळ्या प्रजाती मिसळा.



**वृक्षारोपण प्रक्रिया:**

लागवडीसाठी खड्डे खणणे.
सेंद्रिय पदार्थ मिसळा,
रोपे लावा आणि क्षेत्र आच्छादित करा.



**देखभाल:**

रोपांना नियमित पाणी द्या (पहिली २-३ वर्षे) आणि तण काढा.



**देखरेख आणि वाढ:**

- जंगलाच्या वाढीवर लक्ष ठेवा
- ३-४ वर्षांनी जंगल स्वावलंबी झाले पाहिजे.

# १.१.४ महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम, १९७५ ची अंमलबजावणी

**गुण १५०**

**महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण आणि जतन अधिनियम, १९७५ च्या जुलै २०२१ च्या सुधारणेत, शहरी भागात वृक्षतोड नियंत्रित करण्यासाठी, तोडल्या जाणाऱ्या झाडांच्या संचित (cumulative) वयानुसार पुरेशा प्रमाणात झाडे लावून वृक्षतोड नियंत्रित करण्यासाठी तरतूद केली आहे. हा निर्देशक महाराष्ट्रातील शहरी भागात या अधिनियमाची प्रभावीपणे अंमलबजावणी होते का याची तपासणी करतो.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | ६० दिवस किंवा त्यापेक्षा कमी कालावधीत ना हरकत प्रमाणपत्र (NoC) दिलेल्या प्रकल्पांची टक्केवारी | | ५० |
| | १००% प्रकल्प | ५० | |
| | १००% पेक्षा कमी प्रकल्प | ० | |
| २. | स्थानिक स्वराज्य संस्थेने प्रदान केलेल्या ना हरकत प्रमाणपत्रानुसार (NoC) नुकसानभरपाई म्हणून केलेल्या लागवडीची टक्केवारी | | ५० |
| | १००% | ५० | |
| | १००% पेक्षा कमी | ० | |
| ३. | नुकसान भरपाई म्हणून लागवड केलेल्या वृक्षांपैकी जगलेल्या वृक्षांची टक्केवारी | | ५० |
| | ९५% पेक्षा अधिक | ५० | |
| | ७५% ते ९५% | १५ | |
| | ७५% पेक्षा कमी | ० | |

**आवश्यक तपशील :**

- माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान ना हरकत प्रमाणपत्र (NoC) दिलेल्या प्रकल्पांची एकूण संख्येच्या प्रस्तावाच्या तपशिलांसह सारांश अहवाल – विहीत एक्सेल स्वरूपात
- वृक्ष/ नियोजन प्राधिकरणाने दिलेल्या ना हरकत प्रमाणपत्राची संकलित प्रत
- स्थानिक वृक्ष प्राधिकरण (LTA) आणि महाराष्ट्र राज्य वृक्ष प्राधिकरण (MSTA) यांद्वारे देण्यात आलेली ना हरकत प्रमाणपत्रे (NOC) मूल्यमापनासाठी विचारात घेतली जातील.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/ सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

$$\text{नुकसानभरपाई म्हणून केलेल्या वृक्ष लागवडीची टक्केवारी} = \frac{\text{लावलेल्या वृक्षांची संख्या}}{\text{ना हरकत प्रमाणपत्रानुसार तोडल्या जाणाऱ्या किंवा पुनर्रोपण करावयाच्या वृक्षांचे एकूण वय}} \times १००$$

$$\text{नुकसानभरपाई म्हणून केलेल्या वृक्ष लागवडी पैकी जगलेल्या वृक्षांची टक्केवारी} = \frac{\text{नुकसानभरपाई लागवडी मधल्या जगलेल्या वृक्षांची एकूण संख्या}}{\text{नुकसानभरपाई वृक्ष लागवडीची एकूण संख्या}} \times १००$$

SDG १५: जमिनीवरील जीवन

१५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण कारवाई करणे.

१५.९: २०३० पर्यंत, पारिस्थितिक प्रणाली आणि जैवविविधता मूल्ये राष्ट्रीय आणि स्थानिक नियोजन, विकास प्रक्रिया, गरिबी कमी करण्याच्या धोरणे आणि खात्यांमध्ये एकत्रित करणे.

# १.१.५ जिओटॅगिंगसह वृक्षगणना- तयारी व प्रकाशन

**गुण १२५**

**महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) वृक्ष संरक्षण व जतन अधिनियम १९७५, प्रकरण ४, कलम ७ (ब), मध्ये “डिसेंबर १९९६ पूर्वी एकदा आणि त्यानंतर दर पाच वर्षांनी एकदा, स्थानिक स्वराज्य संस्थेच्या अधिकार क्षेत्रातील सर्व जमीनीवरील अस्तित्वात असलेल्या सर्व वृक्षांची वृक्षगणना करणे अनिवार्य आहे.” जुलै २०२१ मध्ये पुरातन वृक्षांची संकल्पना मांडण्यासाठी आणि “GIS आधारित वृक्षगणना किंवा इतर कोणत्याही आधुनिक तंत्रज्ञानासारख्या नवीन तांत्रिक माध्यमांचा वापर करून” दर पाच वर्षांनी वृक्षगणना अनिवार्य करण्यासाठी या कायद्यात सुधारणा करण्यात आली. वृक्षगणना वृक्ष आच्छादन आणि प्रजातींच्या विविधतेसाठी आधाररेखा प्रदान करते. माहितीचा उपयोग वृक्षांच्या देखभालीसाठी आणि संवर्धनाशी संबंधित विविध उपक्रमांसाठी उपाययोजना आणि विकास करण्याससाठी केला जाऊ शकतो.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० पूर्वी वृक्षगणना अहवाल तयार आणि प्रकाशित केलेला आहे का? (जिओटॅगिंगसह) | | ७५ |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| १ (अ) | होय असल्यास, माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान वृक्ष गणना अहवाल अद्ययावत आणि प्रकाशित केला आहे का? (जिओटॅगिंगसह) | | |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |
| १ (ब) | नाही असल्यास, माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान अहवालाची स्थिती | | |
| | जिओटॅगिंगसह वृक्ष गणना – अहवाल १००% तयार व प्रकाशित | ७५ | |
| | जिओटॅगिंगसह वृक्ष गणना – अहवाल ५०% तयार व प्रकाशित | ३० | |
| | जिओटॅगिंगसह वृक्ष गणना – अहवाल ५०% हून कमी तयार व प्रकाशित | ० | |
| २. | पुरातन वृक्षांची यादी – अद्ययावत आणि प्रकाशित | | २५ |
| ३. | पुरातन वृक्षांचा संरक्षण आराखडा | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ स्थानिक संस्थेच्या संकेतस्थळावर, स्थानिक वृक्ष प्राधिकरणाने अधिकृत केलेल्या वृक्षगणना अहवालाची लिंक - जिओटॅगिंगसह (पुरातन वृक्षगणना अहवालासह)
- ❑ वृक्षगणना अहवाल आणि जिओटॅगिंगसह पुरातन वृक्षांची अद्ययावत यादी – ही यादी ULB च्या अधिकृत संकेतस्थळावर प्रकाशित केली तरच स्वीकारली जाईल.
- ❑ रितसर शिक्का मारलेली वृक्षगणना अहवालाची प्रत.
- ❑ पुरातन वृक्षांचा संरक्षण आराखडा
- ❑ स्थानिक वृक्ष प्राधिकरणाकडून जिओटॅगिंगसह वृक्षगणना अहवालाची स्थिती दर्शवणारी हमीपत्राची प्रत.
- ❑ पुरातन वृक्षांसह सर्व वृक्षांचे जिओटॅगिंग करणे अनिवार्य आहे. जिओटॅगिंग न केल्यास कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

***टीप : अहवाल १००% तयार आणि प्रकाशित– स्थानिक स्वराज्य संस्थेच्या १००% क्षेत्रफळाचा समावेश***

***अहवाल ५०% तयार आणि प्रकाशित– स्थानिक स्वराज्य संस्थेच्या ५०% क्षेत्रफळाचा समावेश***

- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/ सुवाच्य नसल्यास,या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

SDG १५: जमिनीवरील जीवन

१५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण कारवाई करणे.

१५.९: २०३० पर्यंत, पारिस्थितिक प्रणाली आणि जैवविविधता मूल्ये राष्ट्रीय आणि स्थानिक नियोजन, विकास प्रक्रिया, गरिबी कमी करण्याच्या धोरणे आणि खात्यांमध्ये एकत्रित करणे.

# १.१.२ जिओटॅगिंगसह वृक्षगणना- तयारी आणि प्रकाशन












<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत</u>

# १.१.६ रोपवाटिकेची निर्मिती

**गुण १००**

रोपवाटिका ही रोपे लागवडीसाठी तयार होईपर्यंत त्यांना अनुकूल परिस्थितीत ठेवण्यासाठी निर्माण केली जाणारी एक व्यवस्थापित जागा आहे. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रात वनीकरण आणि वृक्षारोपण या सारख्या उपक्रमांसाठी केलेल्या प्रयत्नांचे मूल्यमापन करतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | रोपवाटीकेची एकूण क्षमता (चौ. मी)<br>(Relative Marking) | ४० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान रोपवाटीकेत उपलब्ध असलेल्या आणि/किंवा विक्री केलेल्या रोपांची संख्या (ऊंची-४ फुटांहून अधिक)<br>(Relative Marking) | ६० |

**आवश्यक तपशील :**

- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रात खाजगी रोपवाटिकांसह तयार केलेल्या रोपवाटिकांची संख्या.
- ❑ तयार केलेल्या प्रत्येक रोपवाटिकेची क्षमता चौरस मीटरमध्ये (चौ.मी.)
- ❑ गुगल मॅपवर रोपवाटिकेचे स्थान .
- ❑ रोपवाटीकेचे क्षेत्र.
- ❑ जिओटॅग केलेले छायाचित्र (Size १ ते २ MB) .
- ❑ रोपवाटिकेद्वारे उपलब्ध आणि/किंवा विक्री केलेल्या रोपांची संख्या खालील तपशीलांसह: नाव, प्रजाती, विक्रीची संख्या, उंची इ.- विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- ❑ सादर केलेले दस्तऐवज वैध / सुवाच्य नसल्यास किंवा गुगल लिंक चुकीची असल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 15 LIFE ON LAND | SDG १५: जमिनीवरील जीवन | १५.२ : सर्व प्रकारच्या जंगलांच्या शाश्वत व्यवस्थापनाच्या अंमलबजावणीला चालना देणे, जंगलतोड थांबवणे , खराब झालेली जंगले पुनर्संचयित करून जागतिक स्तरावर वनीकरण आणि पुनर्वनीकरणात लक्षणीय वाढ करणे.<br>१५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण |

## १.१.३ रोपवाटिकेची निर्मिती










सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

# १.१.७ लोकजैवविविधता नोंदवही (PBR): तयारी आणि दस्तऐवजीकरण — गुण १५०

**लोकजैवविविधता नोंदणी (PBR) मध्ये स्थानिक जैविक संसाधनांची उपलब्धता आणि ज्ञान, त्यांचा औषधी वापर किंवा त्याच्याशी संबंधित इतर कोणत्याही पारंपारिक ज्ञानाची सर्वसमावेशक माहिती असते.शाश्वत पद्धतीने संसाधनांच्या भविष्यातील व्यवस्थापनासाठी हे रजिस्टर आधाररेखा तयार करते. स्थानिक संस्थांनी एखाद्या विशिष्ट क्षेत्राच्या लँडस्केप आणि लोकसंख्येसह जैविक संसाधनांचे संरक्षण आणि दस्तऐवजीकरण यांना प्रोत्साहन देण्यास महत्त्व दिले आहे की नाही ही बाब या निर्देशकाद्वारे तपासली जाईल.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान BMC ने घेतलेल्या बैठकांची संख्या (प्रत्येक बैठकीसाठी ५ गुण) | २० |
| २. | लोकजैवविविधता नोंदवही (PBR) : माझी वसुंधरा अभियान ६.० च्या आधी आणि दरम्यान BMC द्वारे तयार आणि मंजूर झाली असल्यास. | ३० |
| ३. | महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळाला (MSBB) लोकजैवविविधता नोंदवही (PBR) सादर केल्यास. | २० |
| ४. | जैवविविधता व्यवस्थापन समिती (BMC) कृती आराखडा | ३० |
| ५. | जैवविविधता कायदा, २००२ वरील क्षमता वृद्धी कार्यक्रमांची एकूण संख्या (प्रत्येक कार्यक्रमासाठी ५ गुण) | १० |
| ६. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान जैवविविधता व्यवस्थापन आराखडा तयार आणि सादर केला | ४० |

**आवश्यक तपशील :**

- ❑ जैवविविधता व्यवस्थापन समितीचे (BMC ) गठित झाल्याचे आदेश/पत्र आणि सदस्य यादीची प्रत.
- ❑ BMC ने दरवर्षी आयोजित केलेल्या किमान चार बैठकांच्या सूचना. माझी वसुंधरा अभियान ६.० च्या कालावधीत दर तीन (३) महिन्यांनी एकदा बैठक आयोजित केली पाहिजे- इतीवृत्तांच्या प्रतीसह सादर करणे.
- ❑ BMC ने ज्या बैठकीत लोकजैवविविधता नोंदवहीला (PBR) मान्यता दिली होती, त्या बैठकीची विषयपत्रिका (अजेंडा) आणि इतीवृत्तांची प्रत
- ❑ PBR BMCने तयार केले आहे आणि मंजूर केले आहे असे सांगणारे BMCकडून प्रमाणपत्र
- ❑ PBR सादर केल्याची प्रत (PBR तयार आणि प्रकाशित केल्यानंतर तो महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळाला **Maharashtra state Biodiversity Board (MSBB)** ला प्रस्तुत करावा.)
- ❑ राष्ट्रीय जैवविविधता प्राधिकरणाने जारी केलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार BMC कृती आराखड्याची प्रत.
- ❑ जैवविविधता कायदा, 2002- वरील क्षमता वृद्धी कार्यक्रमांचा तपशील पीडीएफ स्वरूपात
- ❑ जैवविविधता वारसा स्थळांची यादी व व्यवस्थापन अहवाल
- ❑ जैवविविधता व्यवस्थापन आराखडाची प्रत

कृती आराखड्यात जैव संसाधनांच्या संवर्धनासाठी नमूद केलेल्या मुद्यांचा समावेश असू शकतो. BMC च्या कर्मचाऱ्यांसाठी आवश्यक असलेले प्रशिक्षण आणि भौगोलिक निर्देशकांच्या (G.I.) नोंदणीसाठी विचारात घेण्यासाठी संभाव्य बाबींची यादी समाविष्ट असू शकते.

http://nbaindia.org/uploaded/pdf/Guidelines%20for%20BMC.pdf

❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/ सुवाच्य नसल्यास,या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

SDG १५: जमिनीवरील जीवन

१५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण कारवाई करणे.

१५.९: २०३० पर्यंत, पारिस्थितिक प्रणाली आणि जैवविविधता मूल्ये राष्ट्रीय आणि स्थानिक नियोजन, विकास प्रक्रिया, गरिबी कमी करण्याच्या धोरणे आणि खात्यांमध्ये एकत्रित करणे.

# लोकजैवविविधता नोंदवही (PBR) तयार करण्याची पद्धत




- जैवविविधता व्यवस्थापन समितीची वैधता ५ वर्षे आहे.
- समितीमध्ये एक निर्वाचित अध्यक्ष आणि स्थानिक स्वराज्य संस्थेने नामनिर्देशित केलेले सहा सदस्य असतात, ज्यात एक तृतीयां महिला सदस्य असतात.
- त्यानंतर तांत्रिक मंजुरी गटांद्वारे मूल्यमापन केलेला अहवाल अंतिम मंजुरीसाठी महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळाकडे सादर केला जातो. जर अहवाल राष्ट्रीय जैवविविधता प्राधिकरण (NBA) च्या अटी आणि नियमांचे पालन करत असेल तर संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेला PBR च्या वैधतेबद्दल प्रमाणपत्र जारी केले जाते.
- **PBR चे प्रमाणित स्वरूप आणि राष्ट्रीय जैवविविधता समितीने परिभाषित केलेले आवश्यक नियम आणि PBR नियमांनुसार अहवाल तयार करणे अपेक्षित आहे.**

  ***http://nbaindia.org/uploaded/pdf/PBR%20Format%202013.pdf***

| १.१.८ | बीज संकलन केंद्र | गुण १५० |
|---|---|---|

बीज संकलन केंद्र हे निरनिराळ्या वृक्ष प्रजातींच्या बिया संरक्षित करून योग्य परिस्तिथीत ठेवण्याचे ठिकाण आहे. स्थानिक वृक्ष प्रजातींचे बीज संकलन केंद्र हे विशेषत: स्थानिक भागातील किंवा परिसंस्थेतील झाडांच्या बिया आणि स्थानिक समुदायांसाठी सांस्कृतिक, पर्यावरणीय किंवा आर्थिक महत्त्व असलेल्या झाडांच्या बियांचे जतन करण्यावर लक्ष केंद्रित करते. देशी किंवा स्थानिक वृक्ष प्रजातींचे बियाणे गोळा करणे, साठवणे आणि वितरीत करणे यासाठी हे केंद्र काम करू शकतात. हे निर्देशक बियाणे सार्वभौमत्व, वृक्ष विविधता यास प्रेरित करतो .

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | बीज संकलन व बीज गोळे (सीड बॉल) बनवण्याकरिता जनजागृती | | २० |
| २. | बीज संकलन केंद्राची उपलब्धता | | ३० |
| | होय | ३० | |
| | नाही | ० | |
| ३. | एकूण संकलित आणि साठवलेल्या स्थानिक झाडांच्या बियांचे प्रमाण (किलोमध्ये) (Relative Marking) | | ५० |
| ४. | बियाणांचा वापर | | ५० |
| | बीज गोळे (सीड बॉल) बनवण्यासाठी | २५ | |
| | वृक्षारोपणासाठी | २५ | |

**आवश्यक तपशील:**

- घेतलेल्या जनजागृती उपक्रमांची संख्या- विहित केलेल्या एक्सेल स्वरूपात .
- नागरिकांचा सहभाग विहित केलेल्या एक्सेल स्वरूपात.
- बीज संकलन केंद्राच्या स्थानाची गुगल मॅप लिंक.
- संकलित केलेल्या स्थानिक झाडांचे लॉगबुक
- बीज संकलन केंद्रात पॅकेजिंग व लेबलिंग करून जतन केलेल्या बियाणांचे जिओटॅग केलेली छायाचित्र (size १ ते २ MB)
- बीज संकलन केंद्रामधील साठवलेल्या इतर बियाण्याच्या वापराचा कार्यारंभ आदेश -स्थानिक रोपवाटिकेला पुरवठा/ माझी वसुंधरा अभियान ५.० दरम्यान पेरलेले बियाणे (खंदक/ सीसीटी(CCT)/डीप सीसीटी(deep CCT)/ शेताच्या बांधांच्या सीमेवर)
- वापरात आलेल्या बियाणांचे जिओटॅग केलेली छायाचित्रे. (size १ ते २ MB)
- सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास आणि गूगल मॅप लिंक चुकीची असल्यास या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत .

| SDG १५: जमिनीवरील जीवन | १५.२ : सर्व प्रकारच्या जंगलांच्या शाश्वत व्यवस्थापनाच्या अंमलबजावणीला चालना देणे, जंगलतोड थांबवणे , खराब झालेली जंगले पुनर्संचयित करून जागतिक स्तरावर वनीकरण आणि पुनर्वनीकरणात लक्षणीय वाढ करणे.<br>१५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण |
|---|---|

# बीज व्यवस्थापन व बीज गोळे बनवण्याची प्रक्रिया



बीज संकलन

**जमिनीवरून गोळा करणे-** साग, शिवन, बाभळ इ.

**झाडांवरून गोळा करणे-** अंजन, बिबळ, इ.

**शिढी वापरून गोळा करणे-** चंपा, रिठा, इ.



बीज वेचणे

**स्फुटनशील शुष्क फळे व अस्फुटनशील शुष्क फळे-**
बिया मळणे / घासणे/ आपटणे
उदा. बाभळ, कांचन, बहावा इ.

**गरयुक्त फळे**
फळ पिळून त्यातील बी काढा, उदा. कडुलिंब, पिंपळ व पुत्रंजीव.




बीज संकलन केंद्र

- बिया योग्यरीत्या सुकवा व त्यांच्यावर योग्य प्रक्रिया करा.
- हे बियाणे स्थानिक स्वराज्य संस्थेच्या बीज संकलन केंद्रात ठेवा.

*टीप: अधिक माहितीसाठी ICFRE चे बीज व्यवस्थापन अहवाल वाचा*
*https://hindi.icfre.gov.in/UserFiles/File/Books/Forest%20Seed%20Management.pdf*

# बीज गोळे  बनवण्याची प्रक्रिया



**मिश्रण** - माती व कंपोस्ट एकत्र करा.

↓

**पाणी मिश्रण** - माती चिकट होईपर्यंत हळू हळू पाणी मिसळा.

↓

**मातीचे गोळे बनवा** - थोडी माती घेऊन त्यात छोटा खड्डा करा. त्यात बियाणे टाका आणि त्याचा गोळा बनवा.

↓

**सीड बॉल्स सुकवणे** - बीज गोळे २४ ते ४८ तासाच्या कालावधीसाठी  सुकवा.

↓

**वापरा**- ठरवलेल्या  ठिकाणी बीज गोळे लावा किंवा पसरवा.

# बीज संकलन केंद्राची निर्मिती

स्थानिक स्वराज्य संस्थेतील लोकांनी आणि विद्यार्थ्यांनी गोळा केलेल्या बिया

↓

स्थानिक स्वराज्य संस्थेतील बीज संकलन केंद्र

इतर संस्था आणि CSR मार्फत मदत

राष्ट्रीय जनुक निधीद्वारे मदत

**बीज साठवणूक** :

- मातीची भांडी, पुन्हा वापरलेले डब्बे, पुनर्वापर केलेले कागदी लिफाफे किंवा बिया टिकवण्यासाठी पिशव्या यांसारख्या हवाबंद डब्ब्याना प्राधान्य द्या.

डब्ब्यावर खालील लेबल असावेत :

- बियाणे संग्राहकाचे नाव
- बियाणे गोळा करण्याची तारीख
- प्रजातींचे सामान्य नाव
- प्रजातींचे वैज्ञानिक नाव
- बीज प्रकार
- पारंपारिक उपयोग

**स्थानिक स्वराज्य संस्थेतील बीज संकलन केंद्र :**

स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या आवारात एक लहान कपाट तयार करावे जे बियाणे संकलन केंद्र म्हणून काम करेल. जेथे नागरिक स्थानिक बिया साठवू शकतील. CSR/अन्य कोणतीही संस्था/व्यक्ती केंद्र निर्माण करण्यासाठी आर्थिक सहाय्य करू शकतात.

## साठवलेल्या बियाण्याचा वापर



माझी वसुंधरा अभियानात बीज पेरणी करणे



रोपवाटीकेला पुरवठा



बीज गोळ्यांची निर्मिती



चर/सीसीटी/डीप सीसीटी/शेत बंधाऱ्यांवर पेरणी करणे

## १.२ घनकचरा व्यवस्थापन

| अ.क्र. | कृतीबिंदू | गुण |
|---|---|---|
| १.२.१ | घनकचरा व्यवस्थापन: निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण आणि संकलन | २५० |
| १.२.२ | ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया | ३५० |
| १.२.३ | सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया /विल्हेवाट | २५० |
| १.२.४ | जुन्या साठलेल्या कचऱ्यावर (Legacy Waste) शास्त्रोक्त प्रक्रिया | १०० |
| १.२.५ | प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल युज प्लास्टिकवर (SUP) बंदी) | ३५० |
| १.२.६ | जैववैद्यकीय (बायो-मेडिकल) कचरा व्यवस्थापन | १०० |
| १.२.७ | ई-कचरा व्यवस्थापन | १०० |
| १.२.८ | स्वच्छतेचा दर्जा | २०० |
| एकूण | | १,७०० |

# १.२.१ घनकचरा व्यवस्थापन: निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण आणि संकलन

**गुण २५०**

सार्वजनिक आरोग्यासाठी आणि पर्यावरणासाठी घनकचरा व्यवस्थापन अत्यंत महत्त्वाचे आहे. घनकचऱ्यावर योग्यरित्या प्रक्रिया न केल्यास ते जमिनीमध्ये जाते आणि यामुळे माती व भूजल प्रदूषित होते. घनकचरा व्यवस्थापन नियम-२०१६ नुसार, स्थानिक स्वराज्य संस्थांना सर्व घरांमधून विलगीकरण केलेला घनकचरा संकलित करण्याची व्यवस्था करावयाची आहे. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांनी कचऱ्याच्या संकलनाला महत्त्व दिले आहे की नाही आणि त्याचे निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण केले जाते की नाही हे तपासतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | | गुण |
|---|---|---|---|---|
| १. | निर्मितीच्या ठिकाणी संकलन आणि विलगीकरण केलेल्या घनकचऱ्याची टक्केवारी | | | २०० |
| १(अ) | निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण | | १०० | |
| | ९५% ते १००% | १०० | | |
| | ८०% ते ९५% | ५० | | |
| | ८०% पेक्षा कमी | ० | | |
| १(ब) | संकलन | | १०० | |
| | ९५% ते १०० % | १०० | | |
| | ८०% ते ९५% | ५० | | |
| | ८०% पेक्षा कमी | ० | | |
| २. | काढून टाकलेल्या, कचरा संवेदनशील ठिकाणांची संख्या | | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रामध्ये निर्माण होणाऱ्या घनकचऱ्याचे प्रमाण – मासिक अहवाल.
- निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण केलेला आणि घरोघरी जाऊन संकलित केलेल्या घनकचऱ्याचे प्रमाण - स्व-मूल्यांकन अहवाल.
- माझी वसुंधरा अभियान ६.० च्या कालावधीतील लॉगबुक सादर करणे.
- स्वच्छ भारत मिशन (नागरी) MIS मधून घेतलेली माहिती.
- जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)- घरोघरी जाऊन घनकचऱ्याचे संकलन.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 11 | **SDG११: शाश्वत शहरे व समुदाय** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |
| 12 | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |

# घनकचरा व्यवस्थापन

## प्राथमिक विलगीकरण



# १.२.१ घनकचरा व्यवस्थापन: निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण आणि संकलन







<u>*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*</u>

# १.२.२ ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया

**गुण ३५०**

ओला कचरा हा स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रात निर्माण होणाऱ्या घरगुती कचऱ्यातील प्रमुख घटक आहे. यामध्ये भाजीपाला/स्वयंपाक घरातील ओला कचरा, बागेतील कचरा आणि इतर सहज विघटीत होणारा कचरा यांचा समावेश आहे. या कचऱ्याचा वापर साधारणपणे खत निर्मितीसाठी किंवा बायोगॅस संयंत्रामध्ये प्रक्रिया करण्यासाठी केला जातो. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांनी ओल्या कचऱ्यावर खतनिर्मिती प्रक्रियेव्द्वारे किंवा बायोगॅस संयंत्रामध्ये प्रक्रिया करून रसायनमुक्त खते आणि गॅस तयार करण्याला महत्त्व दिले आहे की नाही हे तपासतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | कार्यरत ओला कचरा प्रक्रिया केंद्र (कंपोस्ट केंद्र /बायोगॅस केंद्र) | | १०० |
| | होय | १०० | |
| | नाही | ० | |
| २. | प्रक्रिया केलेल्या ओल्या कचऱ्याची टक्केवारी | | १०० |
| | ९५% आणि अधिक | १०० | |
| | ८०% - ९५% | ७५ | |
| | ६०%-८०% | ५० | |
| | ६०% पेक्षा कमी | ० | |
| ३. | कंपोस्टचा वापर: विक्री केलेल्या/स्वतः वापरलेल्या कंपोस्टची टक्केवारी | | १०० |
| | ९०% पेक्षा अधिक | १०० | |
| | ७५% - ९०% | ८० | |
| | ६०% - ७५% | ६० | |
| | ६०% पेक्षा कमी | ० | |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान HARIT ब्रँड प्रमाणित | | ५० |
| | HARIT ब्रँड प्रमाणपत्र देऊन पुन्हा प्रमाणित केलेल्या स्थानिक स्वराज्य संस्था | ५० | |
| | HARIT ब्रँड प्रमाणपत्र देऊन प्रमाणित स्थानिक स्वराज्य संस्था | ३० | |

**आवश्यक तपशील:**

- कंपोस्ट केंद्र /बायोगॅस केंद्राचे ठिकाण- गुगल मॅप लिंक.
- कंपोस्ट प्लांट , उत्पादने आणि तयार केलेले कंपोस्ट विकणारे स्थानिक दुकान यांची जिओटॅग केलेली संकलित छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- निर्माण झालेल्या ओल्या कचऱ्याचे प्रमाण आणि तयार केलेल्या कंपोस्टचे प्रमाण - मासिक अहवाल.
- माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान अधिकृत प्रयोगशाळेतील खत नियंत्रण आदेश (FCO) मानदंडांचे पालन करणाऱ्या कंपोस्ट गुणवत्ता अहवालाची प्रत.
- कंपोस्ट उत्पादित (प्रमाण) आणि वापर (विकलेले/स्वतः वापरलेले) तपशील दर्शविणारे लॉगबुक.
- HARIT ब्रँडच्या प्रमाणपत्राची प्रत.
- सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |
|---|---|---|

# ओला कचरा कंपोस्ट करण्याच्या पद्धती



## पारंपारिक कंपोस्टिंग

- सर्व सेंद्रिय कचरा गोळा करा आणि डब्यात टाका किंवा जमिनीवर त्याचा ढीग करा.
- नियमित अंतराने कचरा मिसळा (७ दिवस).
- या पद्धती मध्ये कमी मनुष्यबळ आणि क्षेत्र आवश्यक आहे.



## वर्मी कंपोस्टिंग

- कंपोस्ट बनवण्यासाठी गांडूळांचा वापर केला जातो.
- गांडूळ सेंद्रिय पदार्थांचे सेवन करून कंपोस्टची गुणवत्ता वाढविण्यास मदत करतात.



## विन्ड्रो कंपोस्टिंग

- सेंद्रिय कचरा लांब, अरुंद ढिगाऱ्यात/ विंड्रोस् मध्ये ठेवला जातो.
- खताचे मिश्रण आणि वातन करण्यासाठी बँक होल्डरचा वापर केला जातो.
- ही पद्धत मोठ्या प्रमाणातील ओल्या कचऱ्यासाठी योग्य आहे.




## अवायुजीवी कंपोस्टिंग

- सेंद्रिय कचरा सीलबंद कंटेनरमध्ये किंवा डायजेस्टर मध्ये ठेवला जातो.
- या प्रक्रियेत उप-उत्पादन म्हणून बायोगॅस तयार केला जातो.



## सामुदायिक कंपोस्टिंग

- सेंद्रिय कचरा मोठ्या कंटेनरमध्ये गोळा केला जातो आणि गृहनिर्माण सोसायटी/समुदायातील रहिवासी एकत्रितपणे सेंद्रिय कचऱ्याचे व्यवस्थापन करतात.
- कंपोस्टिंगसाठी पुरेशी जागा असलेल्या मोठ्या गृहनिर्माण सोसायटींसाठी ही पध्दत योग्य आहे.

## १.२.२ ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया
















*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

# १.२.३ सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया / विल्हेवाट

**गुण २५०**

**सुक्या कचऱ्याचा पुनर्वापर आणि विल्हेवाट लावणे अत्यंत महत्त्वाचे आहे. सुक्या घनकचऱ्यामध्ये प्लास्टिक, काच, कागद, धातू, रबर, अन्न-पॅकेजिंग मटेरियल यांसारख्या पुनर्प्राप्त करण्यायोग्य संसाधनांचा समावेश होतो. कचऱ्याचे मूल्य खूप मोठे आहे आणि सर्वांनी त्याच्या पुनर्वापराचा मार्ग अवलंबला पाहिजे. यामुळे कचरा साठवण्याच्या जागेवर आणि नैसर्गिक संसाधनांवर येत असलेला भार कमी होऊन ते उत्पन्नाचे साधन बनू शकते. स्थानिक स्वराज्य संस्था सुक्या कचऱ्याचा पुनर्वापर/प्रक्रिया /विल्हेवाट किती कार्यक्षमतेने करतात याचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| मूल्यमापन कार्यपद्धती | | | गुण |
|---|---|---|---|
| १. | कार्यरत साहित्य पुनर्प्राप्ती सुविधा (MRF) केंद्र | | १०० |
| | होय | १०० | |
| | नाही | ० | |
| २. | सुक्या कचऱ्याचे दुय्यम वर्गीकरण | | ५० |
| | ९०% पेक्षा अधिक | ५० | |
| | ९०% पेक्षा कमी | ० | |
| ३. | सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया/ विल्हेवाट | | ७५ |
| | अधिकृत यंत्रणेद्वारे विल्हेवाट लावलेल्या सुक्या कचऱ्याची टक्केवारी | | |
| | ९०% आणि अधिक | ७५ | |
| | ५०%-९०% | ५० | |
| | ५०% पेक्षा कमी | ० | |
| ४. | घरगुती घातक घनकचऱ्याचे वर्गीकरण | | २५ |
| | ८०% आणि अधिक | २५ | |
| | ८०% पेक्षा कमी | ० | |

**आवश्यक तपशील:**

- निर्माण झालेल्या आणि प्रक्रिया केलेल्या सुक्या कचऱ्याचे प्रमाण - मासिक अहवाल.
- पुनर्प्रक्रिया केंद्राचे स्थान / साहित्य पुनर्प्राप्ती सुविधा (MRF) केंद्र - गुगल मॅप
- पुनर्प्रक्रिया केंद्रांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- स्थानिक स्वराज्य संस्थेद्वारे सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया/विल्हेवाट लावण्याची यंत्रणा.
- विलगीकरण करून प्रक्रिया केलेल्या घातक घनकचऱ्याचे प्रमाण – मासिक अहवाल.
- सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG११: शाश्वत शहरे व समुदाय** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |
| | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |

# सुक्या कचऱ्याचे व्यवस्थापन



# १.२.३ सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया / विल्हेवाट







<u>*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*</u>

# १.२.४ जुन्या साठलेल्या कचऱ्यावर (Legacy Waste) शास्त्रोक्त प्रक्रिया — गुण १००

वर्षानुवर्षे साठलेला कचरा मोठी जागा व्यापतो आणि रोग पसरवणाऱ्या माश्या आणि लीचेटच्या निर्मितीसाठी एक प्रजनन भूमी बनतो. यामुळे भूगर्भातील पाणी दूषित होऊ शकते. केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळाच्या (CPCB) मार्गदर्शक तत्त्वांनुसार, वर्षानुवर्षे प्रक्रिया न करता साठविलेला जुना कचरा उत्खनन, प्रक्रिया आणि विलगीकरण करून त्याचा पुनर्वापर करण्याची शास्त्रोक्त प्रक्रिया करणे म्हणजे "बायोमाइनिंग" होय. स्थानिक स्वराज्य संस्थांनी जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया करण्याला महत्त्व दिले आहे की नाही याचे मूल्यमापन हा निर्देशक करतो.

| मूल्यमापन कार्यपद्धती | | | गुण |
|---|---|---|---|
| १. | वर्षानुवर्षे साठलेल्या जुन्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया | | १०० |
| | जमीन पुनर्प्राप्त आणि पुनर्वापर | १०० | |
| | १०० % जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया | ७५ | |
| | ७५% ते १००% जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया केली जाते | ५० | |
| | ५०% ते ७५% जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया केली जाते | २५ | |
| | ५०% पेक्षा कमी जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया केली जाते | ० | |

**आवश्यक तपशील:**

- वर्षानुवर्षे साठवून ठेवलेल्या घनकचरा ठिकाणाचा तपशील (स्थानिक स्वराज्य संस्थेतील)-गुगल मॅप लिंक.
- जुन्या साठलेल्या कचऱ्याच्या परिमाणाचा तपशील.
- अधिकृत प्रमाणपत्रासह वर्षानुवर्षे साठवून ठेवलेल्या घनकचऱ्यावर केलेल्या उपाययोजनांची स्थिती - काम पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र/ निविदा सादर प्रमाणपत्र /कोणताही जुना साठलेला कचरा नसल्याच्या प्रमाणपत्राची प्रत.
- विविध टप्प्यावर (आधी-दरम्यान-नंतर) जिओ टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- जर जमीन पुन्हा वापरली जात असेल तर, काम पूर्ण होण्याआधीची व नंतरची छायाचित्रे. (Size १ ते २ MB)
- कचऱ्याने व्यापलेली एकूण जमीन आणि पुन्हा वापर केल्या जाणाऱ्या जमिनीचा तपशील (एकरमध्ये)
- सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 3 GOOD HEALTH AND WELL-BEING | **SDG ३. आरोग्य व लोककल्याण** | ३.९ : २०३० पर्यंत, घातक रसायने आणि हवा, पाणी आणि माती प्रदूषण आणि दूषिततेमुळे मृत्यू आणि आजारांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करणे. |
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |

# १.२.४ जुन्या साठलेल्या कचऱ्यावर (Legacy Waste) शास्त्रोक्त प्रक्रिया







***सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.***

## १.२.५ प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल युज प्लास्टिकवर (SUP) बंदी) — गुण ३५०

प्लास्टिक कचरा व्यवस्थापन ही एक गंभीर समस्या आहे. जगात दरवर्षी ३०० दशलक्ष मेट्रिक टनपेक्षा जास्त प्लास्टिक तयार होते, त्यापैकी केवळ ९% प्लास्टिकचाच पुनर्वापर केला जातो आणि उर्वरित प्लास्टीक जमिनीवर जमा होते. प्लास्टिकमुळे पर्यावरणाचा होणारा ऱ्हास कमी करण्यासाठी, केंद्र शासनाने १ जुलै २०२२ पासून सिंगल युज प्लास्टिकसह पॉलिस्टीरीन आणि विस्तारित पॉलिस्टीरिनचे उत्पादन, आयात, साठा, वितरण, विक्री आणि वापर यावर संपूर्ण बंदी घातली आहे. स्थानिक स्वराज्य संस्था कशाप्रकारे या बंदीची अंमलबजावणी आणि जनजागृती करत आहेत, याचे मूल्यमापन हा निर्देशक करतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | जनजागृती मोहिमांचे आयोजन (Relative Marking) | | १५० |
| | जागतिक पर्यावरण दिन २०२५ मोहिमे (२२ मे ते ५ जून २०२५) दरम्यान सिंगल यूज प्लास्टिक (SUP) च्या बंदीबाबत आयोजित केलेल्या जनजागृती मोहिमांची संख्या | २५ | |
| | जागतिक पर्यावरण दिन २०२५ मोहिमे (२२ मे ते ५ जून २०२५) दरम्यान प्लास्टीकला असलेल्या पर्यायी घटकांबद्दल जनजागृती मोहिमांची संख्या | २५ | |
| | सिंगल युज प्लास्टिक बंदीबाबत आयोजित केलेल्या जनजागृती मोहिमांची संख्या | ५० | |
| | प्लास्टीकला असलेल्या पर्यायी घटकांबद्दल (वस्तू) जनजागृती मोहिमांची संख्या | ५० | |
| २. | प्लास्टिक कचरा व्यवस्थापन आराखडा तयार करणे आणि त्याची अंमलबजावणी करणे | | ७५ |
| ३. | वार्षिक प्लास्टिक कचरा अहवाल नगर विकास विभाग (UDD) ला सादर करणे | | ७५ |
| ४. | प्रक्रिया करण्यासाठी प्लॅस्टिक कचरा प्रक्रिया केंद्राला पाठवलेल्या प्लॅस्टिक कचऱ्याची टक्केवारी | | ५० |
| | • ९०% आणि अधिक | ५० | |
| | • ७०%-९०% | ४० | |
| | • ५०%-७०% | ३० | |
| | • ५०% पेक्षा कमी | ० | |

**आवश्यक तपशील:**

- प्लास्टिक कचऱ्याच्या व्यवस्थापनासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेने घेतलेल्या उपक्रमांचा तपशील:
  - सिंगल यूज प्लास्टिक (SUP) बंदी आणि प्लास्टिकच्या पर्यायांबाबत जनजागृतीसाठी आयोजित केलेल्या मोहिमांची संख्या – विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- जनजागृती मोहिमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- प्लास्टिक कचरा व्यवस्थापन योजना आणि प्लास्टिक कचरा अहवालाची प्रत.(वार्षिक)
- प्लॅस्टिक कचरा प्रक्रिया केंद्रांशी केलेल्या कराराची प्रत.
- प्रक्रिया करण्यासाठी प्लॅस्टिक कचरा प्रक्रिया केंद्राला पाठवलेल्या प्लॅस्टिक कचऱ्याचा तपशील- मासिक अहवाल
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे.<br>१२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |

# प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल युज प्लास्टिकवर बंदी)

नियम : प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सुधारणा) नियम-२०२१, दिनांक ३० सप्टेंबर २०२१ पासून ७५ मायक्रॉनपेक्षा कमी जाडीच्या प्लास्टिक कॅरी बॅगचे उत्पादन, आयात, साठवणूक, वितरण, विक्री आणि वापर यावर निर्बंध आणले आहेत. तसेच दिनांक ३१ डिसेंबर २०२२ पासून, १२० मायक्रॉनपेक्षा कमी जाडीच्या प्लास्टिक कॅरी बॅगवर बंदी लागू करण्यात आली आहे.

| प्रतिबंधित सिंगल युज प्लास्टिकच्या वस्तूंची यादी | | | |
|---|---|---|---|
| **अ.क्र** | **वस्तू** | **अ.क्र.** | **वस्तू** |
| १ | ईयर बड्ससाठी वापरल्या जाणाऱ्या प्लास्टिकच्या काड्या | ११ | चमचे |
| २ | फुग्यांसाठी वापरल्या जाणाऱ्या प्लास्टिकच्या काड्या | १२ | सूरी |
| ३ | प्लास्टीकचे झेंडे | १३ | स्ट्रॉ |
| ४ | चॉकलेट काड्या | १४ | ट्रे |
| ५ | आईसक्रीम काड्या | १५ | काटे चमचे |
| ६ | प्लास्टीक डिश | १६ | प्लास्टीकच्या निमंत्रण पत्रिका |
| ७ | कप | १७ | सिगारेटची पाकिटे |
| ८ | ग्लास | १८ | ढवळणी |
| ९ | सजावटीसाठी पॉलिस्टीरिन (थर्माकॉल) | १९ | मिठाईच्या डब्याभोवती गुंडाळण्यासाठी प्लास्टीक |
| १० | १०० मायक्रॉनपेक्षा कमी जाडीचे प्लास्टिक किंवा PVC बॅनर | | |

**संदर्भ:** ***Press Information Bureau (pib.gov.in)***

## १.२.५ प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल युज प्लास्टिकवर (SUP) बंदी)








कर्जत नगरपरिषद

***<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.</u>***

# १.२.६ जैववैद्यकीय (बायो-मेडिकल) कचरा व्यवस्थापन — गुण १००

**जैव वैद्यकीय कचऱ्याला रुग्णालयातील कचरा देखील म्हणतात. यामध्ये संसर्गजन्य किंवा संभाव्य संसर्गजन्य पदार्थ असलेल्या कचऱ्याचा समावेश असतो. या प्रकारच्या कचऱ्यामध्ये पॅकेजिंग, वापरलेल्या वैद्यकीय पट्ट्या/मलमपट्ट्या आणि इन्फ्युजन किट यांसारख्या वैद्यकीय किंवा प्रयोगशाळेच्या रोजच्या कामांशी संबंधित असलेल्या वस्तूंचा समावेश होतो. याशिवाय जैविक अणू किंवा जीव यासारखा संशोधन प्रयोगशाळांमधील कचरा समाविष्ट असतो. हा कचरा पर्यावरणात सोडला जाऊ नये यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेत जैव वैद्यकीय कचऱ्याचे कशाप्रकारे नियोजन केले जाते व किती कार्यक्षमतेने त्याची विल्हेवाट लावली जाते हे या निर्देशकाद्वारे तपासले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | सर्व आरोग्य सेवा आणि वैद्यकीय व्यावसायिक हे सार्वजनिक जैव वैद्यकीय कचरा व्यवस्थापन (CBWTF) केंद्राचे सदस्य आहेत. | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |
| २. | कार्यात्मक बायोमेडिकल कचरा प्रक्रिया केंद्र | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |
| ३. | आरोग्य सेवा केंद्रामध्ये विलगित बायोमेडिकल वेस्टचे संकलन आणि पुर्वप्रक्रिया | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |
| ४. | शास्त्रोक्त पद्धतीने पुर्वाप्रक्रिया केलेल्या कचऱ्याला सार्वजनिक जैव वैद्यकीय कचरा व्यवस्थापनाला पाठवल्याची टक्केवारी (Relative Marking) | | २५ |

**आवश्यक तपशील:**

- स्थानिक संस्थेच्या CBWTF साइटवर जैव वैद्यकीय कचऱ्याचे संकलन, विलगीकरण, निर्जंतुकीकरण आणि विल्हेवाट लावण्यासाठीच्या यंत्रणेचा तपशील- बायोमेडिकल वेस्ट डिस्पोजलचे लॉगबुक –
- कार्यात्मक बायोमेडीकल कचरा प्रक्रिया केंद्राचे स्थान- गूगल माप लिंक (Size १ ते २ MB).
- संकलन, वाहतूक आणि विल्हेवाट लावण्यासाठी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने (MPCB) अधिकृत केलेल्या जैव वैद्यकीय कचऱ्याचे व्यवस्थापन सुविधा केंद्राशी - करार.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 3 GOOD HEALTH AND WELL-BEING | **SDG ३. आरोग्य व लोककल्याण** | ३.९ : २०३० पर्यंत, घातक रसायने आणि हवा, पाणी आणि माती प्रदूषण आणि दूषिततेमुळे मृत्यू आणि आजारांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करणे. |
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |

# जैव-वैद्यकीय कचरा व्यवस्थापन

## जैव-वैद्यकीय कचऱ्याची योग्य विल्हेवाट लावणे का गरजेचे आहे?

- जैव-वैद्यकीय कचरा मानव आणि पर्यावरणासाठी धोकादायक असू शकतो कारण त्याने संसर्गजन्य जीवाणू आणि विषाणू वातावरणात पसरू शकतात आणि प्रसारित होऊ शकतात.
- जैव-वैद्यकीय कचरा व्यासास्थापन नियम, २०१६ च्या अनुसूची १ नुसार विहित केलेल्या सांकेतिक रंगीत पिशव्या / डब्यांमध्ये जैव वैद्यकीय कचरा योग्यरित्या वेगळा करून साठवला गेला नाही तर पाणी, माती आणि हवा दुषित होऊ शकते.

**जैव-वैद्यकीय कचरा व्यासास्थापन नियम, २०१६ खालील आस्थापनांमधून आणि त्यातील जैव-वैद्यकीय कचरा निर्माण करणे, हाताळणे, वेगळे करणे, साठवणे आणि गोळा करणे यात सहभागी असलेल्या सर्व व्यक्तींना लागू होतात.**

| जैव-वैद्यकीय कचरा नियम, २०१६ लागू असलेल्या आस्थापनांची यादी | | | |
|---|---|---|---|
| १ | रुग्णालये | ११ | चिकित्सक आस्थापना |
| २ | नर्सिंग होम | १२ | संशोधन आणि शैक्षणिक संस्था |
| ३ | चिकित्सालय | १३ | पॅथॉलॉजिकल आस्थापना |
| ४ | दवाखाने | १४ | आरोग्य शिबिरे, वैद्यकीय शिबिरे |
| ५ | पशुवैद्यकीय संस्था | १५ | लसीकरण शिबिरे, रक्तदान शिबिरे |
| ६ | प्राण्यांची घरे | १६ | शाळा आणि महाविद्यालयांचे प्रथमोपचार कक्ष |
| ७ | रक्तपेढ्या | १७ | न्यायवैद्यक प्रयोगशाळा |
| ८ | आयुष रुग्णालये | १८ | संशोधन प्रयोगशाळा |

## जैव-वैद्यकीय कचरा व्यवस्थापनासाठी डब्यांचे सांकेतिक रंग

मानवी/प्राण्यांचे शरीराचे अवयव, कापूस, मलमपट्टी, कालबाह्य/काढून टाकलेली औषधे, रासायनिक/द्रव कचरा, शरीरातील द्रवांनी डागलेले टाकून दिलेले कापड, वैद्यकीय कचरा.

**पिवळा सांकेतिक वर्ग**

दूषित पुनर्वापर करण्यायोग्य कचरा जसे की IV बाटल्या, नळ्या, सिरिंज, इंजेक्शन, कॅथेटर आणि मूत्र पिशव्या, रक्त पिशव्या आणि इतर दूषित प्लास्टिक आणि रबर उत्पादने.

**लाल सांकेतिक वर्ग**

वापरलेल्या तीक्ष्ण धातूच्या वस्तू जसे की सुया, सुया जोडलेले सिरिंज, स्कॅलपल्स, ब्लेड, रेझर आणि इतर दूषित धातूची साधने.

**पांढरी सांकेतिक वर्ग**

तुटलेल्या काचेच्या बाटल्या, कुपी, चंबूकी, इंजेक्शनच्या बाटल्या, सूक्ष्मदर्शक पट्ट्या आणि इतर कोणत्याही टाकाऊ काचेच्या वस्तू आणि धातूचे शरीर रोपण

**निळी सांकेतिक वर्ग**

## १.२.६ जैव-वैद्यकीय (बायो-मेडिकल) कचरा व्यवस्थापन







सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

# १.२.७ ई-कचरा व्यवस्थापन

**गुण १००**

**ई-कचऱ्यावर केल्या जाणाऱ्या शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया न केल्यामुळे मानवी आरोग्यावर विपरित परिणाम होतात आणि पर्यावरणाचे प्रदूषण होते. ई-कचऱ्याचे योग्य प्रकारे विलगीकरण आणि संकलन करून तो अधिकृत विघटन करणाऱ्या/पुनर्वापरकर्त्याकडे पाठवला जाईल याची खात्री करणे हे स्थानिक स्वराज्य संस्थेचे कर्तव्य आहे. ई-कचऱ्याची शास्त्रोक्त पद्धतीने विल्हेवाट लावण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेने घेतलेल्या पुढाकारांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| मूल्यमापन कार्यपद्धती | | | गुण |
|---|---|---|---|
| १. | ई-कचऱ्याचे योग्य विलगीकरण करण्याबाबत जनजागृती उपक्रम (Relative Marking) | | २० |
| | स्थानिक स्वराज्य संस्थेच्या रहिवाशांसाठी जागरूकता उपक्रम | १० | |
| | स्थानिक स्वराज्य संस्थेच्या अधिकाऱ्यांसाठी क्षमता वृद्धी सत्र | १० | |
| २. | ई-कचरा संकलन आणि विलगीकरण यंत्रणा | | २० |
| | होय | २० | |
| | नाही | ० | |
| ३. | कार्यरत संकलन केंद्र | | २० |
| | होय | २० | |
| | नाही | ० | |
| ४. | अधिकृत विघटनकर्त्यांद्वारे/ पुनर्वापरकर्त्यांद्वारे शास्त्रोक्त पद्धतीने/जबाबदारीने प्रक्रिया केलेल्या ई-कचऱ्याचे प्रमाण (किलोमध्ये) (Relative Marking) | | २० |
| ५. | ई-कचऱ्यातून बॅटरीचे विलगीकरण | | २० |
| | होय | २० | |
| | नाही | ० | |

**आवश्यक तपशील:**

- ई-कचऱ्याचे योग्य विलगीकरण करण्याबाबत जनजागृती उपक्रमांचा आणि योग्य विलगीकरण करण्याबाबत क्षमता वृद्धी सत्रांचा तपशील विहित केलेल्या एक्सेल मध्ये.
- स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रात उपलब्ध असलेली ई-कचरा संकलन आणि विलगीकरण यंत्रणा (जसे की, कचरा संकलन केंद्राची स्थापना, मोबाईल ई-कचरा संकलन इ.)
- अधिकृत प्रमाणपत्र असलेल्या अधिकृत विघटनकर्ता/पुनर्वापरकर्त्यांद्वारे स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये ई-कचरा गोळा करण्याच्या यंत्रणेचा तपशील- लॉगबुक
- ई-कचरा संकलन आणि प्रक्रियेच्या विविध टप्प्यावर (आधी-दरम्यान-नंतर) काढलेली जिओटॅग छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने अधिकृत केलेल्या विघटनकर्ता (डिसमंटलर) किंवा पुनर्वापरकर्त्या सोबत करार
- सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.
- महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने अधिकृत केलेल्या ई-कचरा पुनर्वापर करणाऱ्यांची यादी: ListofEWaste20082021.pdf (mpcb.gov.in)

| | | |
|---|---|---|
| | **SDG ११. शाश्वत शहरे व समुदाय** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |
| | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |

# कार्यरत ई-कचरा संकलन केंद्र

**'ई-कचरा' म्हणजे विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक उपकरणे, संपूर्ण किंवा अंशतः कचरा म्हणून टाकली जाणारी विद्युत उपकरणे, यांसह सोलर छायाचित्रे -व्होय ल्टेइक मॉड्यूल्स/पॅनेल किंवा सेल, उत्पादन, नूतनीकरण आणि दुरुस्ती प्रक्रियेतून नाकारली जाणारी उपकरणे.**

| संकलन केंद्रांसाठी नियमावली | संकलन केंद्रांचे कार्य |
|---|---|
| संकलन केंद्र उत्पादक/विघटनकर्ता/पुनर्वापरकर्ता/नूतनीकरणकर्ता यांच्या वतीने ई-कचरा गोळा करून साठवू शकतो आणि तो अधिकृत विघटन/पुनर्वापर करणाऱ्यांना हस्तांतरित करू शकतो. | संकलन केंद्राकडे आलेल्या प्रत्येक सामानाचे वजन करण्यासाठी संकलन केंद्रात वजन मोजण्याची उपकरणे असणे आवश्यक आहे आणि या संदर्भात नोंद ठेवणे आवश्यक आहे. |
| जिथे निवासी भाग, व्यावसायिक संकुल, शैक्षणिक आणि संशोधन संस्था, निवासी कल्याणकारी संघटना (RWAs) आहेत त्या भागात संकलन केंद्र/पेट्या असू शकतात, ज्याद्वारे येथून ई-कचरा गोळा केला जाऊ शकतो. | संकलन केंद्राने संकलित केलेल्या ई-कचऱ्याच्या नोंदी ठेवाव्यात आणि संबंधित उत्पादकांना त्याचा हिशोब द्यावा. |
| ई-कचरा संकलन गाड्यांचा वापर संस्थांकडून ई-कचरा गोळा करण्यासाठी केला जाऊ शकतो आणि अशा गाड्या संकलन केंद्रांशी जोडल्या जातील. | कोणत्याही संकलन केंद्राची साठवण क्षमता प्रक्रिया केल्या जाणाऱ्या कचऱ्याच्या प्रमाणाशी (वजन आणि संख्या) सुसंगत असावी. |
| संकलन केंद्रातील साहित्य केवळ अधिकृत विघटन करणाऱ्यांना आणि पुनर्वापरकर्त्यांना पाठवले जावे. | संकलन केंद्रामध्ये योग्य अग्निशमन व्यवस्था तसेच आपत्कालीन परिस्थितीत बाहेर पडण्यासाठी सुटकेचे मार्ग असणे आवश्यक आहे. |
| संकलन केंद्रांची संख्या ई-कचऱ्याच्या निर्मितीच्या तुलनेत योग्य प्रमाणात आणि सुनियोजित असावी. | ई-कचरा साठवण्यासाठी आच्छादित आडोसा/जागा वापराव्यात. |
| उत्पादकांनी त्यांच्या स्वत:च्या संकलन केंद्रांचा तपशील नमूद करावा. | संकलन केंद्राने ई-कचरा उत्पादन श्रेणीनुसार साठवला पाहिजे. |

**टीप: कृपया ई-कचरा (व्यवस्थापन) नियम, २०१६ च्या अंमलबजावणीमधील मार्गदर्शक तत्त्वे :**
*https://cpcb.nic.in/displayपीडीएफ.php?id=aHdtZC9HVUlERUxJTkVTX0VXQVNURV9SVUxFU18yMDE2LnBkZg*

# १.२.७ ई-कचरा व्यवस्थापन












*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

## १.२.८ स्वच्छतेचा दर्जा — गुण २००

**उघड्यावर शौच केल्यामुळे माती आणि जल प्रदूषण होते. केंद्र शासनाने नागरिकांच्या वर्तणुकीत बदल घडवून देशाला हागणदारीमुक्त करण्याला अत्यंत महत्त्व दिले आहे. सहभागी स्थानिक स्वराज्य संस्थानी त्यांच्या क्षेत्राला हागणदारीमुक्त करण्यासाठी महत्त्व दिले आहे की नाही याचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

<table>
<tr><th colspan="3">मूल्यमापन कार्यपद्धती</th><th>गुण</th></tr>
<tr><td rowspan="4">१.</td><td colspan="2">ODF</td><td rowspan="4">१००</td></tr>
<tr><td>Water +</td><td>१००</td></tr>
<tr><td>ODF ++</td><td>९०</td></tr>
<tr><td>ODF +</td><td>७५</td></tr>
<tr><td rowspan="5">२.</td><td colspan="2">कचरा मुक्त शहरे (GFC) रेटिंग</td><td rowspan="5">१००</td></tr>
<tr><td>७ स्टार</td><td>१००</td></tr>
<tr><td>५ स्टार</td><td>७५</td></tr>
<tr><td>३ स्टार</td><td>५०</td></tr>
<tr><td>१ किंवा एकही स्टार नसल्यास</td><td>०</td></tr>
</table>

**आवश्यक तपशील:**

- ❑ सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्राप्त झालेले व वैध असलेले ODF+, ODF++, Water + प्रमाणपत्र
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यानचे वैध प्रमाणपत्र मूल्यमापनासाठी विचारात घेतले जाईल.
- ❑ ODF+, ODF++ आणि Water + स्थितीवर आधारित मूल्यांकन केले जाईल.
- ❑ GFC स्टार रेटिंग: माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यानच्या वैध प्रमाणपत्राची प्रत
- ❑ **सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.**

SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन

१२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे.

१२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे.

# वायू

## एकूण गुण

**अमृत शहरांसाठी: ३,८२५ गुण**

**अमृत शहरे वगळता: ३,३२५ गुण**



| २ | वायू |
|---|---|

| अ/क्र. | कृती बिंदु | गुण |
|---|---|---|
| २.१ | **वायू गुणवत्ता परिक्षण** - पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEFCC) किंवा NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेद्वारे | ६०० |
| २.२ | **वायू प्रदूषण कमी करणे** | |
| २.२.१ | फटाक्यांवर बंदी घालण्याकरिता पुढाकार | १७५ |
| २.२.२ | नागरिकांमध्ये चांगल्या सवयींना प्रोत्साहन- सायकलिंग ट्रॅकची निर्मिती आणि पादचारी मार्ग | १२५ |
| २.२.३ | बांधकाम व पाडकाम कचऱ्याचे व्यवस्थापन | ३०० |
| २.३ | **इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरणाची प्रभावी अंमलबजावणी** | |
| २.३.१ | इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरण : इलेक्ट्रिक वाहनांची संख्या | १,००० |
| २.३.२ | इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्टेशनची संख्या | ६०० |
| २.४ | **ध्वनी प्रदूषण कमी करणे** | १७५ |
| २.५ | **वातावरणीय बदल (Climate Change) आणि आपत्ती व्यवस्थापनाची तयारी** | ३५० |
| २.६ | **वातावरणीय कृती नियोजन (फक्त अमृत गटासाठी)** | ५००* |
| | **अमृत शहरांसाठी** | **३,८२५** |
| | **अमृत शहरे वगळता** | **३,३२५** |

* केवळ ४३ अमृत शहरांसाठी

| २.१ | वायू गुणवत्ता परिक्षण - पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEFCC) किंवा NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेद्वारे | गुण ६०० |
|---|---|---|

**स्वच्छ श्वास घेणे निरोगी जीवन जगण्यासाठी गरजेचे आहे (UNEP). अनेक कारणांमुळे हवेची गुणवत्ता सतत खालावत असल्यामुळे याचा लाखो लोकांवर परिणाम होत आहे. या निर्देशकाचा उद्देश स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांच्या क्षेत्रातील हवेच्या गुणवत्तेचे परीक्षण करण्यासाठी प्रोत्साहित करणे आणि त्यात सुधारणा करण्यासाठी पुढाकार घ्यायला लावणे हा आहे.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | | गुण |
|---|---|---|---|---|
| १. | MoEFCC / NABL प्रमाणित आणि मान्यताप्राप्त प्रयोगशाळांकडून वायू गुणवत्ता निरीक्षण अहवाल | | | ३०० |
| | **अमृत शहरे** | **अमृत शहरे वगळता** | | |
| | ▪ ६ किंवा अधिक अहवाल | ▪ ४ किंवा अधिक अहवाल | ३०० | |
| | ▪ ५ अहवाल | ▪ ३ अहवाल | २०० | |
| | ▪ ४ अहवाल | ▪ २ अहवाल | १०० | |
| | ▪ ४ पेक्षा कमी अहवाल | ▪ २ पेक्षा कमी अहवाल | ० | |
| २. | व्हिजिबल सार्वजनिक डिस्प्लेसह वायू गुणवत्ता निरीक्षण केंद्रांची एकूण संख्या (Relative Marking) | | १०० | १०० |
| | व्हिजिबल सार्वजनिक डिस्प्ले नसलेल्या वायू गुणवत्ता निरीक्षण केंद्रांची एकूण संख्या (Relative Marking) | | ७५ | |
| ३. | **वायू प्रदूषण हॉटस्पॉट्स** | | | ५० |
| | वायू प्रदूषणाच्या हॉटस्पॉट्सची निवड | | २५ | |
| | निवड केलेल्या वायू प्रदूषणाचे हॉटस्पॉट्स कमी करण्यासाठी केलेल्या अल्पकालीन उपाय योजना | | २५ | |
| ४. | हवेची गुणवत्ता सुधारण्यासाठी दीर्घकालीन आरखडा/कृती बिंदू | | | ५० |
| ५. | वायु गुणवत्ता निर्देशांक "चांगला/समाधानकारक" असलेल्या दिवसांची संख्या | | | १०० |

**आवश्यक तपशील:**

- पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEFCC) / NABL प्रमाणित आणि मान्यताप्राप्त प्रयोगशाळांद्वारे वायू गुणवत्ता निरीक्षण अहवाल: ($PM_{2.5}$, $PM_{10}$, $SO_2$ आणि $NO_x$).
    - *२४ तास सातत्याने निरीक्षण*
    - *वायू गुणवत्ता निर्देशांक (air quality index)*
    - *वायू प्रदूषणाचे प्रमाण अधिक असणाऱ्या गर्दीच्या ठिकाणी निरीक्षण करणे आवश्यक.*
- दोन अहवालांमध्ये किमान १ महिन्याचे अंतर असावे.
- जिओटॅग छायाचित्रे (Size १ ते २ MB): सभोवतालच्या वायूच्या गुणवत्तेचे सातत्याने निरीक्षण करणारी केंद्रे आणि त्यांच्या स्थानांचा तपशील.
- शहरातील प्रदूषण हॉटस्पॉट्सची यादी आणि त्याचे मॅपिंग.
- निवड केल्या गेलेल्या वायू प्रदूषणाच्या हॉटस्पॉट्ससाठी अल्पकालीन उपाय योजनांची रूपरेषा सांगणाऱ्या अहवालाची प्रत.
- हवेच्या गुणवत्तेच्या सुधारणेसाठी दीर्घकालीन आराखडा/कृती बिंदूंची रूपरेषा देणाऱ्या अहवालाची प्रत.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ३. आरोग्य व लोककल्याण** | ३.९ : २०३० पर्यंत, घातक रसायने आणि हवा, पाणी आणि माती प्रदूषण आणि दूषिततेमुळे मृत्यू आणि आजारांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करणे. |
| | **SDG ११. शाश्वत शहरे व समुदाय** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |

# वायू प्रदूषण हॉटस्पॉट

वायू प्रदूषण हॉटस्पॉट्स ही अशी ठिकाणे आहेत ज्या ठिकाणी वायू प्रदूषकांचे उत्सर्जन अधिक असते आणि याचा लोकांच्या आरोग्यवर परिणाम होण्याची संभावना असते. वायू प्रदूषण हॉटस्पॉट्स स्त्रोत, प्रदूषक आणि वेळ विशिष्ट असू शकतात.

| वाहतूक | ऊर्जा निर्मिती | कचरा | उद्योग | बांधकाम |
|---|---|---|---|---|

**शहरी भागात वायू प्रदूषणाचे हॉटस्पॉट्स**



वाहतूक कोंडी



उद्योग



कचरा जाळणे



बांधकाम व पाडकाम

**वायू प्रदूषण हॉटस्पॉट्स कमी करण्याचे मार्ग**

उपायांमध्ये नियामक उपाय आणि तांत्रिक उपायांचा समावेश आहे, जसे की :

१. **नियामक उपाय** - कठोर उत्सर्जन मानके, पर्यावरणीय क्षेत्रनिर्मिती , निवडलेल्या हॉटस्पॉटची देखरेख.

२. **वाहतूक व्यवस्थापन** - सार्वजनिक वाहतूक आणि इलेक्ट्रिक वाहनांच्या वापरास प्रोत्साहन.

३. **औद्योगिक उत्सर्जन नियंत्रण** –हरित तंत्रज्ञान, प्रदूषण नियंत्रण उपकरणे.

४. **निवासी आणि व्यावसायिक उपाय** - ऊर्जा कार्यक्षमतेत वाढ, कचरा उघड्यावर जाळण्याची बंदी.

५. **तांत्रिक नाविन्यता** - उत्सर्जन कमी करण्यासाठी तंत्रज्ञान.

## २.१ वायू गुणवत्ता परिक्षण - पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEFCC) किंवा NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेद्वारे













***<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.</u>***

| २.२.१ | फटाक्यांवर बंदी घालण्याकरिता पुढाकार | गुण १७५ |
|---|---|---|

**सण-उत्सव, कार्यक्रमांच्या निमित्ताने फटाके वाजवले जातात. त्यांच्यामध्ये कार्बन आणि सल्फर मोठ्या प्रमाणात असते आणि ते विषारी वायू हवेत सोडतात. हा विषारी वायू वनस्पती आणि प्राणी दोघांनाही हानिकारक आहे. पर्यावरणाच्या हितासाठी फटाक्यांच्या वापरावर बंदी घालणे आवश्यक आहे. या उद्देशाने या निर्देशकाच्या माध्यमातून स्थानिक स्वराज्य संस्था फटाके बंदीच्या दृष्टीने कशी अंमलबजावणी करत आहेत, याची पडताळणी केली जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | फटाके विक्री आणि वापरावर बंदी घातलेल्या आदेशाची प्रत | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |
| २. | वृत्तपत्रात प्रकाशित झालेल्या आदेशाची/सूचनेची प्रत | | २५ |
| ३. | स्थानिक स्वराज्य संस्थांनी घेतलेल्या जनजागृती कार्यक्रम/ उपक्रमांची संख्या **(Relative Marking)** | | ५० |
| | शैक्षणिक संस्थांमध्ये आयोजित केलेल्या जनजागृती कार्यक्रम/उपक्रमांची संख्या | ३० | |
| | शैक्षणिक संस्थांव्यतिरिक्त आयोजित केलेल्या जनजागृती कार्यक्रम/उपक्रमांची संख्या | २० | |
| ४. | सण उत्सवाच्या संध्याकाळी/दुसऱ्या दिवशी सकाळचा वायू गुणवत्ता निरीक्षण अहवाल – AQI - राष्ट्रीय वायू गुणवत्ता निर्देशांकानुसार. | | ७५ |
| | ०-१०० (उत्तम/समाधानकारक) | ७५ | |
| | १०१- २०० (सामान्य) | ५० | |
| | २०१ – ५०० (खराब/ खूप खराब/तीव्र) | ० | |

**आवश्यक तपशील:**

- स्थानिक प्राधिकरणांकडून फटाके विक्री आणि वापरावर बंदी घातलेल्या अधिसूचनेची प्रत.
- वृत्तपत्रात प्रकाशित झालेल्या आदेशाचा/सूचनेचे छायाचित्र/वेबपेजची लिंक.
- जनजागृती कार्यक्रमांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- जनजागृती कार्यक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- उत्सवाच्या संध्याकाळी/उत्सवाच्या दुसऱ्या दिवशी सकाळी MoEFCC/NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळांकडून वायू गुणवत्ता निरीक्षण अहवाल.
- राष्ट्रीय वायू गुणवत्ता निर्देशांक: https://app.cpcbccr.com/AQI_India/
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ११. शाश्वत शहरे व समुदाय** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |
| | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |

## २.२.१ फटाक्यांवर बंदी घालण्याकरिता पुढाकार









फलटण नगर परिषद, फलटण, जि सातारा

Paper Notification

जाहीर आवाहन

फलटण नगर परिषद, फलटण

परदेशी फटाके विक्री, वापर,बंदी अधिसूचना

<u>*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*</u>

| २.२.२ | नागरिकांमध्ये चांगल्या सवयींना प्रोत्साहन- सायकलिंग ट्रॅकची निर्मिती | गुण १२५ |
|---|---|---|

## २.२.२ नागरिकांमध्ये चांगल्या सवयींना प्रोत्साहन- सायकलिंग ट्रॅकची निर्मिती

**गुण १२५**

**वाहनविरहित वाहतुकीमुळे वायू प्रदूषण मोठ्या प्रमाणात कमी होऊ शकते. सायकल हे भारतीयांतर्फे युगानुयुगे वापरले जाणारे, परवडणारे, मोटार नसलेले वाहतुकीचे एक माध्यम आहे. सायकलिंगसाठी सुलभ आणि स्वतंत्र मार्ग नसणे, यांसारख्या पायाभूत सुविधांचा अभाव नागरिकांना त्यांच्या दैनंदिन व्यवहारात सायकल न वापरण्यास प्रवृत्त करतो. हे निर्देशक, सायकलिंगला प्रोत्साहन देण्यासाठी मुख्य रस्त्यांवर सायकलिंग ट्रॅकची निर्मिती सुनिश्चित करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या कामांचे मूल्यमापन करते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान नव्याने तयार करण्यात आलेल्या अडथळा मुक्त सायकलिंग ट्रॅकची लांबी (कि. मी.मध्ये) (Relative Marking) | ७५ |
| २. | **अपकीप (Upkeep):**<br>माझी वसुंधरा अभियान ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान तयार करण्यात आलेल्या आणि देखभाल करण्यात आलेल्या अडथळा मुक्त सायकलिंग ट्रॅकची लांबी (कि. मी. मध्ये) (Relative Marking) | २५ |
| ३. | सायकल वापरास प्रोत्साहन देण्यासाठी आयोजित केलेल्या जनजागृती मोहिमा आणि उपक्रमांची संख्या (सायकल रॅली, सायकल मॅरेथॉन इ.) (Relative Marking) | २५ |

**आवश्यक तपशील:**

- स्थानाचे (लोकेशन) तपशील: संपूर्ण पत्ता, नव्याने तयार केलेल्या सायकलिंग ट्रॅकच्या लांबीसह गुगल मॅपवर प्रकल्पाचे स्थान (**कि. मी.मध्ये**)
- माझी वसुंधरा अभियान ३.०, ४.०, ५.० दरम्यान तयार केलेले आणि ६.० दरम्यान नव्याने तयार करण्यात आलेले सायकल ट्रॅक अडथळा मुक्त असावेत म्हणजेच सायकलिंग ट्रॅकवर कोणतेही चिरंतन किवा निम्मचिरंतन रचना नसावी आणि सायकलिंग ट्रॅक सुस्थितीत असावेत म्हणजेच खड्डे आणि दगडधोंडे नसावेत) आणि त्यांची देखभाल करण्यात यावी.
- सायकल ट्रॅकची विविध टप्प्यावर (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- जनजागृती मोहिमेचा तपशील- विहित एक्सेल फॉरमॅटमध्ये.
- जनजागृती मोहिमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size 1 ते 2 MB) आणि सायकल वापराच्या प्रोत्साहनासाठी आणि सायकल पार्किंग सुविधांसाठी उपक्रम.
- कार्यारंभ आदेश व कार्य पूर्णत्व प्रमाणपत्राची प्रत
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.
- स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेली माहिती माझी वसुंधरा अभियान ३.०, ४.०, आणि ५.० दरम्यान MIS मध्ये भरलेल्या माहितीशी जुळत नसल्यास, कोणतेही गुण दिले जाणार नाहीत. (केवळ अपकीपसाठी - Upkeep) लागू)

| | | |
|---|---|---|
| | **SDG ११. शाश्वत शहरे व समुदाय** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |
| | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |

## २.२.२ नागरिकांमध्ये चांगल्या सवयींना प्रोत्साहन- सायकलिंग ट्रॅकची निर्मिती










***<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.</u>***

## २.२.३ बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन — गुण ३००

बांधकाम पाडकामाच्या ठिकाणांवरून निघणाऱ्या धुळीमुळे ३० टक्के वायू प्रदूषण होते. बांधकाम आणि पाडकाम (कन्स्ट्रक्शन अँड डेमोलिशन (C&D) कचऱ्याचे शास्त्रोक्त पद्धतीने व्यवस्थापन केल्यास वायू प्रदूषण कमी करण्यात महत्त्वाची भूमिका बजावते. बांधकाम आणि पाडकाम कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ नुसार स्थानिक स्वराज्य संस्थांना "त्यांच्या अधिकारक्षेत्रातील बांधकाम आणि पाडकाम कचऱ्याचे योग्य व्यवस्थापन" करण्याची शिफारस करतो. स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापनासाठी केलेल्या कामांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | योग्य कव्हर असलेल्या बांधकाम व पाडकाम कचरा साठवणुकीसाठी उपलब्ध जमीन/क्षेत्राची निवड | | ५० |
| २. | संकलनासाठी असलेली वाहने | | ७५ |
| | GPS ट्रॅकर असलेली वाहने | ७५ | |
| | GPS ट्रॅकर नसलेली वाहने | ५० | |
| ३. | बांधकाम व पाडकाम कचऱ्याचे विलगीकरण | | २५ |
| ४. | बांधकाम व पाडकाम कचरा प्रक्रिया सुविधा | | ७५ |
| | कार्यरत प्रक्रिया केंद्र | ७५ | |
| | निविदा मागवल्या असल्यास | ५० | |
| ५. | बांधकाम व पाडकाम कचऱ्याच्या पुनर्वापराची रची टक्केवारी **(Relative Marking)** | | २५ |
| ६. | योग्य कव्हर असलेल्या बांधकाम ठिकाणांची टक्केवारी **(Relative Marking)** | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- कचरा साठवण्यासाठी निवडल्या गेलेल्या जमिनीचा/क्षेत्राचा तपशील आणि गुगल मॅप लिंक.
- बांधकाम व पाडकाम कचरा गोळा करण्यासाठी GPS ट्रॅकर असलेल्या व नसलेल्या वाहनांचे लॉगबुक/नोंदणीपत्र.
- विलगीकरण केलेल्या बांधकाम व पाडकाम कचऱ्याचे वर्गीकरण- लॉगबुकसह.
- एकूण संकलित, विलगीकरण आणि पुनर्वापर केला जाणारा बांधकाम व पाडकाम कचऱ्याचा तपशील (टनमध्ये )- लॉगबुकसह.
- बांधकाम ठिकाणावर धूळ प्रदूषण नियंत्रित करण्यासाठी बांधकाम ठिकाण योग्यरित्या झाकल्या पाहिजेत.
- बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन प्रक्रियेची टप्प्याटप्प्याने जिओटॅग केलेली छायाचित्रे (size १ ते २ MB).
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ११. शाश्वत शहरे व समुदाय** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |
| | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |

# बांधकाम आणि पाडकाम कचरा व्यवस्थापन

- बांधकाम आणि पाडकाम कचरा हा बांधकाम, नूतनीकरण आणि इमारत पाडल्यानंतर निर्माण होतो.
- हा कचरा भारताच्या महापालिकेच्या घनकचऱ्याचा खूप मोठा भाग आहे. यामध्ये काँक्रीट, विटा, लाकूड, काच, स्टील आणि प्लास्टिक यासारख्या दुरुस्ती व पुनर्निर्माण बांधकाम साहित्यांचा समावेश आहे.
- बिल्डिंग मटेरियल प्रमोशन कौन्सिल (BMPTC) नुसार, भारतात दरवर्षी अंदाजे १५० दशलक्ष टन बांधकाम आणि पाडकाम (C&D) कचरा निर्माण होतो.

## बांधकाम आणि पाडकाम  कचऱ्याचे व्यवस्थापन या पद्धतीने करावे

जागे वरती विलगीकरण → संकलन जागेची निवड → वाहतूक व्यवस्थापन कचरा वाहतूक करण्यासाठी यंत्रणा उभारणे → कचरा प्रक्रिया संयंत्र कचऱ्याची पूर्वप्रक्रिया आणि मुख्य प्रक्रिया → पुनर्वापर आणि पुनर्प्राप्ती

## बांधकाम आणि पाडकाम  कचऱ्याद्वारे वायू प्रदूषण कमी करण्यासाठी बांधकामाच्या ठिकाणावरील उपाय



पाणी फवारणी



जाळीच्या मदतीने धूळ रोखणे



कचरा असलेले ट्रक झाकणे

## २.२.३ बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन










***सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.***

# २.३.१ इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरण: इलेक्ट्रिक वाहने

**गुण १,०००**

**जीवाश्म इंधनावरचे अवलंबित्व कमी करण्यासाठी, हरितगृह वायू उत्सर्जन कमी करण्यासाठी आणि ऊर्जा कार्यक्षमता सुधारण्यासाठी इलेक्ट्रिक वाहतूक (ई-वाहतूक) हे सर्वात अनुकूल तंत्रज्ञान आहे. महाराष्ट्र राज्य इलेक्ट्रिक वाहन धोरण, २०२१ ही "राज्यात बॅटरी इलेक्ट्रिक व्हेईकल (BEVs) च्या अवलंबनाला गती देऊन २०२५ पर्यंत नवीन वाहनांच्या नोंदणीमध्ये १०% योगदान मिळविण्याचे उद्दिष्ट आहे. रस्त्यावरील वाहनांच्या विद्युतीकरणाला चालना देण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेने घेतलेल्या पुढाकारांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान स्थानिक स्वराज्य संस्था क्षेत्रात नोंदणीकृत ई-वाहने **(Relative Marking)** | | ३०० |
| | दुचाकी ई-वाहन | ५० | |
| | तीनचाकी ई-वाहन | ५० | |
| | चारचाकी ई-वाहन | १०० | |
| | ई-बस | १०० | |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान स्थानिक स्वराज्य संस्थेने खरेदी केलेले/भाड्याने घेतलेले ई-वाहने **(Relative Marking)** | | २०० |
| ३. | सार्वजनिक ई-वाहन वाहतुकीची टक्केवारी **(Relative Marking)** | | २०० |
| | ७५% - १००% | २०० | |
| | ५०% - ७५% | १५० | |
| | २५% - ५०% | १०० | |
| | २५% पेक्षा कमी | ० | |
| ४. | ई-वाहन लास्ट माईल डिलिव्हरीची टक्केवारी **(Relative Marking)** | | २०० |
| | ९०%-१००% | २०० | |
| | ७५% - ९०% | १५० | |
| | ५०% पेक्षा कमी | ० | |
| ५. | स्थानिक स्वराज्य संस्थेने २०२५ च्या ईव्ही धोरणानुसार २०३० पर्यंत लक्ष्य पूर्ण करण्यासाठी कृती आराखडा तयार केला आहे का? | | १०० |

**आवश्यक तपशील:**

- प्रादेशिक परिवहन अधिकारी (आरटीओ) यांच्याकडून सविस्तर माहिती –
  - स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रातील नोंदणीकृत ई-वाहन - दुचाकी [2W], तीनचाकी [3W] आणि चारचाकी [4W], सार्वजनिक वाहने (बस) यांची संख्या.
  - स्थानिक स्वराज्य संस्थेने खरेदी केलेले/भाड्याने घेतलेले ई-वाहनांची संख्या-अहवाल pdf स्वरूपात.
- 250 वॅट क्षमतेच्या दुचाकींना आरटीओकडे नोंदणीची आवश्यकता नसल्यामुळे अशा ईव्ही विक्रेत्याकडून प्राप्त होणारा ईव्हीचा तपशील ग्राह्य धरला जाईल.
- स्थानिक स्वराज्य संस्थेत सार्वजनिक वाहतुकीसाठी वापरल्या जाणाऱ्या वाहनांची संख्या
- सार्वजनिक वाहतुकीसाठी वापरल्या जाणाऱ्या ई-वाहनांची संख्या – बस, कॅब, टॅक्सी.
- ग्राहक माल वितरक वाहतूकदार (लास्ट माईल डिलिव्हरी) /लॉजिस्टिक्ससाठी (ई-कॉमर्स/फूड डिलिव्हरी इ.) वापरल्या जाणाऱ्या ई-वाहनांचा तपशील.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ११. शाश्वत शहरे व समुदाय** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |
| | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |

## २.३.१ इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरण: इलेक्ट्रिक वाहने













*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

# २.३.२ इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्टेशन

**गुण ६००**

**वाहतूक हे वायू प्रदूषणाचे प्रमुख कारण आहे, मात्र जीवनाचा अविभाज्य भाग असल्याने तो टाळता येत नाही. इलेक्ट्रिक वाहनांचा (ईव्ही) अवलंब केल्याने शहरांमधील प्रदूषणाची पातळी कमी होऊ शकते. ई-वाहनांचा वापर करण्यासाठी पायाभूत सुविधांची अनुपलब्धता ही एक प्रमुख अडचण आहे. त्यामुळे, ई-वाहनांचा वापर वाढविण्याच्या अनुषंगाने पायाभूत सुविधा वाढविण्याकरिता प्रयत्न करणे महत्वाचे आहे. ई-वाहन चार्जिंग स्टेशन तयार करून ई-वाहतूक सुविधा विकसित करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या प्रयत्नांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान तयार केलेल्या ईव्ही चार्जिंग स्टेशनची संख्या **(Relative Marking)** | | १०० |
| | दुचाकी | ५० | |
| | चारचाकी | ५० | |
| २. | **Upkeep:**<br>माझी वसुंधरा अभियान २.० ,३.०, ४.० आणि ५.० दरम्यान स्थापित आणि देखभाल केलेल्या ईव्ही चार्जिंग स्टेशनची संख्या **(Relative Marking)** | | ५० |
| | दुचाकी | २५ | |
| | चारचाकी | २५ | |
| ३. | चार्जिंग स्टेशनवर उपलब्ध असलेल्या कार्यरत पॉइंट्सची एकूण संख्या. **(Relative Marking)** | | १०० |
| ४. | स्थानिक स्वराज्य संस्थेतील जलद चार्जिंग स्टेशनची टक्केवारी **(Relative Marking)** | | १०० |
| ५. | अक्षय उर्जेवर चालणाऱ्या चार्जिंग स्टेशनची संख्या **(Relative Marking)** | | १५० |
| ६. | स्थानिक स्वराज्य संस्थेने २०२५ च्या ईव्ही धोरणानुसार २०३० पर्यंत चार्जिंग पायाभूत सुविधेचे लक्ष्य पूर्ण करण्यासाठी कृती आराखडा तयार केला आहे का? | | १०० |

**आवश्यक तपशील:**

- माझी वसुंधरा अभियान २.०, ३.०, ४.०, ५.० आणि ६.० दरम्यान तयार केलेल्या ईव्ही चार्जिंग स्टेशनचे तपशील – विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- गुगल मॅपवर पूर्ण पत्ता, स्थान.
- ईव्ही चार्जिंग स्टेशनच्या वीज बिलाची प्रत.
- कार्यारंभ आदेश , कार्य पूर्णत्व प्रमाणपत्र आणि आर्थिक प्रगतीचा अहवाल .
- *महाराष्ट्र* **ईव्ही** *धोरण :* https://maitri.mahaonline.gov.in/PDF/EV%20Policy%20GR%202021.pdf
- **ईव्ही** चार्जिंग स्टेशनची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size 1 ते 2 MB).
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.
- स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेली माहिती माझी वसुंधरा अभियान २.०,३.०,४.० दरम्यान MIS मध्ये भरलेल्या माहितीशी जुळत नसल्यास, कोणतेही गुण दिले जाणार नाहीत. (केवळ अपकीपसाठी (Upkeep) लागू).

| | | |
|---|---|---|
| | **SDG ९. उद्योग, नाविन्यपूर्ण उपक्रम आणि पायाभूत सुविधा** | ९.१ : सर्वांसाठी परवडणाऱ्या आणि समान प्रवेशावर लक्ष केंद्रित करून आर्थिक विकास आणि मानवी कल्याणासाठी प्रादेशिक आणि सीमापार पायाभूत सुविधांसह गुणवत्तापूर्ण, विश्वासार्ह, टिकाऊ आणि लवचिक पायाभूत सुविधा विकसित करणे. |
| | **SDG ११. शाश्वत शहरे व समुदाय** | ११.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |

# ई-वाहनांची चार्जिंग चे वर्गीकरण

**१. पद्धत १** - AC चार्जिंग - केबल आणि प्लगचा वापर करून एक स्टँडर्ड सॉकेट आउटलेट वापरण्यात येते. सामान्यत: याची शिफारस केली जात नाही.

**२. पद्धत २** - AC चार्जिंग - केबल आणि प्लगचा वापर करून अंतर्भूत संरक्षण आणि नियंत्रण क्षमतेसह एक स्टँडर्ड सॉकेट आउटलेट वापरण्यात येते. हे घरगुती चार्जिंगसाठी वापरले जाते.

**३. पद्धत ३** - AC चार्जिंग - ई-वाहनाला वीज पुरवण्यासाठी वेगळे उपकरण वापरले जाते. ही पद्धत व्यावसायिक किंवा सार्वजनिक चार्जिंग करण्यासाठी वापरली जाते.

**४. पद्धत ४** - DC चार्जिंग - ई -वाहनाला वीज पुरवण्यासाठी वेगळे उपकरण वापरले जाते. ही पद्धत व्यावसायिक किंवा सार्वजनिक चार्जिंग करण्यासाठी वापरली जाते..

## पॉवर लेव्हल (पॉवर रेटिंग) नुसार ईव्ही चार्जिंगचे वर्गीकरण खाली दिले आहे:

| | पॉवर लेव्हल (P) | विद्युत प्रवाह | सुसंगत EV वाहन प्रकार |
|---|---|---|---|
| सामान्य पॉवर चार्जिंग | P ≤ 7kW | AC & DC | दु-चाकी, तीन-चाकी, ई-कार आणि एक टनापर्यंत वजन असणारी हलकी व्यावसायिक वाहने |
| | 7 kW < P ≤ 22kW | AC & DC | |
| उच्च पॉवर चार्जिंग | 22kW < P ≤ 50kW | DC | ई-कार आणि एक ते सहा टनापर्यंत वजन असणारी हलकी व मध्यम व्यावसायिक वाहने |
| | 50kW < P < 200kW | DC | |

**संदर्भ**: https://www.niti.gov.in/sites/default/files/2021-08/HandbookforEVChargingInfrastructureImplementation081221.pdf

# २.३.२ इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्टेशन












*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

| २.४ | ध्वनी प्रदूषण कमी करणे | गुण १७५ |
|---|---|---|

ध्वनी प्रदूषण म्हणजे त्रासदायक ध्वनी ज्याचा मानव आणि प्राण्यांच्या आरोग्यावर दुष्परिणाम होतो. नैसर्गिक घटना आणि मानवी कृतींमुळे ध्वनी प्रदूषण होते. ह्यात मुख्य कारण मानवनिर्मित स्रोत म्हणजे औद्योगिक सुविधा, विमाने, लाऊडस्पीकर, फटाके इ. उच्च आवाजात वापरल्यास, काही इतर उपकरणे देखील ध्वनी प्रदूषणात योगदान देतात, जसे की टेलिव्हिजन, ट्रान्झिस्टर, रेडिओ इ. या निर्देशकामध्ये, स्थानिक स्वराज्य संस्थांचे ध्वनी प्रदूषण रोखण्याच्या त्यांच्या प्रयत्नांवर मूल्यमापन केले जाईल.

| मूल्यमापन कार्यपद्धती | | | गुण |
|---|---|---|---|
| १. | हॉर्न रोखण्यासाठी जनजागृती उपक्रमांची संख्या. (Relative Marking) | | १०० |
| | माझी वसुंधरा अभियाना ६.० ची पहिली तिमाही (एप्रिल - जून) | २५ | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची दुसरी तिमाही (जुलै-सप्टेंबर) | २५ | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची तिसरी तिमाही (ऑक्टोबर-डिसेंबर) | २५ | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची चौथी तिमाही (जानेवारी-मार्च) | २५ | |
| २. | परवानगी दिलेल्या वेळेच्या मर्यादेनंतर उत्सवादरम्यान सार्वजनिक ठिकाणी लाउडस्पीकर वापरण्याच्या निर्बंधाच्या आदेशाची/सूचनेची प्रत. | | ५० |
| ३. | शांतता क्षेत्र | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |

**आवश्यक तपशील:**

- जनजागृती उपक्रमांची संख्या (तिमाही) व नागरिकांच्या सहभागाचा तपशील (तिमाही) विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- कार्यक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- परवानगी दिलेल्या वेळेच्या मर्यादेनंतर उत्सवादरम्यान सार्वजनिक ठिकाणी लाउडस्पीकर वापरण्याच्या निर्बंधाच्या आदेशाची/सूचनेची प्रत.
- स्थानिक स्वराज्य संस्थेने शांतता क्षेत्रासंबंधी जाहीर केलेला अद्ययावत अधिनियम
- शांतता क्षेत्राचे स्थान- गूगल मॅपवर
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे.<br>१२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |
|---|---|

# ध्वनी प्रदूषणाबद्दल जनजागृती

| जागतिक आरोग्य संस्थेच्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार मानक आवाज पातळी | |
|---|---|
| **विशिष्ट आवाज वातावरण** | **आवाजाची मर्यादा (dB)** |
| घरामध्ये | ३०-३५ |
| शाळा आणि मैदानात | ५५ |
| औद्योगिक, व्यावसायिक आणि गर्दीची ठिकाणे | ७० |
| समारंभ, उत्सव आणि मनोरंजन कार्यक्रम | १०० |
| हेडफोन/इयरफोनद्वारे संगीत | ८५ |

| आवाजाच्या संदर्भात परिसरातील हवेची गुणवत्तेची मानके | | |
|---|---|---|
| क्षेत्र | ध्वनीची मर्यादा | |
| | दिवसाची वेळ (सकाळी ६.०० ते रात्री १०.००) | रात्रीची वेळ (रात्री १०.०० ते सकाळी ६.००) |
| औद्योगिक क्षेत्र | ७५dB | ७०dB |
| व्यावसायिक क्षेत्र | ६५dB | ५५dB |
| रहिवासी क्षेत्र | ५५dB | ४५dB |
| शांतता क्षेत्र | ५०dB | ४०dB |

https://cpc.nic.in/who-guidelines-for-noise-quality/

# शांतता क्षेत्रासाठी निकष

१. शांतता क्षेत्र हे रुग्णालये, शैक्षणिक संस्था आणि न्यायालयांच्या १००-मीटरच्या परीसरातील क्षेत्र आहेत, ज्यांना सक्षम अधिकाऱ्यांनी घोषित केले आहे.
२. या क्षेत्रामध्ये वाहनांचे हॉर्न, लाऊडस्पीकर आणि फटाके वाजवण्यास मनाई आहे.

## ध्वनी प्रदूषण कमी करण्याचे उपाय

### नैसर्गिक उपाय

१. बांबू लागवड
२. वृक्षारोपण
३. मातीचे बंधारे
४. हरित भिंती



### मानवनिर्मित उपाय

१. पारदर्शक ऍक्रेलिक पॅनेल
२. आवाज अडथळा भिंती
३. दगडी भिंती
४. परवर्तीय अडथळे



| २.५ | वातावरणीय बदल (Climate Change) आणि आपत्ती व्यवस्थापनाची तयारी | गुण ३५० |
|---|---|---|

एखाद्या प्रदेशातील तापमान आणि वातावरणातील दीर्घकालीन बदलाला वातावरणातील बदल असे म्हणतात. हे बदल नैसर्गिक किंवा मानवनिर्मित असू शकतात. महाराष्ट्राने कृती आराखड्यामध्ये सर्वांगीण, सक्रिय, बहु-आपत्ती आणि तंत्रज्ञानावर आधारित धोरणे विकसित केली आहेत . हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांच्या वातावरणीय बदलाबाबत जागरूकता निर्माण करण्यासाठी आयोजित केलेल्या उपक्रमांच्या आधारे त्यांचे मूल्यमापन आणि आपत्ती व्यवस्थापनाचे आणि सहभागाचे मूल्यमापन करेल.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | वातावरणीय बदलाबाबत आणि आपत्ती व्यवस्थापनासाठी जनजागृती निर्माण करण्यासाठी आयोजित केलेल्या कार्यक्रमांची संख्या | | १०० |
| २. | हवामानातील तीव्र बदलांची नोंद | | १०० |
| | होय | १०० | |
| | नाही | ० | |
| ३. | भूस्खलन, पूर , भूकंप, दुष्काळ प्रवण क्षेत्रे इत्यादी यासारख्या आपत्ती व्यवस्थापनासंबंधी तयार केलेले GIS नकाशे. | | ५० |
| ४. | आपत्ती व्यवस्थापन समितीने (DMC) आयोजित केलेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या भागधारकांसाठी आपत्ती व्यवस्थापनावर क्षमता वृद्धी सत्रांची संख्या **(Relative Marking)** | | ५० |
| ५. | राष्ट्रीय,राज्य , जिल्हास्तरीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या मार्गदर्शक सूचनानुसार तयार केलेला प्रतिसाद आराखडा (Response plan) आणि अद्ययावत प्रतिसाद योजना | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ जनजागृती उपक्रमांची संख्या आणि नागरिकांच्या सहभागाचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- ❑ माझी वसुंधरा अभियान संचालनालयाने जारी केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार आयोजित केलेल्या जनजागृती उपक्रमांचा मूल्यमापनासाठी विचार केला जाईल. (संदर्भासाठी मार्गदर्शक सूचना जोडल्या आहेत).
- ❑ जनजागृती कार्यक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेत गेल्या ५ वर्षातील हवामानातील तीव्र बदलांचा / आपत्तींचे - बदलांची माहिती - विहित एक्सेल स्वरूपात
- ❑ आपत्ती प्रवण क्षेत्र दर्शवणाऱ्या GIS मॅपची प्रत.
- ❑ क्षमता वृद्धी सत्रांच्या वार्षिक वेळापत्रकाची प्रत.
- ❑ आपत्ती व्यवस्थापन समिती आयोजित क्षमता वृद्धी सत्रांचा इतिवृत्त. पावसाळ्यापूर्वी सत्रे आयोजित केली जावीत आणि बैठकीच्या नोंदींच्या प्रतीसह तपशील सादर केला जावा.
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेचा प्रतिसाद आराखडा (Response plan) आणि अद्ययावत प्रतिसाद योजनेची प्रत .

***टीप- स्थानिक स्वराज्य संस्थेत गेल्या ५ वर्षात घडलेल्या हवामानातील तीव्र बदलांचे आणि आपत्तींचे मॅपिंग करावे. ह्या आपत्तींमध्ये अतिवृष्टी, पूर, भूस्खलन, उष्णकटिबंधीय चक्रीवादळ, उष्णतेची लाट, विजा आणि गडगडाट इत्यादींचा समावेश होतो.***

- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG १३. वातावरणीय कृती** | १३.२ : राष्ट्रीय धोरणे, रणनीती आणि नियोजनामध्ये हवामान बदलाचे उपाय एकत्रित करणे.<br><br>१३.३ : हवामान बदल कमी करणे, अनुकूलन आणि पूर्व चेतावणी यावर शिक्षण, जागरूकता वाढवणे आणि मानवी आणि संस्थात्मक क्षमता सुधारणे. |
|---|---|---|

# स्थानिक स्वराज्य संस्थांनी आपत्ती व्यवस्थापनासाठी उचलली जाणारी पावले



# २.६ वातावरणीय कृती नियोजन (केवळ अमृत शहरांसाठी लागू)* 

**गुण ५००**

वातारणीय बदल जागतिक आव्हान बनले आहे, त्यामुळे विकेंद्रित वातावरणीय कृतीवर आधारित उपक्रमांद्वारे या समस्येचे निराकरण करणे महत्त्वपूर्ण बनले आहे. पॅरिस करार अंतर्गत , भारताच्या NDCs आणि SAPCC च्या अनुषंगाने उद्दिष्टे साध्य करण्यासाठी शहरे वातावरणीय कृतीच्या केंद्रस्थानी आहेत. या निर्देशकाचा उद्देश स्थानिक प्रशासन स्तरावर वातावरणीय बदलाचा मुकाबला करण्यासाठी कृती करणे आणि राज्य, राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावरील वचनबद्धतेनुसार पुढाकार घेणे आहे.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | CDP संकेतस्थळावर माहिती भरणे | | १०० |
| २. | GoI, GoM, C40, WRI आणि इतर भागीदारांद्वारे आयोजित केलेल्या व अमृत शहरांचे प्रमुख/प्रतिनिधी यांनी उपस्थिती लावलेल्या वातावरणीय कृतीबाबत घेतलेल्या कार्यशाळा/कार्यक्रमांची संख्या. (Relative Marking) | | ५० |
| ४. | शहरी वातावरणीय कृती कक्षाची निर्मिती | | २०० |
| ५. | **शहरी वातावरणीय कृती आराखडा** | | १५० |
| | शहरी वातावरणीय कृती आराखडा तयार करून प्रकाशित | १५० | |
| | शहरी वातावरणीय कृती आराखड्याचा मसुदा | १०० | |
| | प्रास्ताविक सभा घेण्यात आल्या | ५० | |

**आवश्यक तपशील:**

- CDP पोर्टलवर यशस्वी नोंदणीसाठी प्राप्त झालेल्या ईमेलची प्रत.
- CDP च्या संकेतस्थळावर माहिती भरणे – वार्षिक
- निमंत्रण पत्रासह उपस्थितांच्या यादीची प्रत
- कार्यशाळा/उपक्रम यांचे तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- प्रादेशिक/राष्ट्रीय कराराने मंजूर केलेल्या वचनबद्धतेच्या पत्राची प्रत (GCoM).
- शहरी वातावरणीय कृती आराखड्याचे तपशील
    - शहरी वातावरणीय कृती आराखड्याची प्रत
    - वेबसाइटवर प्रकाशित केलेल्या अहवालाची लिंक
    - बैठकीचे इतिवृत्त आणि बैठकीची विषयपत्रिकेसह सहभागाची यादी आणि बैठकीचा निकाल.
- सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास आणि गूगल मॅप लिंक चुकीची असल्यास या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत

*हा निर्देशक केवळ ४३ अमृत शहरांसाठी लागू आहे.

| | | |
|---|---|---|
| 13 CLIMATE ACTION | **SDG १३. वातावरणीय कृती** | १३.२ : राष्ट्रीय धोरणे, रणनीती आणि नियोजनामध्ये हवामान बदलाचे उपाय एकत्रित करणे. |
| 17 PARTNERSHIPS FOR THE GOALS | **SDG १७. ध्येयासाठी भागीदारी** | १७.१६ : सर्व देशांमध्ये, विशेषतः विकसनशील देशांमध्ये सामायिक करणाऱ्या बहु-भागधारक भागीदारीद्वारे शाश्वत विकासासाठी जागतिक भागीदारी वाढवणे, शाश्वत विकास उद्दिष्टे साध्य करण्यासाठी, ज्ञान, कौशल्य, तंत्रज्ञान आणि आर्थिक संसाधने एकत्रित करणे . |

# वातावरणीय कृती कक्ष

महाराष्ट्र राज्याला वाढते तापमान, उष्णतेच्या लाटा, वारंवार येणारे दुष्काळ, अतिवृष्टी, पूर, गारपीट, वीज पडणे, समुद्राची पातळी वाढणे आणि चक्रीवादळ अशा विविध धोक्यांचा सामना करावा लागतो. या बदलत्या हवामानातील शमन आणि अनुकूलन हे राज्याच्या सर्वांगीण विकास धोरणाचा एक महत्त्वाचा भाग बनणे आवश्यक आहे.

हवामान बदलावरील सुधारित राज्य कृती आराखडा (SAPCC) तयार करण्यात आला आहे आणि त्याची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी राज्य वातावरणीय कृती कक्षाची स्थापना करण्यात आली आहे.

## वातावरणीय कृती कक्ष म्हणजे काय?

वातावरणीय कृती कक्ष ही एक समर्पित संस्थात्मक यंत्रणा आहे. विविध प्रशासकीय स्तरांवर स्थानिक हवामान आव्हानांना तोंड देण्यासाठी तयार केलेल्या वातावरणीय कृतीची अंमलबजावणी करण्यासाठी आणि देखरेख करण्यासाठी स्थापन केली आहे.

## कार्यपद्धती:

वातावरणीय कृती कक्ष शहर, जिल्हा आणि विभागीय अशा तीन स्तरांवर कार्यरत आहे. ते स्थानिक हवामान योजना SAPCC सारख्या राज्य उद्दिष्टांशी संरेखित करतात.

### वातावरणीय कृती कक्षाची प्रस्तावित रचना (तात्पुरती)

**अध्यक्ष** (स्थानिक स्वराज्य संस्थेचे मुख्याधिकारी)

↓

**सदस्य** (उपायुक्त, कार्यकारी अभियंता, शहर नियोजक, शहर अभियंता, अधीक्षक अभियंता, मुख्य उद्यान अधीक्षक, मुख्य वैद्यकीय अधिकारी, वरिष्ठ भूवैज्ञानिक, सीईओ, स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी, इतर कोणतेही संबंधित अधिकारी)

↓

**सदस्य सचिव** (संचालक (पर्यावरण विभाग))

↓

**शहर देखरेख कार्यालय** (शहर समन्वयक)

| ३ | जल |
|---|---|

| अ. क्र. | कृती बिंदु | गुण |
|---|---|---|
| **३.१** | **जल संसाधन संवर्धन आणि पुनर्जीवन** | **३००** |
| **३.२** | **जल संवर्धन** | |
| ३.२.१ | सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग) | २५० |
| ३.२.२ | भूजल पुनर्भरण | २२५ |
| **३.३** | **पाण्याचे नुकसान मोजणे आणि गुणवत्तेचे निरीक्षण करणे** | |
| ३.३.१ | जल लेखापरीक्षण | ३०० |
| ३.३.२ | जल गुणवत्ता निरीक्षण | १०० |
| ३.३.३ | पाणी पुरवठा यंत्रणेत पाण्याचे मोजमाप (Water Metering) | १०० |
| **३.४** | **सांडपाणी प्रक्रिया आणि प्रक्रिया केलेल्या पाण्याचा पुनर्वापर** | **१५०** |
| **३.५** | **शाश्वत सणांचा प्रचार** | **२००** |
| **३.६** | **जलचर परिसंस्थेचे संवर्धन** | **१००** |
| | **एकूण** | **१,७२५** |

| ३.१ | जल संसाधन संवर्धन आणि पुनर्जीवन | गुण ३०० |
|---|---|---|

**जल हा पृथ्वीवरील जीवनाचा आधार असून एक मौल्यवान नैसर्गिक घटक आहे. गेल्या काही वर्षांत पाण्याच्या अयोग्य वापरामुळे आपल्या जलस्रोतांवर ताण पडत आहे. त्यामुळे, पाण्याच्या कमतरतेचे परिणाम कमी करण्यासाठी आणि भविष्यातील दुष्काळापासून अधिक चांगले संरक्षण करण्यासाठी जलस्त्रोतांच्या संवर्धनाच्या दिशेने पावले उचलणे महत्त्वाचे आहे. या निर्देशकाद्वारे जलस्त्रोतांचे संवर्धन आणि पुनर्जीवन करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांद्वारे करण्यात येणाऱ्या कामांचे परीक्षण करण्यात येईल.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | अस्तित्वात असलेले आणि नाहीसे झालेले जलस्रोतांची संख्या | २५ |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान गाळ/शेवाळ/घनकचरा काढून किंवा दुरुस्तीच्या कामाद्वारे पुनर्जीवित केलेल्या अस्तित्वात असलेल्या जलस्त्रोतांची संख्या **(Relative marking)** | ७५ |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान नाहीसे झालेल्या जलस्रोतांचे पुनर्जीवन किंवा नव्याने विकसित केलेल्या जलस्त्रोतांची संख्या | ५० |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान विद्यमान जलस्त्रोतांच्या पुनर्जीवनाद्वारे पाणी साठवण क्षमतेत पडलेली भर (घनमीटरमध्ये) (Relative Marking) | ५० |
| ५. | **अपकीप :** माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान पुनर्जीवित केलेल्या जल्स्त्रोतांची साठवण क्षमता, माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान कायम ठेवून त्याची देखभाल (Relative Marking) | १०० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ अस्तित्वात असलेले आणि नाहीसे झालेले जलस्रोतांची संख्या
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० आधी आणि दरम्यान गाळ , शेवाळ किंवा घनकचरा काढून आणि दुरुस्तीच्या कामाद्वारे पुनर्जीवित केलेल्या जलस्रोतांची संख्या - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान पुनर्जीवन केलेल्या जलसाठ्यांचे स्थान (लोकेशन) - गुगल मॅप लिंक
- ❑ जलस्रोतांचे पुनर्जीवन करून पाणी साठवण क्षमतेत पडलेली भर (घनमीटरमध्ये)
- ❑ भौतिक आणि आर्थिक प्रगती अहवाल - कार्यारंभ आदेश
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान हाती घेण्यात आलेल्या सर्व कामांसाठी – मोजमाप पुस्तिकेची प्रत (Copy of Measurement Book)
- ❑ विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेली माहिती माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान MIS मध्ये भरलेल्या माहितीशी जुळत नसल्यास, कोणतेही गुण दिले जाणार नाहीत. (केवळ अपकीपसाठी (Upkeep) लागू)

| 6 CLEAN WATER AND SANITATION | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |
|---|---|---|

# ३.१ जल संसाधन संवर्धन आणि पुनर्जीवन










<u>*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*</u>

# ३.२.१ सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग)

**गुण २५०**

**रेन वॉटर हार्वेस्टिंग ही घराचे छत (स्लॅब), रस्ते, उद्याने, मैदाने इ. वरील पावसाच्या पाण्याचे संकलन करून साठविण्याची एक सोपी प्रक्रिया आहे. याद्वारे साठविलेले पाणी भूजल पुनर्भरण करण्यासाठी किंवा नंतर वापरण्यासाठी साठविले जाते. रेन वॉटर हार्वेस्टिंग करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या कामांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | कार्यरत रेन वॉटर हार्वेस्टिंग सेल | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० आधी आणि दरम्यान स्थापित केलेल्या कार्यरत रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्प असलेल्या सार्वजनिक इमारतींची टक्केवारी | | १०० |
| | १००% | १०० | |
| | ७५% ते १००% | ७५ | |
| | ५०% ते ७५% | ५० | |
| | ५०% पेक्षा कमी | ० | |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० च्या दरम्यान साठवलेले पावसाचे पाणी – घन मीटरमध्ये (m3) **(Relative Marking)** | | ५० |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान खाजगी मालमत्ता, पाझर खड्डे आणि कार्यक्षम पाणी वापर यावर RWH च्या जनजागृती उपक्रमांची संख्या. **(Relative Marking)** | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- रेन वॉटर हार्वेस्टिंग सेलचे गठिण करण्याच्या आदेशाची प्रत आणि सदस्यांची यादी.
- छतावरील रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्प असणाऱ्या सार्वजनिक इमारतींची यादी - विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- रेन वॉटर हार्वेस्टिंग केलेल्या सार्वजनिक इमारतींचे गूगल मॅपवरील स्थान (लोकेशन).
- या निर्देशकासाठी, निवासी इमारती वगळता सार्वजनिक इमारती, कोणत्याही व्यावसायिक किंवा अव्यावसायिक आस्थापना यासह शासकीय इमारती, स्थानिक इमारती, सिनेमागृह/नाट्यगृह, शॉपिंग कॉम्प्लेक्स, रुग्णालये इत्यादींचा समावेश असेल.
- रेन वॉटर हार्वेस्टिंगद्वारे साठविण्यात आलेल्या पाण्याची नोंद - घन मीटरमध्ये (m3: 1m3=1000L)
- स्थानिक स्वराज्य संस्थांद्वारे स्थापित आणि प्रमाणित केलेल्या रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्पांचा मूल्यांकनासाठी समावेश केला जाईल. याची खात्री करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी खालील बाबी लक्षात ठेवाव्या :
  - रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्पांची कार्यरत स्थिती
  - रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्पांचे पाणलोट क्षेत्र/छत (स्लॅब)
  - गळती/तुटलेले पाईप टाळावेत.
  - परकोलेशन पॉइंटची उपलब्धता
- RWHची विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- रेन वॉटर हार्वेस्टिंग, पाझर खड्डे, विहित एक्सेल नमुन्यात कार्यक्षम पाण्याचा वापर यावरील प्रचारात्मक जनजागृती उपक्रमांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- जनजागृती उपक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 6 CLEAN WATER AND SANITATION | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |

# सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग)

रेनवॉटर हार्वेस्टिंग प्रणालीमध्ये पुढील घटकांचा समावेश असतो  (जलशक्ती अभियानाच्या व्याख्यानुसार):




पाणलोट किंवा प्रणाली ज्यात पाणी रोखून साठवले जाते



साठवण सुविधेत पाणी वाहून नेण्यासाठी पाईप्स/नलिकांची प्रणाली




पावसाच्या पाण्याबरोबर वाहून आलेली घाण काढण्यासाठी फिल्टर युनिट



पाणी साठवण्यासाठी टाकी किंवा भूजल पुनर्भरण संरचना

सदर छायाचित्रे  केवळ उदाहरणासाठी दर्शविण्यात आली आहेत .

# पावसाच्या पाण्याची गणना कशी करावी?

रेन वॉटर हार्वेस्टिंगद्वारे वर्षभर साठवलेले पावसाचे पाणी मोजण्याचे सूत्र खालीलप्रमाणे आहे:

जर,

Q = लीटर मध्ये साठवलेल्या पावसाच्या पाण्याचे प्रमाण (घन मीटरमध्ये )

M = सरासरी वार्षिक पाऊस मिली मीटरमध्ये

A = पाणलोट क्षेत्र चौरस मीटरमध्ये

R = भूमिगत गटर प्रणालीमधील अपरिहार्य लहान गळतीमुळे होणारे नुकसान किंवा पुरेसा प्रवाह निर्माण करण्यासाठी खूप हलका पाऊस किंवा अतिवृष्टीमुळे भरून वाहणारे नाले इ. द्वारे वाहून गेलेल्या (रनऑफ) पाण्याचा गुणांक

तर,

पावसाच्या पाण्याचे प्रमाण (जे घन मीटरमध्ये साठवले जाऊ शकते) Q = ‘M’ x ‘A’ x ‘R’

वाहून जाणाऱ्या पाण्याचा (रनऑफ) गुणांक छताच्या सामग्रीच्या प्रकारानुसार बदलतो; सामग्रीचा प्रकार आणि त्यांचे रनऑफ गुणांक खाली दिले आहेत.

| प्रकार | रनऑफ गुणांक |
|---|---|
| **गॅल्वनाइज्ड लोखंडी पत्रा** | >०.९ |
| **(पन्हाळी) धातूची पत्रे** | ०.७ ते ०.९ |
| **फरशी** | ०.८ ते ०.९ |
| **काँक्रीट** | ०.६ ते ०.८ |
| **विटांचा फुटपाथ** | ०.५ ते ०.६ |
| **दगडी नैसर्गिक पाणलोट** | ०.२ ते ०.५ |
| **मातीचा उतार** | ० ते ०.३ |
| **हरित क्षेत्र** | ०.०५ ते ०.१ |

## ३.२.१ सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग)










***<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.</u>***

| ३.२.२ | भूजल पुनर्भरण | गुण २२५ |
|---|---|---|

**भूजलावर वाढत्या अवलंबित्वामुळे अनेक विहिरी आणि विंधन विहिरी कोरड्या पडल्या आहेत, त्यामुळे त्यांचे संवर्धन करणे आवश्यक झाले आहे. यासाठी भूजल पुनर्भरण व विहिरींचे पुनर्जीवन महत्त्वाचे ठरत आहे. पावसाचे पाणी जमिनीत मुरवण्यासाठी पाझर खड्ड्यांची निर्मिती हे एक साधे व प्रभावी तंत्रज्ञान आहे, ज्यामुळे भूजल पातळी वाढवण्यास मदत होते. प्रस्तुत निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांनी भूजल**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | स्थानिक संस्थेतील कार्यरत, अकार्यरत , खाजगी आणि सार्वजनिक विहिरी आणि विंधन विहिरींची संख्या. | ५० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान पुनर्जीवित/पुनर्भरण केलेल्या अकार्यरत विहिरींची संख्या **(Relative Marking)** | ५० |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान पुनर्भरण केलेल्या अकार्यरत विंधन विहिरींची संख्या **(Relative Marking)** | ५० |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान नव्याने निर्माण केलेल्या पाझर खड्ड्यांची संख्या **(Relative Marking)** | ५० |
| ५. | **अपकीप (Upkeep):** माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान निर्माण करण्यात आलेल्या कार्यरत आणि देखभाल करण्यात येणाऱ्या पाझर खड्ड्यांची संख्या **(Relative Marking)** | २५ |

**आवश्यक तपशील:**

- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेतील सर्व (अकार्यरत /कार्यरत ) खाजगी आणि सार्वजनिक विहिरी आणि विंधन विहिरींची संख्या.
- ❑ पुनर्जीवन /पुनर्भरणासाठी हाती घेतलेल्या प्रकल्पांची संख्या- विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ गुगल मॅपवर प्रकल्पाचे स्थान.
- ❑ विहिरी/विंधन विहिरी पुनर्जीवन /पुनर्भरण प्रकल्पाचे कार्यारंभ आदेश आणि देखभाल अहवाल.
- ❑ विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० आधी आणि दरम्यान निर्माण करण्यात आलेल्या नव्या पाझर खड्ड्यांच्या संख्येचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ पाझर खड्ड्यांचे प्रकल्पाची क्षमता आणि प्रकल्प अहवाल
- ❑ गूगल मॅपवर पाझर खड्ड्यांचे स्थान (लोकेशन).
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता | ६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |
|---|---|---|

# भूजल पुनर्भरण
# (विहिरी/विंधन विहिर)











विंधन विहिर किंवा अकार्यरत विंधन विहीरीभोवती पुनर्भरण संरचना

**भूजल पुनर्भरण:** व्यवस्थापित भूजल पुनर्भरण हे भूजल पुनर्प्राप्तीसाठी किंवा पर्यावरणीय फायद्यासाठी पाण्याचे उद्देशपूर्ण पुनर्भरण आहे. हे विद्यमान विहिरींमध्ये पाणी सोडणे आणि विंधन विहिरींभोवती योग्य फिल्टर मीडियासह पुनर्भरण खड्डा बांधून केले जाऊ शकते.

***सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.***

| ३.३.१ | जल लेखापरीक्षण (वॉटर ऑडिट) | गुण ३०० |
|---|---|---|

**जल लेखापरीक्षण (वॉटर ऑडिटिंग) हे पाणी व्यवस्थापनाचे प्रभावी साधन आहे. ही कार्यक्षमतेत सुधारणा करण्याच्या आणि पाण्याचे नुकसान कमी करण्याच्या उद्देशाने साध्या किंवा जटिल प्रणालींमध्ये पाण्याच्या प्रवाहाचे प्रमाण मोजण्याची प्रक्रिया आहे. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांच्या पिण्यायोग्य पाण्याच्या वापरावर लक्ष ठेवण्यासाठी आणि ताज्या पाण्याचा अपव्यय कमी करण्यासाठी पुढाकार घेण्यास प्रोत्साहित करतो.**

| | मूल्यमापन कार्यपध्दती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ५.० आणि/किंवा ६.० दरम्यान जल लेखापरीक्षण केलेल्या शासकीय इमारतींची टक्केवारी | | ५० |
| | १००% | ५० | |
| | ७५% ते १००% | ४० | |
| | ५०% ते ७५% | २५ | |
| | ५०% पेक्षा कमी | १५ | |
| २. | जल लेखापरीक्षणाच्या अहवालातील शिफारशींची अंमलबजावणी केलेल्या इमारतींची संख्या (Relative Marking) | | १०० |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ५.० आणि/किंवा माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान पाणीपुरवठा यंत्रणेचे जल लेखापरीक्षण | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| ४. | पाणीपुरवठा यंत्रणेचे जल लेखापरीक्षण शिफारशींची अंमलबजावणी | | ५० |
| ५. | पाणीपुरवठा व्यवस्थेत महसूलेतर पाण्याचा तोटा (Non Revenue Water loss) | | ५० |
| | २०% पेक्षा कमी | ५० | |
| | २०% पेक्षा जास्त | ० | |

**आवश्यक तपशील :**

- ❑ माझी वसुंधरा अभियान ५.० आणि/किंवा माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान स्थानिक स्वराज्य संस्थेतील जल लेखापरीक्षण करण्यात आलेल्या शासकीय इमारतींची यादी – विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ माझी वसुंधरा अभियान ५.० आणि/किंवा माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान आयोजित अधिकृत संस्था/संस्थांकडून तयार करण्यात आलेल्या जल लेखापरीक्षण अहवालाचा कार्यकारी सारांश (Executive water audit report)
- ❑ माझी वसुंधरा अभियान ५.० आणि/किंवा माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान स्थानिक स्वराज्य संस्थेतील पाणीपुरवठा प्रणालीच्या जल लेखापरीक्षण अहवालाचा कार्यकारी सारांश
- ❑ जल लेखापरीक्षण आणि शिफारशीच्या अंमलबजावणीसाठीचे कार्यारंभ आदेश
- ❑ विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ लागू केलेल्या शिफारशींचे जिओटॅग केलेले छायाचित्रे (आधी/नंतर) (Size १ ते २ MB).
- ❑ सर्विस लेवल बेंच मार्क अहवाल
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |
|---|---|---|

# जल लेखापरीक्षणाचे फायदे

**(अ) पाणीपुरवठा यंत्रणेची कार्यक्षम देखभाल: दुरुस्त केलेल्या, विश्वासार्ह पुरवठा व्यवस्थेचे अनेक फायदे आहेत.**

**यापैकी काही फायदे आहेत:**

- पाण्याच्या अपव्ययात घट
- वितरण वीज खर्चात बचत
- पाणी दूषित होण्याच्या प्रमाणात घट होऊन पाण्याची गुणवत्ता वाढते.

**(ब) आर्थिक लाभ:-** यामुळे प्रक्रिया, नियमित दुरुस्ती आणि पाणी उपसण्याचा खर्च कमी होतो.

**(क) वितरण व्यवस्थेबाबत अधिक ज्ञान :-** जल लेखापरीक्षण करण्याच्या प्रक्रियेत, पाणी पुरवठा कर्मचार्यांना वितरण/पुरवठा प्रणालीची पूर्ण ओळख होते. ज्यामुळे आपत्कालीन परिस्थितीत त्वरित प्रतिसाद देण्यासाठी मदत होते.

**(ड) विद्यमान पाणी पुरवठ्यांचा अधिक कार्यक्षमतेने वापर:-** जल लेखापरीक्षणामुळे विद्यमान पाणी पुरवठ्याची कार्यक्षमता वाढू शकते.

**(ई) सार्वजनिक मालमत्ता आणि जनसंपर्क वाढवणे:-** पाणी पुरवठा योजनेच्या नियमित देखभालीमुळे पाणी वितरण प्रणलीचे नुकसान कमी होण्यास मदत होते.

## जल लेखापरीक्षाणाशी संबंधित काही संस्था

- कॉन्फेडरेशन ऑफ इंडियन इंडस्ट्रीज (CII) - CII - त्रिवेणी जल संस्था: https://knowledgeplatform.cii-twi.in/water-audit
- राष्ट्रीय उत्पादकता परिषद (NPC) - https://www.npcindia.gov.in/NPC/User/water_audit
- पीएचडी चेंबर ऑफ कॉमर्स अँड इंडस्ट्री - https://www.phdcci.in/preliminary-water-audit-form/
- भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा - https://gsda.maharashtra.gov.in/english/#:~:text=As%20per%20the%20agreement%2C%20the,the%20State%20through%20various%20schemes
- शासकीय अभियांत्रिकी आणि विज्ञान महाविद्यालये आणि विद्यापीठे.

## ३.३.२ जल गुणवत्ता निरीक्षण

**गुण १००**

प्रदूषक आणि रोगजन्य पाण्याच्या नियंत्रणासाठी पाण्याच्या गुणवत्तेचे निरीक्षण करणे आवश्यक आहे. CPHEEO च्या मार्गदर्शक तत्त्वांच्या आधारे, शहरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या (ULBs) सार्वजनिक आरोग्य आणि अभियांत्रिकी विभागांनी आवश्यक पाण्याच्या चाचण्या कराव्यात. हे निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये पुरवल्या जाणाऱ्या पिण्याच्या पाण्याच्या क्षमतेचे मूल्यांकन करते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये कार्यारत जल प्रक्रिया सुविधा | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| २. | सर्व जलस्रोतांवर (पाणी प्रक्रिया सुविधा,पाण्याच्या टाक्या, विंधन विहीरी , विहिरी, पाण्याचे टँकर पुरवठा करणारे) पाण्याच्या गुणवत्तेच्या चाचण्या पावसाळ्यापूर्वी आणि नंतर केल्या जातात. | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |

**आवश्यक तपशील :**

- ❑ जल प्रक्रिया सुविधा (WTP) ची जिओ-टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB) .
- ❑ जल प्रक्रिया सुविधा(WTP) चे गूगल मॅप स्थान.
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान WTP वर प्राप्त झालेल्या आणि प्रक्रिया केलेल्या एकूण पाण्याचा तपशील - लॉगबुकची प्रत.
- ❑ पाणी पिण्यायोग्य मानकांनुसार आहे याची खात्री करण्यासाठी सर्व जलस्रोतांवर (WTP, पाण्याच्या टाक्या, विंधन विहिरी , विहिरी, पाण्याचे टँकर पुरवठा करणारे) सर्व चाचण्यांसाठी पावसाळ्यापूर्वी आणि नंतरच्या पाण्याच्या गुणवत्तेचे अहवाल BIS10500 अनुसार असावा.
- ❑ मायक्रोप्लास्टिक आणि आर्सेनिकचे प्रमाण मापदंड वर्षातून एकदा तपासले जावे.
- ❑ पाण्याच्या गुणवत्तेचा अहवाल NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेतूनच तपासला जावा.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 6 CLEAN WATER AND SANITATION | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |

# ३.३.३ पाणीपुरवठा यंत्रणेत पाण्याचे मोजमाप (Water Metering)

**गुण १००**

पाणी मीटरिंग आवश्यक आहे कारण यामुळे पाण्याचा अचूक वापर मोजता येतो, गळती ओळखता येते आणि बचत करता येते. वापरावर आधारित बिलिंगमुळे नागरिक अधिक जबाबदारीने पाणी वापरतात. यामुळे पाणीटंचाईच्या भागात पाणी व्यवस्थापन सुधारते आणि पाण्याचा अपव्यय टाळता येतो. मीटरिंग ही जलसंवर्धनासाठी प्रभावी आणि आवश्यक पायरी आहे. हे निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये पुरवल्या जाणाऱ्या पाण्याच्या  मोजमापावर मूल्यांकन करते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | जलशुद्धीकरण केंद्रात कार्यरत पाण्याचे मीटर आहे का? | | २० |
| | होय | २० | |
| | नाही | ० | |
| २. | उच्च जलधारण टाक्यांवर (OHT) कार्यरत पाण्याच्या मीटरची टक्केवारी | | ३० |
| | ९०% आणि अधिक | ३० | |
| | ५०% - ९०% | १५ | |
| | ५०% पेक्षा कमी | ० | |
| ३. | घरे आणि मोठ्या प्रमाणात वापरकर्ते (व्यावसायिक/संस्थात्मक) येथे कार्यरत पाण्याच्या मीटरची टक्केवारी | | ५० |
| | ९०% आणि अधिक | ५० | |
| | ७०%-९०% | ४० | |
| | ५०%-७०% | ३० | |
| | ५०% पेक्षा कमी | ० | |

**आवश्यक तपशील :**

- ❑ जलशुद्धीकरण केंद्र (WTP), उच्च जलधारण टाकी (OHT) येथे घेतलेल्या पाण्याच्या मीटर रीडिंग्सची नोंदवही.
- ❑ घाऊक/मोठ्या प्रमाणात वापरकर्त्यांचे पाणीबिल व घरगुती पाणीपट्टी संकलनाचा सारांश.
- ❑ WTP, OHT व घाऊक/मोठ्या प्रमाणात वापरकर्त्यांकडे बसवलेल्या जलमीटरची माहिती - Excel शीट.
- ❑ गुगल मॅपवर कार्यरत घरगुती जलमीटरचे स्थान.
- ❑ प्रकल्पांची भौतिक व आर्थिक प्रगती याचा संक्षिप्त अहवाल.
- ❑ WTP, OHT व घाऊक/ मोठ्या प्रमाणात वापरकर्त्यांकडे कार्यरत जलमीटरचे भू-टॅग केलेले (1 ते 2 MB आकाराचे) छायाचित्र.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| 6 CLEAN WATER AND SANITATION | SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता | ६.१: २०३० पर्यंत, सर्वांसाठी सुरक्षित आणि परवडणाऱ्या पिण्याच्या पाण्याचा सार्वत्रिक आणि समान सुविधा निर्माण करणे.<br>६.४: २०३० पर्यंत, सर्व क्षेत्रांमध्ये पाणी वापर कार्यक्षमतेत लक्षणीय वाढ करून  पाण्याची टंचाई दूर करण्यासाठी आणि पाणी टंचाईने ग्रस्त लोकांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करण्यासाठी शाश्वत उपसा आणि गोड्या पाण्याचा पुरवठा सुनिश्चित करणे. |
|---|---|---|

# BIS वैशिष्ट्यांनुसार पिण्याच्या पाण्याचे भारतीय मानक

**पिण्याचे पाणी :** पिण्याचे पाणी हे कुठल्याही जलस्त्रोताद्वारे मानवी वापरासाठी उदा. पिण्यासाठी आणि स्वयंपाक करण्याच्या हेतूने वापरले जाणारे पाणी आहे. यामध्ये मानवी वापरासाठी कोणत्याही प्रकारे पुरवले जाणारे पाणी (प्रक्रिया केलेले किंवा प्रक्रिया न केलेले) समाविष्ट आहे.

पिण्याच्या पाण्यासाठी भारतीय मानकांनुसार (IS 10500-2012) देण्यात आलेल्या आवश्यकतांचे पालन करणे आवश्यक आहे;

| अ.क्र . | भौतिक आणि रासायनिक पाणी गुणवत्ता चाचणी निकष | स्वीकार्य मर्यादा | अनुज्ञेय मर्यादा |
|---|---|---|---|
| १ | रंग (Hazen units) | ५ | १५ |
| २ | वास | सहमत | सहमत |
| ३ | चव | सहमत | सहमत |
| ४ | गढूळपणा (NTU) | १ | ५ |
| ५ | एकूण विरघळलेले घन पदार्थ (mg/L) | ५०० | २००० |
| ६ | अवशिष्ट क्लोरीन (mg/L) | ०.२-०.५ | १ |
| ७ | सामू मूल्य (pH) | ६.५-८.५ | ६.५-८.५ |

बॅक्टेरियोलॉजिकल, मायक्रोप्लास्टिक आणि आर्सेनिक सामग्रीची चाचणी वार्षिक किंवा तक्रारी प्राप्त झाल्यास तपासली जाईल.

***वरील तक्त्यामध्ये नमूद केलेले परिमाण मर्यादित असून फक्त संदर्भासाठी आहेत, अधिक तपशिलांसाठी कृपया IS 10500-2012 ची संपूर्ण यादी पहा, संदर्भ - IS 10500-2012 Drinking water – specification:** https://admin.indiawaterportal.org/sites/default/files/2020-11/bis_10500-2012_wq_standards_0_0.pdf).

टीप – वरील यादीनुसार नमूद केलेली मर्यादा ओलांडल्याने पाणी पिण्याअयोग्य बनते, जर इतर कोणताही स्त्रोत उपलब्ध नसेल तर अशावेळी ते पिण्यासाठी स्वीकारले जाऊ शकते. त्यासाठी ते परवानगीयोग्य मर्यादेत असणे आवश्यक आहे.

| ३.४ | सांडपाणी प्रक्रिया आणि प्रक्रिया केलेल्या पाण्याचा पुनर्वापर | गुण १५० |
|---|---|---|

**जलस्रोतातील सांडपाण्याची अयोग्य विल्हेवाट हा भारतातील जल प्रदूषणाचा प्रमुख स्रोत आहे. हे जलस्रोतांना हानी पोहोचवते आणि संपूर्ण परिसंस्थेचे नुकसान करते.** हे निर्देशक **स्थानिक स्वराज्य संस्था त्यांच्या सांडपाण्याचे व्यवस्थापन किती कार्यक्षमतेने करतात हे तपासते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | स्थानिक स्वराज्य संस्थेत कार्यरत स्थितीत असणारे एसटीपी/एफएसटीपी | | ५० |
| २. | एसटीपी/एफएसटीपी मधून प्रक्रिया केलेल्या पाण्याच्या पुनर्वापराची टक्केवारी | | ५० |
| | ९५% पेक्षा अधिक | ५० | |
| | ८०% ते ९५% | ४० | |
| | ५०% ते ८०% | ३० | |
| | ५०% पेक्षा कमी | ० | |
| ३. | MPCB विसर्ग (डिस्चार्ज) मानकांनुसार प्रक्रिया केलेल्या पाण्याचा गुणवत्ता अहवाल | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- विद्यमान सांडपाणी प्रक्रिया केंद्र (एसटीपी)/ मल सांडपाणी प्रक्रिया केंद्र (एफएसटीपी) ची क्षमता.
- एसटीपी/एफएसटीपीमध्ये संकलित झालेल्या आणि प्रक्रिया केलेल्या एकूण पाण्याचा तपशील –माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान लॉगबुकची प्रत.
- एसटीपी/एफएसटीपीचे कार्य करण्यासाठी संमतीची प्रत. (Consent to Operate (CTO))
- शेत, जंगले, फलोत्पादन, शौचलयात वापरण्यासाठी (टॉयलेट फ्लशिंग), कूलिंग टॉवर्स, मनुष्य संपर्कविरहित औद्योगिक वापरासाठी, मत्स्यपालन, बागा आणि उद्याने इत्यादी सारख्या विविध अनुप्रयोगांसाठी थेट वापरल्या जाणाऱ्या किंवा पुनर्वापर केलेल्या पाण्याची टक्केवारी.
- सांडपाणी प्रक्रिया केलेल्या पाण्याच्या गुणवत्तेचा अहवाल - प्रक्रिया केलेले पाणी विसर्ग (डिस्चार्ज) मानकांनुसार आहे आणि पुनर्वापरासाठी सुरक्षित आहे हे सुनिश्चित करण्यासाठी.
- कार्यरत स्थितीत असणाऱ्या एसटीपी/एफएसटीपीची जिओ-टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- जेथे प्रक्रिया केलेले पाणी वापरले जात आहे, त्या स्थानाचे गुगल मॅप लोकेशन आणि जिओटॅग छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| 6 CLEAN WATER AND SANITATION | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |
|---|---|---|

# सांडपाणी प्रक्रिया आणि प्रक्रिया केलेल्या पाण्याचा पुनर्वापर

## विद्यमान सांडपाणी प्रक्रिया केंद्र (STP)




**सांडपाणी पुन्हा परिसरात सोडण्यापूर्वी स्वच्छ करण्यासाठी सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प विविध टप्प्यांची प्रक्रिया वापरतात. हे सांडपाणी विघटन करण्यासाठी जीवाणूंच्या वाढीस प्रोत्साहन देण्यासाठी हवेचे परिसंचरण करून कार्य करते. जेथे मोठ्या प्रमाणात जमीन उपलब्ध असते तेथे निसर्गावर आधारित एसटीपी काम करतात. तंत्रज्ञानावर आधारित एसटीपीला कमी जागा लागते पण जास्त खर्चिक असतात.**

## मल सांडपाणी प्रक्रिया केंद्र (FSTP)




मल सांडपाणी प्रक्रिया केंद्रामध्ये सेप्टिक टँक, पिट शौचालय किंवा इतर स्वच्छता प्रणालींमधून गोळा केलेल्या मल गाळावर प्रक्रिया केली जाते. गाळ उन्हात वाळवला जातो आणि सांडपाण्यावर ऑक्सिजन विरहित प्रक्रिया करून, बायोफिल्टरकडे वळवला जातो जिथे पाणी शुद्धीकरण करून पाण्याचा पुनर्वपर केला जातो.

**प्रक्रिया केलेले सांडपाणी पिकांना सिंचन करण्यासाठी, बागकामासाठी, फिल्टर माध्यमांद्वारे भूजल पुनर्भरणासाठी वापरले जाते . तसेच उद्योगांमध्ये, गाड्या स्वच्छ करण्यासाठी आणि शौचालयांमध्ये फ्लश करण्यासाठी सुद्धा वापरले जाऊ शकते.**

## ३.४ सांडपाणी प्रक्रिया आणि प्रक्रिया केलेल्या पाण्याचा पुनर्वापर







*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

| ३.५ | शाश्वत सणांचा प्रचार | गुण २०० |
|---|---|---|

**नद्या, तलाव, खाचर, खाडी, किनारपट्ट्या, विहिरी इत्यादी जलाशयांमध्ये मूर्तींचे विसर्जन केले जाते, यामुळे जल प्रदूषण होते. पर्यावरण संरक्षण करून प्रदूषणावर नियंत्रण ठेवून सण साजरे करणे आवश्यक आहे. मूर्ती विसर्जनामुळे होणारे जल प्रदूषण कमी करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी आयोजित केलेल्या उपक्रमांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | पर्यावरणपुरक मूर्ती आणि विसर्जनाचा प्रचार करण्यासाठी घेण्यात आलेल्या प्रचारात्मक कार्यक्रमांची संख्या (Relative Marking) | ५० |
| २. | निर्माण करण्यात आलेल्या कृत्रिम विसर्जन स्थळांची संख्या (Relative Marking) | ३० |
| ३. | स्थापना करण्यात आलेल्या पर्यावरणपूरक मूर्तींची टक्केवारी | २० |
| ४. | विसर्जनाच्या आधी आणि नंतर निर्माल्याचे संकलन, विलगीकरण, वाहतूक आणि प्रक्रिया | ५० |
| ५. | जमा केलेल्या पर्यावरणपूरक साहित्याच्या पुनर्वापराची टक्केवारी | ५० |

**आवश्यक तपशील:**

- प्रचार आणि प्रसार कार्यक्रमांच्या (पर्यावरणपूरक मूर्ती, कृत्रिम विसर्जन स्थळ, शाडू मती/ चिकणमाती पुनर्वापरासाठी देणे) संख्येचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- सामाजिक माध्यमांमधून पर्यावरणपूरक (इको-फ्रेंडली) उपक्रमांचा प्रचार करणाऱ्या सोशल मिडिया पोस्ट्ची लिंक - विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- एकूण स्थापना करण्यात आलेल्या पर्यावरणपुरक मूर्तींची संख्या (सार्वजनिक आणि घरगुती).
- निर्माण करण्यात आलेल्या कृत्रिम विसर्जन स्थळांची एकूण संख्या आणि स्थान यांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- शाडू मती/ चिकणमाती/ ओला कचऱ्याचे संकलन, विलगीकरण, प्रक्रिया आणि पुनर्वापर याविषयी सविस्तर अहवाल
- पर्यावरणपूरक विसर्जनाचा प्रचार आणि प्रसार उपक्रमांची (पथनाट्ये, समाज माध्यमांवर प्रचार, निवासी संकुल व उत्सव समित्यांना मार्गदर्शक तत्वे सांगणे, विसर्जनानंतर शाडू मती/ चिकणमाती पुनर्वापरास देणे, इ. )-जिओ-टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- प्रचार आणि प्रसार उपक्रमांमध्ये लावण्यात येणाऱ्या बॅनरवर उपक्रमाचा दिनांक आणि ठिकाणासह माझी वसुंधरा अभियान ६.० ची पार्श्वभूमी असणे आवश्यक आहे.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |
| | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |

# शाश्वत सणांचा प्रचार







कृत्रिम तलावांमध्ये पर्यावरणपूरक मूर्तींचे विसर्जन आणि नदी व तलावांचे प्रदूषण थांबवण्यासाठी धार्मिक कचऱ्यासाठी समर्पित संकलन केंद्र




**सणांमध्ये माती संकलन केंद्र.**

सणांदरम्यान व नंतर २ दिवसांसाठी माती संकलन केंद्र सुरू ठेवण्यात यावेत. दान केलेली माती मूर्तिकारांना पुनर्वापरासाठी दिली जावी.

***सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.***

# पर्यावरण सेवा योजना- (ESS)

पर्यावरण संवर्धन व संरक्षण याचे महत्व शालेय स्तरावर बाल वयात विद्यार्थामध्ये प्रत्यक्ष कृतीद्वारे बिंबवण्यासाठी राज्य शासनाने दि. १४-१-२०११ रोजी शासन निर्णयद्वारे राज्यातील माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमध्ये "पर्यावरण सेवा योजना" (Environment service scheme) सुरु करण्यात आली आहे. योजनेची परिणामकारक अंमलबजावणी, यशस्विता, लक्षप्राप्ती लक्षात घेता माननीय (वित्त) मंत्री महोदय यांनी सन २०२३ रोजीच्या अर्थसंकल्पिय भाषणामध्ये पर्यावरण सेवा योजना राज्यभरातील ७५०० शाळांमध्ये राबविण्याची घोषणा केली आहे. ही योजना पूर्ण राज्यभरात लागू असून योजनेचा दुसरा टप्पा म्हणून आगामी पाच वर्षात राज्यभरातील ७५०० शाळांमध्ये योजना राबविण्यात येत आहे. शिक्षकांसाठी प्रत्यक्ष कृतीद्वारे प्रशिक्षणे ज्यामध्ये शिक्षकांसाठी पाठ्यपुस्तक संलग्न शैक्षणिक साहित्य प्रदान करण्यात येईल, ज्याच्या माध्यमातून विद्यार्थ्यांना पर्यावरणपूरक जीवनशैली अंगिकारणे सोयीचे होईल. योजनेच्या माध्यमातून विद्यार्थ्यांच्या अनुभव विश्वानुसार, स्थानिक पर्यावरणाशी निगडीत प्रत्यक्ष कृती कार्यक्रम आखणे आणि राबविणे यावर भर असणार आहे. विद्यार्थ्यामध्ये पर्यावरण विषयक गुंतागुतीच्या प्रक्रिया समजून घेऊन त्यावर पर्यावरण संवर्धन कृती करण्या सोबतच नेतृत्वगुण, संवादकौशल्य अशा क्षमता विकसित करणे अपेक्षित आहे.

उद्देश: प्रत्यक्ष कृतीतून पर्यावरण संवर्धन, संवेदनशील व सजग नागरिक तयार करणे, लोकसहभागातून स्थानिक पर्यावरणीय समस्या सोडवणे, विद्यार्थ्यांचे कौशल्य विकसन, स्थानिक संसाधन वापराबाबत जागरुकता निर्माण करणे.

- शाळांची ऑनलाईन नोंदणी **(जून ते ऑगस्ट)**
- योजना प्रमुख शिक्षक नियुक्ती व नोंदणी **(जून ते ऑगस्ट )**
- शाळा स्तरावर-विद्यार्थ्यांचा गट स्थापना- ५० विद्यार्थ्यांची गटाची यादी(मुले,मुली सम समान) **(जून ते ऑगस्ट )**
- शाळा गटाद्वारे ई-प्लेज *(ऑनलाईन)* **(जून ते ऑगस्ट )**

**नोंदणी प्रक्रिया**

- योजना प्रमुख शिक्षकांचा ऑनलाईन/प्रत्यक्ष परिचय/प्रशिक्षण कार्यशाळेमध्ये सहभाग **(जुलै ते सप्टेंबर )**
- योजना प्रमुखांद्वारे शाळा स्तरावर विद्यार्थी गटासमवेत घटकसंच आधारित कृती कार्यक्रम नियोजन व अंमलबजावणी **(जून ते जानेवारी )**
- शाळा आणि समुदाय स्तरावर शिबिरे/सभा आयोजन-*(विषयपत्रिका, इतिवृत्तांत/ बैठकीचा तपशील)* ***(डिसेंबर ते फेब्रुवारी )***

**प्रशिक्षणे/ प्रशिक्षणे/ कृती कार्यक्रमे कार्यक्रमे**

- शाळांसाठी विहित कृती उपक्रम छायाचित्रासह पूर्णत्व अहवाल **(फेब्रुवारी-ते मार्च)**
- शाळांनी राबविलेल्या कृती उपक्रमांची मुल्यांकन प्रक्रिया **(फेब्रुवारी ते एप्रिल)**

**अहवाल**

**शाळा सक्रिय सहभागातून "पर्यावरण सेवा योजना" कृती कार्यक्रम-उपक्रम खालील प्रमाणे राबवू शकतातः**

खाली नमुद केल्याप्रमाणे शाळा सक्रिय सहभागाद्वारे "पर्यावरण सेवा योजना (ESS)" ला प्रोत्साहन देऊ शकतातः

| उपक्रमांचे प्रकार | उपक्रमांचा तपशील |
|---|---|
| पर्यावरण जनजागृती | 1. जलः विद्यार्थ्यांना पाणी संवर्धनाचे महत्त्व आणि त्यांच्या दैनंदिन जीवनात पाण्याची बचत करण्याच्या पद्धतींबद्दल शिक्षित करणे.<br>2. घनकचरा व्यवस्थापन पर्यावरणपुरक पद्धतीः पुनर्वापर केलेल्या कागदी पिशव्यांचा वापर, कापडी पिशव्या वापरण्यास प्रोत्साहन आणि एकल वापर प्लॅस्टिक बंदी आणि  प्लॅस्टिक मुक्त शाळा .<br>3. जैवविविधताः वन्यजीव संरक्षण,  रानभाजी महोस्तव, वन्यजीव संरक्षण, दसऱ्याच्या दिवशी आपट्याच्या रोपांचे वाटप, संवादात्मक सत्रे, चित्रकला स्पर्धा इ<br>4. ऊर्जा: भारतीय मानक (BIS) द्वारे ऊर्जा बचत उपकरणांचा वापर, ऊर्जा वापर कमी करणे, नूतनीकरणयोग्य ऊर्जा स्रोतांचा अवलंब करणे तसेच शाश्वत जीवनशैलीला प्रोत्साहन देणे.<br>5. संस्कृती आणि वारसा- पर्यावरणपुरक सणः पर्यावरणपुरक दिवाळी, नैसर्गिक रंगांचा वापर करून पर्यावरणपुरक रंगपंचमी, नायलॉन मांजा न वापरता पतंगोत्सव साजरा करणे, स्थानिक पारंपारिक ज्ञान व वारसा अभ्यास<br>6. जागतिक तापमान वाढ हवामान बदल: (सर्व विषय अंतर्गत जनजागृती मोहीम)<br>7. प्रदूषण :वायू प्रदूषण, हवामान बदल, पाणी आणि कचरा व्यवस्थापन, ऊर्जा संवर्धन इत्यादी विषयांवर जनजागृती मोहिमा राबविणे.<br>8. शाश्वत आणि सुरक्षित वाहतूक-जागरूकता कार्यक्रम: कार्यशाळा, मॉक ड्रिल, पथनाट्य., झेब्रा क्रॉसिंग, स्पीड ब्रेकर, ट्रॅफिक सिग्नल आणि शाळांजवळ नियुक्त केलेले पादचारी मार्ग.सुरक्षित आणि शाश्वत वाहतुक, रस्त्यावरील चिन्ह ओळखा, आपत्कालीन तयारी, आवश्यक क्रमांक जाणून घ्या<br>9. जनजागृती मोहीमः वायू प्रदूषण,पर्यावरण पूरक वाहनाबाबत जनजागृती, हवामान बदल, पाणी आणि कचरा व्यवस्थापन, ऊर्जा संवर्धन इत्यादी विषयांवर जनजागृती मोहिमा राबवविणे.<br>10. पर्यावरणपूरक जीवन शैली व पर्यावरण दिन विशेष  :  स्थानिक संसाधने जसे, माती, पाणी जैवविविधता, आणि ऊर्जा यांच्या सद्यःस्थितीचा अभ्यास करून त्याचे संवर्धन करणे, पर्यावरण दिवस आणि स्पर्धा: पर्यावरण दिन आणि  पर्यावरण दिवसकरिता विविध स्थानिक विशिष्ट पर्यावरणीय समस्यांवर विविध स्पर्धांचे आयोजन करणे, वन्यजीव साप्ताह , जागतिक पर्यावरण दिन जनजागृती, लोकसहभागातून पर्यावरण संवर्धन व उपाययोजना घरगुती व गावपातळीवर करणे. |
| माहिती संकलन प्रकल्प आणि सर्वेक्षण | 1. जल व्यवस्थापनः दैनंदिन पाणी वापर मोजमाप, पाणी गळती मोजमाप (ऑडिट), **पर्जन्यमान,** पावसाचे पाणी मोजमाप अभ्यास व कृती<br>2. घनकचरा व्यवस्थापन: ओला आणि सुका कचरा विलगीकरण, विघटनशील कचरा निर्मिती सर्वेक्षण, प्लास्टिक कचरा सर्वेक्षण शाळा आणि सामुदायिक स्तरावर.<br>3. जैवविविधताः बियाणे संकलन, रोपांची संख्या, स्थानिक प्रजातींचे अनुवांशिक सर्वेक्षण,झाडांचे ऋतू अभ्यास करणे, वृक्षारोपण मोहीम, पक्षी सर्वेक्षण, फुलपाखरू-कीटक-सरपटणारे प्राणी सर्वेक्षण इ.<br>4. ऊर्जा: विद्युत मीटर व वीज बिल अभ्यास,**विद्यार्थी आणि शिक्षकांच्या प्रवास पद्धती अभ्यास, ऊर्जा कार्यक्षम उपकरणे**, घराचे ऊर्जा लेखा परीक्षण, सौर क्षमता मोजणे इ.<br>**5. शाश्वत आणि सुरक्षित वाहतूक- शाळेमध्ये येण्याजाण्या साठीची प्रवास पद्धती अभ्यास, हेल्मेट कसे कार्य करते, शाळा परिसरातील वाहतूक सुरक्षेचा अभ्यास,शालेय सुरक्षिततेसाठी विद्यार्थ्यांची जनजागृती मोहीम,** |
| पुरावा आधारित प्रकल्प/कृती/परिणाम | 1. जल संवर्धन उपचारात्मक कृतीः गळती नळ बदल, शोषखड्डे, पावसाचे पाणी साठवण प्रणाली, **पाणी तपासणी,**  भूजल पुनर्भरण, सांडपाणी व्यवस्थापन पुनर्वापर आणि सांडपाणी शुद्धीकरणासाठी वनस्पतीचा वापर करणे (Root Zone Technology), परसबागेतील अभ्यास ), हरित शाळा व शाळेतील पाणी व स्वच्छतेबद्दल सुधारणा इकोव्हिलेज / इकोसिटी<br>2. घनकचरा व्यवस्थापनः कचरा कंपोस्टिंग, गांडूळ खत, कंपोस्टिंग मॉडेल्सची आधुनिक तंत्रे, जैविक खत निर्मिती व वापर.कुजणाऱ्या कचऱ्यापासून खत निर्मिती, इकोसॅन (इकॉलॉजिकल सॅनिटेशन)<br>3. जैवविविधताः शाळेच्या आवारात रोपांची निर्मिती करून वृक्षारोपण कार्यक्रम आयोजित करणे आणि त्यांचे संगोपन करणे, शालेय जैवविविधता रजिस्टर, गाव जैवविविधता रजिस्टर अद्ययावत करणे आपली परिसंस्थेचा / अधिवास अभ्यास ( जंगल, नदी, तलाव, गवताळ ), रस्त्याच्या लगत हरितपट्टा विकसित करणे, स्मृती वने, औषधी वनस्पती उद्यान इ.<br>4. ऊर्जा: ऊर्जा कार्यक्षम साधने आणि उपकरणे,**जळावू लाकूड फाटा अभ्यास**, बायोगॅसचा वापर,अपारंपरिक उर्जा स्त्रोत - सौर उर्जा व पवन उर्जाऊर्जा संवर्धन पद्धतींसाठी शालेय स्तर आणि सामुदायिक स्तरावरील पोस्टर्स,<br>5. स्थानिक स्वराज्य संस्था आणि इतर विभाग शालेय सहभागातून विद्यार्थी आणि समुदायांना सहभागी करून संवर्धन उपक्रमाची अंमलबजावणीत करू शकतात.<br>**6. शाश्वत आणि सुरक्षित वाहतूक- रस्त्यावर,काळजीपूर्वक वागा, आपण शाळेत कसे जातो, वाहतूक पद्धतींची तुलना**<br>**टीप- पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग महाराष्ट्र शासन,राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद(SCERTM) व पर्यावरण राज्य सनियंत्रण संस्थे  मार्फत विकसित शिक्षक हस्तपुस्तिकेतील उपक्रम गुणांकासाठी ग्राह्य धरण्यात येतील.** |

| ५.१० | महाराष्ट्र युथ फॉर क्लायमेट ऍक्शन (MYCA) उपक्रमाद्वारे वातावरणीय बदलाबाबत तरुणांमध्ये जनजागृती | गुण २०० |
|---|---|---|

**माझी वसुंधरा अभियान, वातावरणीय बदलासाठी राज्य कृती आराखडा आणि मिशन LiFE अंतर्गत वातावरणीय कृतींच्या एकत्रीकरणासाठी तरुणांची महत्त्वपूर्ण भूमिका आहे. महाराष्ट्र युथ फॉर क्लायमेट ॲक्शन (MYCA) हा युनिसेफ महाराष्ट्र आणि डेव्हलपमेंट पार्टनर्सने तरुणांना वातावरणीयविषयक कृतींमध्ये सक्षम बनवणारा एक युवांसाठी कार्यक्रम आहे.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | ‘द यूथ लीडरशिप फॉर क्लायमेट ॲक्शन’ या ऑनलाइन अभ्यासक्रमासाठी नोंदणी केलेल्या तरुणांची संख्या. (Relative Marking) | ५० |
| २. | ‘द युथ लीडरशिप फॉर क्लायमेट ॲक्शन’ हा ऑनलाइन अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या तरुणांची संख्या. (Relative Marking) | ५० |
| ३. | “वाय वेस्ट” YEWS ऍप्लिकेशनवर पाणी संवर्धनाची रिपोर्टिंग करणाऱ्या तरुणांची संख्या (लिटर मध्ये केलेली पाण्याची बचत) . (Relative Marking) | ५० |
| ४. | MYCA ने आयोजित केलेल्या वातावरणीय कृती कार्यशाळा/वेबिनार/परिषद/कार्यक्रमांमध्ये सहभागी झालेल्या तरुणांची संख्या. (Relative Marking) | ५० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ **https://www.mahayouthnet.in/ वर** ‘द यूथ लीडरशिप फॉर क्लायमेट ॲक्शन’ या ऑनलाइन अभ्यासक्रमासाठी नोंदणी केलेल्या तरुण सहभागींची यादी.
- ❑ अभ्यासक्रम पूर्ण केल्याची प्रमाणपत्रे ‘युथ लीडरशिप फॉर क्लायमेट ॲक्शन’ अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांची यादी.
- ❑ “वाय वेस्ट” YEWS ऍप्लिकेशन द्वारे लिटर मध्ये पाण्याची बचत करणाऱ्या तरुणांची यादी.
- ❑ MYCA द्वारे आयोजित केलेल्या स्थानिक वातावरणीय कृती कार्यशाळा/वेबिनार/परिषद/कार्यक्रमांमध्ये सहभागी झालेल्या तरुणांचा तपशील. उदा. जागतिक पृथ्वी दिवस, जागतिक पर्यावरण दिवस, जागतिक जल दिवस, इत्यादी.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

**SDG ४. गुणवत्तापूर्ण शिक्षण**

४.७ : २०३० पर्यंत, शाश्वत विकास आणि शाश्वत जीवनशैली, मानवी हक्क, लैंगिक समानता, शांतता आणि अहिंसेच्या संस्कृतीला प्रोत्साहन देण्यासाठी इतरांसह, शाश्वत विकासाला चालना देण्यासाठी आवश्यक ज्ञान आणि कौशल्ये सर्व विद्यार्थ्यांनी आत्मसात केल्याची खात्री करणे. , जागतिक नागरिकत्व आणि सांस्कृतिक विविधता आणि शाश्वत विकासासाठी संस्कृतीच्या योगदानाचे कौतुक करणे.

# माझी वसुंधरा अंतर्गत जनजागृती उपक्रम







**नैसर्गिक परिसंस्थेचे रक्षण करण्याच्या महत्त्वाबद्दल नागरिकांना जागरूक करण्यासाठी प्रमोल्गेशन स्पॉट्स.**

# माझी वसुंधरा अंतर्गत जनजागृती उपक्रम





**नैसर्गिक परिसंस्थेचे रक्षण करण्याच्या महत्त्वाबद्दल नागरिकांना जागरूक करण्यासाठी प्रमोल्गेशन स्पॉट्स.**

# १. भूमी

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| **१.१ हरित आच्छादन आणि जैवविविधता** | | |
| १.१.१ | माझी वसुंधरा अभियानादरम्यान लावलेली आणि जगवलेली एकूण झाडे | • ग्रीन इंडिया मिशन – पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रालय, भारत सरकार<br>• वनमहोत्सव- महाराष्ट्र वन विभाग, महाराष्ट्र शासन तर्फे वृक्षारोपण<br>• अमृतवन उद्यान निर्मिती- महसूल व वन विभाग , महाराष्ट्र सरकार , शासन निर्णय ता. १० एप्रिल<br>• बेलवन वन उद्यान निर्मिती- महसूल व वन विभाग महाराष्ट्र शासन शासन, १० एप्रिल २०२३ चे शासन निर्णय<br>• एक पेड मॅं के नाम. |
| १.१.२ | जिओ- टॅगिंगसह वृक्षगणना - तयारी आणि प्रकाशन | • महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम १९७५<br>• महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) झाडांचे संरक्षण आणि संवर्धन (सुधारणा) अधिनियम, २०२१ |
| १.१.३ | महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम १९७५ ची अंमलबजावणी | |
| १.१.४ | रोपवाटीकांची निर्मिती | --------- |
| १.१.५ | नवीन हरित क्षेत्रांचा विकास व देखभाल (उदा. अमृत वने, सार्वजनिक उद्याने) | • अमृत २.० नवीकरण आणि शहरी परिवर्तन अटल अभियान – केंद्रीय गृह आणि शहरी व्यवहार मंत्रालय, भारत सरकार |
| १.१.६ | वृक्ष योजना : किमान ३३ % हरित आच्छादन प्राप्त करण्यासाठीची योजना | • ग्रीन इंडिया अभियान – पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रालय, भारत सरकार<br>• महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) झाडांचे संरक्षण आणि संवर्धन (सुधारणा) अधिनियम, २०२१ |
| १.१.७ | लोकजैवविविधता नोंदवही (PBR) तयारी आणि दस्तऐवजीकरण | • जैव विविधता अधिनियम, २००२<br>• जैव विविधता नियम, २००४<br>• जैविक विविधता (संशोधन) अधिनियम , २०२३ |
| १.१.८ | मातीच्या माध्यमातून कार्बन सिंक करणे. | • मृदा स्वास्थ्य कार्ड योजना - https://soilhealth.dac.gov.in/home |

# १. भूमी

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| **१.१ हरित आच्छादन आणि जैवविविधता** | | |
| १.१.९ | बांबू/ खस/शेवगा लागवड | • राष्ट्रीय बांबू मिशन.<br>• महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी कायदा.<br>• PoCRA - नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प. (फक्त 16 जिल्ह्यांसाठी)<br>• अटल बांबू समृद्धी योजना |
| १.१.१० | बीज संकलन केंद्र | • महाराष्ट्र जनुक कोष प्रकल्प, शासन निर्णय दिनांक २५ मे २०२२<br>• वनस्पती जाती आणि शेतकरी हक्कांचे संरक्षण अधिनियम, २००१ |

# १. भूमी

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| | **१.२. घनकचरा व्यवस्थापन** | |
| १.२.१ | घनकचरा व्यवस्थापन: निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण आणि संकलन | • स्वच्छ भारत अभियान 2.0 (शहरी), केंद्रीय गृह निर्माण आणि शहरी व्यवहार मंत्रालय, भरत सरकार<br>• नगर विकास विभाग, महाराष्ट्र शासन<br>• घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६.<br>• राष्ट्रीय बयोगैस कार्यक्रम<br>• गैल्वनाइजिंग ऑर्गेनिक बायो-एग्रो रिसोर्सेज धन (GOBARdhan) |
| १.२.२ | ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया | |
| १.२.३ | सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया /विल्हेवाट | |
| १.२.४ | जुन्या साठलेल्या कचऱ्यावर (Legacy Waste) शास्त्रोक्त प्रक्रिया | • वर्षानुवर्षे साठून राहिलेल्या कचऱ्याची विल्हेवाट लावण्यासाठी केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळाद्वारे मार्गदर्शक तत्त्वे<br>• SWM नियम, २०१६ च्या अनुसूची-I चे खंड 'J' नुसार<br>• स्वच्छ भारत अभियान 2.0 (शहरी), केंद्रीय गृह निर्माण आणि शहरी व्यवहार मंत्रालय, भरत सरकार |
| १.२.५ | प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल युज प्लास्टिकवर (SUP) बंदी) | • १ जुलै २०२२ पासून लागू केलेल्या एकल वापर प्लास्टिकच्या वस्तूंवर बंदीची अधिसूचना, भारत सरकार. G.S.R. 571 (E) दिनांक १२ ऑगस्ट २०२१<br>• महाराष्ट्र प्लास्टिक आणि थर्माकोल उत्पादने (MUSTH&S) अधिसूचना, २०१८<br>• स्वच्छ भारत अभियान 2.0 (शहरी), केंद्रीय गृह निर्माण आणि शहरी व्यवहार मंत्रालय, भरत सरकार |
| १.२.६ | जैववैद्यकीय (बायो-मेडिकल) कचरा व्यवस्थापन | • जैववैद्यकीय कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ |
| १.२.७ | ई-कचरा व्यवस्थापन | • ई-कचरा व्यवस्थापन नियम, २०२२<br>• ई-कचरा व्यवस्थापन नियम, २०१६<br>• बॅटरी कचरा व्यवस्थापन नियम, २०२२ |
| १.२.८ | हागणदारीमुक्तीचा (ODF) दर्जा | • स्वच्छ भारत अभियान 2.0 (शहरी), केंद्रीय गृह निर्माण आणि शहरी व्यवहार मंत्रालय, भरत सरकार<br>• नगर विकास विभाग, महाराष्ट्र सरकार<br>• महाराष्ट्र शौचालाय अनुदान योजना |

# २. वायू

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| २.१ | वायू गुणवत्ता परिक्षण - पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEF&CC) किंवा NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेद्वारे | • राष्ट्रीय स्वच्छ वायू कार्यक्रम (NCAP)- पर्यावरण, वन आणि वातावरण बदल मंत्रालय, भारत सरकार<br>• महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ- श्रेणीबद्ध प्रतिसाद कृती योजना<br>• केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळ- वायू गुणवत्ता परीक्षणाची संकल्पनात्मक मार्गदर्शक तत्त्वे व सामान्य पद्धती<br>• राष्ट्रीय परीवेशी वायू गुणवत्ता मानक (NAAQS)<br>• **राष्ट्रीय वायू गुणवत्ता निगरानी कार्यक्रम**(NAMP) |
| २.२.१ | फटाक्यांवर बंदी घालण्याकरिता पुढाकार | --------- |
| **२.२.२** | नागरिकांमध्ये चांगल्या सवयींना प्रोत्साहन – सायकलिंग ट्रॅकची निर्मिती आणि पादचारी मार्ग | --------- |
| **२.२.३** | बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन | • स्वच्छ भारत अभियान 2.0 (शहरी), केंद्रीय गृह निर्माण आणि शहरी व्यवहार मंत्रालय, भारत सरकार<br>• बांधकाम आणि पाडकाम (C & D) कचरा व्यवस्थापन (सुधारणा) नियम, २०१६<br>• राष्ट्रीय स्वच्ह वायू कार्यक्रम (NCAP)- पर्यावरण, वन आणि वातावरण मंत्रालय, भारत सरकार.<br>• बांधकामसाहित्य व बांधकाम आणि पाडकाम (C & D) कचरा हाताळताना धूळ क्षमानाच्या उपायांवर मार्गदर्शक तत्वे<br>• बांधकाम आणि पाडकाम (C & D) कचऱ्याच्या पर्यावरणीय व्यवस्थापनावरील मार्गदर्शक तत्त्वे |
| **२.३.१** | इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरण : इलेक्ट्रिक वाहनांची संख्या | • महाराष्ट्र इलेक्ट्रीक वाहन धोरण, २०२१, महाराष्ट्र शासन<br>• शासन निर्णय क्रमांक: MSEVP-२०२१/CR २५/TC ४, पर्यावरण आणि हवामान बदल विभाग, महाराष्ट्र शासन<br>• इलेक्ट्रिक मोबिलिटी प्रमोशन योजना 2024ची राजपत्र सूचना |
| **२.३.२** | इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्टेशनची संख्या | |

# २. वायू

| अ. क्र | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| २.४ | ध्वनी प्रदूषण कमी करणे | • ध्वनी प्रदूषण (नियंत्रण व नियमन) नियम, २००० |
| २.५ | वातावरणीय बदल (Climate Change) - जनजागृती | --------- |
| २.६ | आपत्ती व्यवस्थापनाची तयारी | • आपदा प्रबंधन अधिनियम, २००५<br>• राष्ट्रीय आपदा प्रबंधन नीती, २००९<br>• राष्ट्रीय आपदा प्रबंधन योजना. २०१९<br>• महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन योजना |
| २.७ | वातावरणीय बदल कृती (केवळ अमृत शहरांसाठी) | • वतावरणीय बदलासाठि राष्ट्रीय कृती योजना https://static.pib.gov.in/WriteReadData/specificdocs/documents/2021/dec/doc202112101.pdf<br>• भारताचे राष्ट्रीय निर्धारित योगदान (NDC'S) - https://unfccc.int/sites/default/files/NDC/2022-08/India%20Updated%20First%20Nationally%20Determined%20Contrib.pdf |

# ३. जल

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
| --- | --- | --- |
| ३.१ | जल संसाधन संवर्धन आणि पुनरुज्जीवन | • अमृत २.०- नवीकरण आणि शहरी परिवर्तन अटल अभियान- केंद्रीय गृह आणि शहरी व्यवहार मंत्रालय भारत सरकार.<br>• जल युक्त शिवार अभियान, महाराष्ट्र शासन<br>• अमृत सरोवर, जल शक्ती अभियान, कॅच द रेन, २०२२ |
| ३.२ | सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग) | • कॅच द रेन: जलशक्ती अभियान, जलशक्ती मंत्रालय जल संसाधन विभाग, नदी विकास आणि गंगा पुनरुज्जीवन<br>• अमृत २.०- नवीकरण आणि शहरी परिवर्तन अटल अभियान- केंद्रीय गृह आणि शहरी व्यवहार मंत्रालय भारत सरकार. |
| ३.२.२ | पावसाचे पाणी झिरपणारे पाझरखड्डे | ------------ |
| ३.२.३ | भूजल पुनर्भरण (विहिरी/ विंधन विहिरी) | --------- |
| ३.३ | सार्वजनिक इमारतींसाठी जल अंदाजपत्रक आणि लेखापरीक्षण (वॉटर ऑडिट) | • महाराष्ट्र शासन, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, परिपत्रक क्र. RWS १००४/ CR २४/WS-०७ तारीख: २५ मे २००४<br>• केंद्रीय जल आयोग – जल लेखापरीक्षण आणि जलसंवर्धनासाठी सामान्य मार्गदर्शक तत्त्वे, २०१७ |
| ३.३.२ | पाणीपुरवठा प्रणालीचे जल लेखापरीक्षण (वॉटर ऑडिट) | |
| ३.३.३ | पाणी गुणवत्ता परीक्षण | • केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळ – पाणी गुणवत्तेची मानके<br>• राष्ट्रीय पाणी गुणवत्ता परीक्षण कार्यक्रम.<br>• BIS- पिण्याच्या पाण्याची मानके (IS 10500 : 2012) |

# ३. जल

| अ. क्र | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| ३.४ | सांडपाणी प्रक्रिया व प्रक्रिया केलेल्या पाण्याचा पुनर्वापर | • अमृत २.०- नवीकरण आणि शहरी परिवर्तन अटल अभियान- केंद्रीय गृह आणि शहरी व्यवहार मंत्रालय भारत सरकार.<br>• स्वच्छ भारत अभियान २.०, केंद्रीय गृह आणि शहरी व्यवहार मंत्रालय भारत सरकार. |
| ३.५ | शाश्वत सणांचा प्रसार | • मूर्ती विसर्जनासाठी केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळाद्वारे सुधारित मार्गदर्शक तत्त्वे, २०२० |
| ३.६ | पाणथळ जागांचे संवर्धन | • पाणथळ क्षेत्र संवर्धन आणि व्यवस्थापन नियम, २०१७, पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रालय, भारत सरकार |

# ४. अग्नी

| अ. क्र | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| ४.१ | नुतनीकरणयोग्य ऊर्जा स्रोत आणि निव्वळ शून्य कार्बन उत्सर्जनाबाबत प्रसार व प्रचार | --------- |
| ४.२.१ | हरित पथदिवे | • पथदिवे राष्ट्रीय कार्यक्रम, उर्जा कार्यक्षमता सर्व्हिसेस लिमिटेड, उर्जा मंत्रालय अंतर्गत सर्वजनिक क्षेत्रातील संयुक्त उपर्क्रम , भारत सरकार |
| ४.२.२ | स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये अक्षय ऊर्जा प्रकल्प बसवणे | ग्रिड कनेक्टेड रूफटॉप सौर उपक्रम, नवीन आणि अक्षय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार. |
| ४.२.३ | हरित इमारती | --------- |
| ४.२.४. | सार्वजनिक इमारतींचे उर्जा लेखापरीक्षण | • उर्जा बचत कार्यक्रम, महाराष्ट्र उर्जा विकास अभिकरण<br>• राष्ट्रीय उर्जा संरक्षण अधिनियम , ब्युरो ऑफ एनर्जी एफिशियन्सीद्वारे मार्गदर्शक तत्वे |
| ४.२.५ | कूल रूफिंग | --------- |

महाराष्ट्र शासन

Majhi Vasundhara

पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग

# माझी वसुंधरा अभियान ६.०

## प्रारूप टूलकीट (ग्रामीण) २०२५ - २०२६



**परिशिष्ट-२**

# अनुक्रमणिका

# माझी वसुंधरा अभियान

**महाराष्ट्र शासनाच्या पर्यावरण व वातावरणीय बदल विभागामार्फत** नागरी आणि ग्रामीण क्षेत्रांसाठी राबविण्यात येणारा अनोखा एकात्मिक असा उपक्रम आहे. यामध्ये नैसर्गिक परिसंस्थांचे जतन व संरक्षण करण्यासाठीच्या विविध उपायांची अंमलबजावणी करणे आणि वातावरणीय बदलाच्या अनुषंगाने राबविण्यात येणाऱ्या पर्यावरणपूरक कृती उपक्रमांवर नागरिकांच्या सहभागास प्रोत्साहित करणे, या बाबी समाविष्ट केल्या आहेत.

या अभियानाची रचना **कार्बन पृथक्करण, हरित वायूचे उत्सर्जन कमी करणे आणि नागरिकांमध्ये शाश्वत जीवनशैलीचा प्रचार करणे** या वातावरणीय बदलाच्या तीन महत्त्वाच्या बाबींवर लक्ष केंद्रित करण्यासाठी करण्यात आली आहे.

**अधिक माहितीसाठी भेट दया. :** https://majhivasundhara.in



# शाश्वत विकास उद्दिष्टे

- शाश्वत विकास उद्दिष्टे (SDGs), ज्यांना जागतिक उद्दिष्टे म्हणूनही ओळखले जाते, २०१५ मध्ये संयुक्त राष्ट्रांनी गरिबी समाप्त करण्यासाठी, आणि आपल्या पृथ्वीचे संरक्षण करण्यासाठी सार्वत्रिक आवाहन म्हणून स्वीकारले होते.
- ही उद्दिष्ट्ये जनसमुदायाच्या आणि पृथ्वीच्या शांतता आणि समृद्धीसाठी सामायिक योजना प्रदान करतात.
- ही १७ शाश्वत विकास उद्दिष्टे एकात्मिक आहेत म्हणजेच एका क्षेत्रातील कृतीचा इतर क्षेत्रांवर परिणाम होतो हे जाणून सर्वांगीण विकासाने सामाजिक, आर्थिक आणि पर्यावरणीय शाश्वततेचे संतुलन साधले पाहिजे.

## शाश्वत विकास उद्दिष्टे आणि माझी वसुंधरा अभियान

- माझी वसुंधरा अभियान संयुक्त राष्ट्रांच्या शाश्वत विकास उद्दिष्टांशी संरेखित आहे कारण दोन्ही सर्वांगीण सामाजिक विकासाला संबोधित करतात.
- माझी वसुंधरा अभियान निसर्गाच्या पाचही घटकांवर (पंचमहाभूते) लक्ष केंद्रित करते – भूमी, वायू, जल, अग्नी आणि आकाश.
- निसर्गाच्या पाच घटकांना संबोधित करून आणि नागरिकांच्या सहभागाला प्रोत्साहन देऊन, माझी वसुंधरा अभियान शाश्वत विकास उद्दिष्टे साध्य करण्यासाठी योगदान देते.



# वेळापत्रक -

## माझी वसुंधरा अभियान ६.०

१ एप्रिल २०२५ – ३१ मार्च २०२६

**अभियान कालावधी**

१ एप्रिल – १५ एप्रिल २०२६

**MIS सबमिशन**

६ एप्रिल – २५ एप्रिल २०२६

**डेस्कटॉप मूल्यमापन**

२ मे – २० मे २०२६

**क्षेत्रीय तपासणी**

५ जून २०२६

**पुरस्कार वितरण**

# माहिती संकलन कार्यपद्धती

- माझी वसुंधरा अभियान ५.० मध्ये सहभागी झालेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांचा माझी वसुंधरा अभियान ६.० मध्ये थेट समावेश होईल.
- माझी वसुंधरा अभियान ५.० मध्ये सहभागी न झालेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांनी माझी वसुंधरा अभियान ६.० मध्ये सहभागी होण्यासाठी अभियानाच्या MIS पोर्टलवर नोंदणी करावी. अधिक माहितीसाठी https://abhiyanmis.majhivasundhara.in/ या संकेतस्थळाला भेट द्या.
- स्थानिक स्वराज्य संस्थांनी अभियान कालावधीत विविध उपक्रम राबवावेत आणि सदर उपक्रमांची माहिती MIS पोर्टलवर सादर करण्यासाठी आवश्यक तो सर्व तपशील तयार ठेवावा.
- स्थानिक स्वराज्य संस्थांनी टूलकिटमध्ये नमूद केल्याप्रमाणे MIS मध्ये त्यांची प्रगती आणि कामाचा अहवाल सादर करावा.
- माझी वसुंधरा अभियानाच्या MIS पोर्टलवर विहित स्वरूपात MIS सादर करावा.
- माझी वसुंधरा अभियान पोर्टलवरील माहिती अचूक, विश्वासार्ह आणि सत्य असल्याबाबतची जबाबदारी **स्थानिक स्वराज्य संस्थेच्या प्रशासकीय प्रमुखांची** असेल.

***टीप:*** *स्थानिक स्वराज्य संस्थांनी सर्व कागदपत्रांच्या मूळ प्रती जतन कराव्यात. अभियान संचालनालयात, संबंधित कागदपत्रे पुन्हा सादर करावे लागू शकतात.*

# महत्त्वाचे मुद्दे

- माझी वसुंधरा अभियान ६.० च्या कालावधीत म्हणजे, **दिनांक १ एप्रिल २०२५ ते दिनांक ३१ मार्च २०२६** या कालावधीत केलेल्या सर्व उपाययोजनांचा मूल्यमापनासाठी विचार केला जाईल.

- माझी वसुंधरा अभियान संचालनालयाने विहित केलेल्या नमुन्यामध्येच (फॉरमॅट/टेम्प्लेट्स) तपशील सादर करणे आवश्यक आहे. सदर नमुने MIS पोर्टलवर डाऊनलोड करण्यासाठी उपलब्ध असेल.

- कोणत्याही निर्देशकासाठी, जर सादर केलेले दस्तऐवज वैध/सुवाच्य नसतील आणि/किंवा गुगल लिंक्स अवैध असतील, तर त्यासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

- MIS वर नोंदवलेल्या माहितीच्या आधारे त्रयस्त यंत्रणेद्वारे डेस्कटॉप मूल्यमापन करण्यात येईल. त्यानंतर क्षेत्रीय तपासणी व मूल्यमापन (फील्ड मूल्यमापन) त्रयस्त यंत्रणेद्वारे करण्यात येईल.

# माझी वसुंधरा अभियान ६.०

## पंचायत राज संस्था (PRI) - गट

| ग्रामपंचायत | लोकसंख्या | |
|---|---|---|
| (०१) | १० हजार पेक्षा अधिक | ३३६ |
| (०२) | ५ हजार ते १० हजार | १,३८३ |
| (०३) | ३ हजार ते ५ हजार | ३,२३१ |
| (०४) | २ हजार ते ३ हजार | ५,२१३ |
| (०५) | १.५ हजार ते २ हजार | ४,९०० |
| (०६) | १ ते १.५ हजार | ६,८१३ |
| (०६) | १ हजार पेक्षा कमी | ६,०१९ |
| **ग्रामीण** | | २७,८९५ |

*टीप: सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्था आपल्या लोकसंख्येनुसार संबंधित गटात स्पर्धा करतील.*

*सदर लोकसंख्येचे गट २०११ च्या जनगणना अहवालानुसार तयार करण्यात आले आहेत.*

# प्राथमिक माहिती संकलन

## पंचायत राज संस्थांची माहिती

| स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव आणि प्रकार |
| --- |
| **स्थानिक स्वराज्य संस्थेचे भौगोलिक क्षेत्रफळ** |
| **लोकसंख्या** |
| **ग्रामपंचायतीमधील घरांची संख्या** |
| **प्रशासकीय प्रमुख यांचा तपशील** (नाव, संपर्क क्रमांक) |
| **गट विकास अधिकारी यांचा तपशील** (नाव, संपर्क क्रमांक) |
| **समन्वय (नोडल) अधिकारी यांचा तपशील**<br>(नाव, पदनाम, संपर्क क्रमांक) |
| **अधिकृत सोशल मिडिया पेज किंवा संकेतस्थळाची लिंक** |

टीप: *सदर लोकसंख्येचे गट २०११ च्या जनगणना अहवालानुसार तयार करण्यात आले आहेत.*

# जिओटॅगिंगसाठी मार्गदर्शक सूचना

**माझी वसुंधरा अभियान ६.० अंतर्गत छायाचित्रे जिओटॅग करण्यासाठीच्या सूचना:**

- ❖ मोबाईलमध्ये प्ले स्टोअर उघडा, जिओटॅगिंग ॲप्स शोधा, सूचीमधून कोणतेही जिओ-टॅगिंग ॲप डाउनलोड करा आणि इंस्टॉल करा.
- ❖ जिओटॅगिंग ॲप उघडा आणि पूर्वी/दरम्यान/नंतरची छायाचित्रे घेताना एकाच ठिकाणाहून (angle) क्लिक करा.
- ❖ क्लिक केलेली जिओटॅग छायाचित्रे फोल्डरमध्ये सेव्ह करा.
- ❖ छायाचित्रे अपलोड करण्यापूर्वी त्यांची Size १ ते २ MB असल्याची खात्री करा.

**भूमी थीमॅटीक क्षेत्रासाठी : प्रत्येक ठिकाणाची (वृक्षारोपण करण्यापूर्वी/दरम्यान/नंतर) विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओ-टॅग केलेली छायाचित्रे पीडीएफ (PDF) स्वरूपात एकत्र संकलित करून अपलोड करावीत.**

**सर्व जिओटॅग केलेल्या छायाचित्रांमध्ये खालील घटक असल्यानंतरच छायाचित्रे वैध मानले जातील:**

- ❖ अक्षांश आणि रेखांश
- ❖ दिनांक (जेव्हा छायाचित्र काढण्यात आली.)
- ❖ ठिकाणाचे नाव

# जिओटॅग छायाचित्रांसाठी मार्गदर्शक सूचना

**छायाचित्रे वैध मानली जाण्यासाठी खालील तपशील जिओटॅग केलेल्या छायाचीत्रांवर नमूद असणे आवश्यक आहे:**

१. पंचायत राज संस्थेचे नाव

२. जिल्ह्याचे नाव

३. अक्षांश (Longitude) आणि रेखांश (Latitude)

४. दिनांक आणि वेळ









# MIS मध्ये गुगल मॅप लिंक कशी टाकायची याविषयी मार्गदर्शक सूचना:




टप्पा १: तुमच्या संगणकामध्ये गूगल मॅप सुरू करा.



टप्पा २: तुम्ही शेअर करू इच्छित असलेल्या दिशानिर्देश, नकाशा किंवा मार्ग शोधा. यानंतर वर डावीकडे असलेल्या मेनू या पर्यायावर क्लिक करा.

**टप्पा ३: शेअर किंवा एंबेड मॅप यावर क्लिक करा.**






**टप्पा ४: लिंक कॉपी करा आणि आवश्यक त्या ठिकाणी पेस्ट करा.**

स्थानिक स्वराज्य संस्थांनी निर्देशकांमध्ये दिलेल्या गुगल मॅप लिंक डेस्कटॉप असेसारद्वारे तपासल्या जातील. फिल्ड मूल्यांकनासाठी, असेसरला समान लिंक दिली जाईल. त्यामुळे, स्थानिक स्वराज्य संस्थांनी अचूक गुगल मॅप लिंक पुरवावी.

# IEC/प्रचारात्मक उपक्रमांच्या छायाचित्रांसाठी मार्गदर्शक सूचना

- जनजागृती उपक्रमांसाठी सादर केलेली सर्व छायाचित्रे ही उपक्रम ज्या तारखेला झाला त्या तारखेसह जिओटॅग केलेली असावीत.

- प्रत्येक उपक्रमासाठी, उपक्रमाची पार्श्वभूमी/बॅनर स्पष्टपणे दर्शवेल, असे किमान एक छायाचित्र काढणे आवश्यक आहे.

- बॅनरवर माझी वसुंधरा अभियान ६.० व MissionLiFE चे बोधचिन्ह (लोगो) व नाव असणे आवश्यक आहे.

- बॅनरवर कार्यक्रमाचे शीर्षक असावे. उदाहरणार्थ, जर वातावरणीय बदलाविषयी जनजागृती निर्माण करणारा उपक्रम असेल तर "वातावरणीय बदलाबाबत जागरूकता" असे स्पष्ट शीर्षक असावे.

- छायाचित्रात कार्यक्रमात सहभाग घेतलेल्या सहभागींचा समावेश असणे आवश्यक आहे.

- जनजागृती उपक्रमांमध्ये वातावरणीय बदलाची मूलभूत व्याख्या, संकल्पना, शासकीय नियम आणि धोरण आणि त्या विषय/निर्देशकासंबंधी राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय परिस्थिती या मुद्यांचा समावेश असावा.

- #majhivasundhara आणि #MissionLiFE हे हॅशटॅग वापरुन समाज माध्यमावर उपक्रम व कार्यक्रमांच्या पोस्ट कराव्या.

# १. भूमी (ग्रामीण) – ४,०७५

| | |
|---|---|
| १.१ हरित आच्छादन आणि जैवविविधता | २,५७५ |
| १.२ घनकचरा व्यवस्थापन | १,५०० |

# १.१ हरित आच्छादन आणि जैवविविधता

| अ.क्र. | कृती बिंदू | गुण |
|---|---|---|
| १.१.१ | माझी वसुंधरा अभियानादरम्यान लावलेली आणि जगवलेली एकूण झाडे | १,५०० |
| १.१.२ | नवीन हरित क्षेत्रांचा विकास व देखभाल | ३०० |
| १.१.३ | जिओटॅगिंगसह वृक्षगणना- तयारी व प्रकाशन | १२५ |
| १.१.४ | रोपवाटिकेची निर्मिती | १०० |
| १.१.५ | लोकजैवविविधता नोंदवही (PBR) तयारी आणि दस्तऐवजीकरण | १५० |
| १.१.६ | बीज संकलन केंद्र | १५० |
| १.१.७ | वातावरण अनुकूल शेती | २५० |
| एकूण | | २,५७५ |

| १.१.१ | माझी वसुंधरा अभियानादरम्यान लावलेली आणि जगवलेली एकूण झाडे | गुण १,५०० |
|---|---|---|

वृक्षारोपण हे आपल्या पृथ्वीचे आणि परिसंस्थेचे रक्षण करण्यासाठीचे एक आवश्यक पाऊल आहे. झाडे हवेतील कार्बन डायऑक्साइड शोषून, झाडे आणि मातीमध्ये कार्बन साठवून, वातावरणात ऑक्सिजन सोडून वातावरणीय बदल रोखण्यास मदत करतात . सदर निर्देशकाद्वारे स्थानिक स्वराज्य संस्थांनी वृक्षारोपण मोहीमा हाती घेतल्या होत्या की नाही आणि त्यांनी लावलेल्या एकूण झाडांपैकी (स्थानिक झाडांसह) किती झाडे जगवली आणि त्यांची काळजी घेतली का हे तपासले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० अंतर्गत लागवड केलेल्या व जगवलेल्या वृक्षांची (सर्व स्थानिक प्रजाती आणि बांबूसह) एकूण संख्या **(Relative Marking)** | २०० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान लागवड केलेल्या आणि जगवलेल्या एकूण वृक्षांपैकी स्थानिक वृक्षांची एकूण संख्या **(Relative Marking)** | ३०० |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान लागवड केलेल्या आणि जगवलेल्या एकूण वृक्षांपैकी बांबूची एकूण संख्या **(Relative Marking)** | ५०० |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान लागवड केलेल्या आणि जगवलेल्या एकूण वृक्षांपैकी खस / शेवगा वृक्षांची एकूण संख्या **(Relative Marking)** | ३०० |
| ५. | **अपकीप (Upkeep):**<br>माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान लावलेले आणि जगवलेले वृक्षांची एकूण संख्या **(Relative Marking)** | २०० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ लागवड केलेल्या आणि जगवलेल्या वृक्षांची एकूण संख्या (सर्व स्थानिक प्रजाती आणि बांबूसह)
- ❑ लावलेल्या आणि जगवलेल्या स्थानिक वृक्षांची, बांबूची आणि खस / शेवगा वृक्षांची संख्या
- ❑ स्थानाचे तपशील: संपूर्ण पत्ता, प्रकल्पाचे गुगल मॅपवरील स्थान इत्यादी माहिती विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- ❑ भूखंडांवर वृक्षारोपण: विकसित केलेली एकूण हरित क्षेत्रे चौरस मीटर (चौ. मी.) मध्ये
- ❑ रस्त्याच्या कडेला वृक्षारोपण: रस्त्याच्या कडेला करण्यात आलेल्या वृक्षारोपणाची एकूण लांबी (मीटर मध्ये).
- ❑ वृक्षारोपण उपक्रमांचे कार्यारंभ आदेश आणि कार्य पूर्णत्वाचे प्रमाणपत्र.
- ❑ वृक्षारोपण उपक्रमाची आर्थिक माहिती: अंतिम पावत्यांसह सर्व देयके. जर, वृक्षारोपण व्यावसायिक सामाजिक जबाबदारी (CSR) च्या माध्यमातून झाले असेल तर त्याची पोचपावती सादर करावी.
- ❑ पुढील १-२ वर्षांसाठी आवश्यक असलेल्या देखभालीसाठीची योजना.
- ❑ टप्प्यानुसार (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे. (अधिक तपशील वर दिलेल्या मार्गदर्शक तत्त्वांमध्ये जोडलेला आहे.)
  - वृक्षारोपण कार्यक्रमापुर्वी (Size १ ते २ MB)
  - वृक्षारोपण कार्यक्रमादरम्यान (Size १ ते २ MB)
  - माझी वसुंधरा अभियान ६.० च्या शेवटच्या दोन महिन्यांत.(Size १ ते २ MB)-
  - *वरील सर्व छायाचित्रे त्याच ठिकाणाहून (अँगलमध्ये) क्लिक केले असावेत.*
- ❑ *सादर केलेली कागदपत्रे वैध/ सुवाच्य नसल्यास,या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.*
- ❑ *स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेली माहिती माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.०, ५.० दरम्यान MIS मध्ये भरलेल्या माहितीशी जुळत नसल्यास, कोणतेही गुण दिले जाणार नाहीत. **(केवळ अपकीपसाठी लागू)***

| | SDG १५: जमिनीवरील जीवन | १५.२ : सर्व प्रकारच्या जंगलांच्या शाश्वत व्यवस्थापनाच्या अंमलबजावणीला चालना देणे, जंगलतोड थांबवणे , खराब झालेली जंगले पुनर्संचयित करून जागतिक स्तरावर वनीकरण आणि पुनर्वनीकरण लक्षणीय वाढ करणे.<br>१५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण |
|---|---|---|

# स्थानिक प्रजातींच्या वृक्षांची सूचक यादी

## दक्षिण उष्णकटिबंधीय निम-सदाहरित वने

१. टर्मिनलिया पॅनिक्युलाटा (किंजल)
२. मेमोसायलॉन अंबेलेटम (अंजनी)
३. टर्मिनलिया चेबुला (हिरडा)
४. सिझिजियम क्युमीनी (जांभूळ)
५. ओलिया डायोसिया (परजामुन)
६. मॅंगीफेरा इंडिका (आंबा)
७. ऍक्टिनोडाफ्ने हुकेरी (पिसा)

## दक्षिण उष्णकटिबंधीय ओलसर पर्णपाती वने

१. टेक्टोना ग्रँडिस (सागवान)
२. टर्मिनलिया टोमेंटोसा (ऐन)
३. डेलबर्गिया लॅटिफोलिया (शिशम)
४. आदिना कार्डिफोलिया (हलदू )
५. मधुका इंडिका (मोहा)
६. टेरोकार्पसमार्सुपियम (बिजा)
७. मित्राज्ञा परविफ्लोरा (कलाम)
८. सालमालिया मालाबारिकम (सेमल)

## दक्षिणी उष्णकटिबंध काटेरी वने

१. अकेशिया अरेबिका (बाबुल)
२. अकेशिया ल्युकोफ्लेका (हिवर)
३. झिझिफस जुजुबा (बोर)
४. बुटीया मोनोस्पर्मा (पलास)
५. बेलानिट्स रेक्सबर्गी (हिंगणबेट)

## मनरेगा योजनेद्वारे शिफारस केलेल्या झाडांची यादी

१. टर्मिनलिया अर्जुन (अर्जुन)
२. टर्मिनल इलिप्टिका (आसन)
३. साराचा अशोक (अशोक)
४. टर्मिनलिया बेलिरिका (बेहेडा)
५. एगल मार्मेलोस (बेल)
६. ओरोक्सिलम इंडिकम (टेटू)
७. गार्डेनिया गम्मीफेरा (डिकेमाली)
८. टेरोकार्पस सँटलिनस (रक्त चंदन)
९. सपिंडस मुकोरोसी (रिठा)
१०. ग्मेलिना आर्बोरिया (शिवन)
११. सिम्प्लोकोस रेसमोसा (लोधरा)
१२. पोंगामिया पिनाटा (करंज)

*टीप:ही यादी संपूर्ण नाही, वरील माहिती ही फक्त संदर्भासाठी आहे. अधिक नावे Untitled-2 (mahaforest.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.*

# बांबू/शेवगा /खसची लागवड

## लागवडीसाठी योग्य बांबूच्या प्रजाती

1. *बांबूसा टूलडा*
2. *डेंड्रोकॅलामास ब्रॅंडीसी*
3. *बांबूसा बल्कोवा*
4. *डेंड्रोकॅलामास स्टोकसी*
5. *डेंड्रोकॅलामास स्रीकटस*
6. *बांबूसा अस्पेर*

## टिशू कल्चर केलेल्या रोपांची उपलब्धता

1. ईशवेद बायोटेक लॅब्स प्रा. लि.
2. अलमॅक बायोटेक लॅब्स प्रा. लि. , लातूर
3. ग्रोमोर बायोटेक प्रा. लि., तमिळनाडू

## लागवडीसाठी योग्य जागा



निकृष्ट जमिनीवर लागवड करणे



रस्त्यालगत लागवड



आंतरपीक लागवड



नदीकाठी लागवड

टीप: स्थानिक स्वराज्य संस्था राष्ट्रीय बांबू मिशनने सुचवलेल्या प्रजाती लावू शकतात:
*https://nbm.da.gov.in/Bamboo-Species*

# १.१.१ माझी वसुंधरा अभियानादरम्यान लावलेली आणि जगवलेली एकूण झाडे







सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

# १.१.२ नवीन हरित क्षेत्रांचा विकास व देखभाल

**गुण ३००**

**हरित क्षेत्र हे प्रदूषणाचे परिणाम कमी करण्यास मदत करतात. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थानी देवराई, पंचवटी आणि घनवनाची निर्मिती तसेच अमृत वन, स्मृती वन, जैवविविधता उद्यान, पक्षी उद्यान, इत्यादी प्रकारच्या हरित क्षेत्रांची निर्मितीस व देखभालीस महत्व दिले आहे का हे तपासतो.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | नव्याने तयार केलेल्या हरित क्षेत्रांची (देवराई/पंचवटी/घनवन/मियावकी/ नगरवनसह) संख्या<br>*तयार केलेल्या हरित क्षेत्रांच्या संख्येच्या आधारे मूल्यांकन केले जाईल. तयार करण्यात आलेल्या प्रत्येक हरित क्षेत्राला २० गुण मिळतील.* | १०० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान तयार करण्यात आलेले हरित क्षेत्रांचे देवराई/पंचवटी/घनवन/मियावकी/ नगरवनसह) एकूण एकत्रित क्षेत्र (Relative Marking) | १०० |
| ३. | **अपकीप (Upkeep):**<br>माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान तयार केलेल्या हरित क्षेत्राची देखभाल<br>*देखभाल करण्यात आलेल्या प्रत्येक हरित क्षेत्राला ०५ गुण मिळतील.* | १०० |

**आवश्यक तपशील :**

- ❑ नवीन तयार केलेल्या हरित क्षेत्रांचा (देवराई/पंचवटी/घनवन/नगर वन /मियावाकी/ नगरवनसह) तपशील : क्षेत्रफळ आणि वापर - विहित एक्सेल स्वरूपात
- ❑ प्रकल्पाच्या प्रगतीनुसार विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ नव्याने तयार केलेल्या हरित क्षेत्राचे कार्यारंभ आदेश आणि आर्थिक प्रगती अहवाल.
- ❑ नव्याने तयार केलेल्या हरित क्षेत्रांच्या विहित एक्सेल फॉरमॅटमध्ये तयार केलेल्या हरित क्षेत्रांचा तपशील.
- ❑ गुगल मॅपवर स्थान.
- ❑ माझी वसुंधरा १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान तयार केलेल्या हरित क्षेत्रासाठी पुढील १-२ वर्षांसाठी देखभाल योजना (देखभाल यंत्रणेचा उल्लेख करणे आवश्यक)
- ❑ या निर्देशकासाठी, हरित क्षेत्र म्हणजेच, किमान ७०% क्षेत्र ज्यावर झाडे, झुडपे इ. आहेत. हरित क्षेत्र विकासासाठी किमान क्षेत्राची आवश्यकता:
  - अमृत शहरांसाठी = १०,००० चौ. फुटांपेक्षा कमी नसलेले क्षेत्रफळ
  - अमृत शहरांमध्ये समावेश नसलेल्या शहरांसाठी = ५,००० चौ. फुटांपेक्षा कमी नसलेले क्षेत्रफळ
- ❑ सादर केलेले दस्तऐवज वैध / सुवाच्य नसल्यास आणि Google लिंक चुकीची असल्यास या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेली माहिती माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान MIS मध्ये भरलेल्या माहितीशी जुळत नसल्यास, कोणतेही गुण दिले जाणार नाहीत. (केवळ अपकीपसाठी (Upkeep) लागू)

| | | |
|---|---|---|
| | **SDG १५: जमिनीवरील जीवन** | १५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण कारवाई करणे .<br>१५.९: २०३० पर्यंत, पारिस्थितिक प्रणाली आणि जैवविविधता मूल्ये राष्ट्रीय आणि स्थानिक नियोजन, विकास प्रक्रिया, गरिबी कमी करण्याच्या धोरणे आणि खात्यांमध्ये एकत्रित करणे. |

# पंचवटी वृक्षारोपण




# देवराई वृक्षारोपण




टीप : *वृक्षारोपण योजनेसंबंधीत अधिक माहिती जाणून घेण्यासाठी देवराई फाउंडेशन यांची माहितीपुस्तिका खाली दिलेल्या लिंकवर पहा.*

*https://majhivasundhara.in//assets/docs/Devrai_Foundation.pdf*

# मियावाकी वन वृक्षारोपण






**जागेची निवड:**

निकृष्ट / नापीक जमीन निवडा.

**माती तयार करणे:**

- माती सर्वेक्षण करा
- सेंद्रिय पदार्थ टाकून मातीचा दर्जा सुधारा.
- मातीमध्ये हवा/पाण्याचा निचरा होईल हे सुनिश्चित करा

**वृक्षांची निवड:**

- मूळ/स्वदेशी झाडांच्या प्रजाती निवडा.
- झाडे, झुडुपे आणि ग्राउंड कव्हर यांचे मिश्रण सुनिश्चित करा.
- विविध वाढ दर असलेल्या झाडांच्या प्रजातींचा समावेश करा.

**वृक्षारोपण मांडणी:**

- दाट लागवड मांडणी तयार करा (प्रति चौरस मीटर 3-5 रोपे).
- वेगवेगळ्या प्रजाती मिसळा.



**वृक्षारोपण प्रक्रिया:**

लागवडीसाठी खड्डे खणणे.
सेंद्रिय पदार्थ मिसळा,
रोपे लावा आणि क्षेत्र आच्छादित करा.

**देखभाल:**

रोपांना नियमित पाणी द्या (पहिली २-३ वर्षे) आणि तण काढा.

**देखरेख आणि वाढ:**

- जंगलाच्या वाढीवर लक्ष ठेवा
- ३-४ वर्षांनी जंगल स्वावलंबी झाले पाहिजे.

# १.१.२ नवीन हरित क्षेत्रांचा विकास व देखभाल








सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

# १.१.३ जिओटॅगिंगसह वृक्षगणना- तयारी व प्रकाशन

**गुण १२५**

**महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) वृक्ष संरक्षण व जतन अधिनियम १९७५, प्रकरण ४, कलम ७ (ब), मध्ये “डिसेंबर १९९६ पूर्वी एकदा आणि त्यानंतर दर पाच वर्षांनी एकदा, स्थानिक स्वराज्य संस्थेच्या अधिकार क्षेत्रातील सर्व जमीनीवरील अस्तित्वात असलेल्या सर्व वृक्षांची वृक्षगणना करणे अनिवार्य आहे.” जुलै २०२१ मध्ये पुरातन वृक्षांची संकल्पना मांडण्यासाठी आणि “GIS आधारित वृक्षगणना किंवा इतर कोणत्याही आधुनिक तंत्रज्ञानासारख्या नवीन तांत्रिक माध्यमांचा वापर करून” दर पाच वर्षांनी वृक्षगणना अनिवार्य करण्यासाठी या कायद्यात सुधारणा करण्यात आली. वृक्षगणना वृक्ष आच्छादन आणि प्रजातींच्या विविधतेसाठी आधाररेखा प्रदान करते. माहितीचा उपयोग वृक्षांच्या देखभालीसाठी आणि संवर्धनाशी संबंधित विविध उपक्रमांसाठी उपाययोजना आणि विकास करण्याससाठी केला जाऊ शकतो.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० पूर्वी वृक्षगणना अहवाल तयार आणि प्रकाशित केलेला आहे का? (जिओटॅगिंगसह) | | ७५ |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| १ (अ) | होय असल्यास, माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान वृक्ष गणना अहवाल अद्ययावत आणि प्रकाशित केला आहे का? (जिओटॅगिंगसह) | | |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |
| १ (ब) | नाही असल्यास, माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान अहवालाची स्थिती | | |
| | जिओटॅगिंगसह वृक्ष गणना – अहवाल १००% तयार व प्रकाशित | ७५ | |
| | जिओटॅगिंगसह वृक्ष गणना – अहवाल ५०% तयार व प्रकाशित | ३० | |
| | जिओटॅगिंगसह वृक्ष गणना – अहवाल ५०% हून कमी तयार व प्रकाशित | ० | |
| २. | पुरातन वृक्षांची यादी – अद्ययावत आणि प्रकाशित | | २५ |
| ३. | पुरातन वृक्षांचा संरक्षण आराखडा | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ स्थानिक संस्थेच्या संकेतस्थळावर, स्थानिक वृक्ष प्राधिकरणाने अधिकृत केलेल्या वृक्षगणना अहवालाची लिंक - जिओटॅगिंगसह (पुरातन वृक्षगणना अहवालासह)
- ❑ वृक्षगणना अहवाल आणि जिओटॅगिंगसह पुरातन वृक्षांची अद्ययावत यादी – ही यादी ULB च्या अधिकृत संकेतस्थळावर प्रकाशित केली तरच स्वीकारली जाईल.
- ❑ रितसर शिक्का मारलेली वृक्षगणना अहवालाची प्रत.
- ❑ पुरातन वृक्षांचा संरक्षण आराखडा
- ❑ स्थानिक वृक्ष प्राधिकरणाकडून जिओटॅगिंगसह वृक्षगणना अहवालाची स्थिती दर्शवणारी हमीपत्राची प्रत.
- ❑ पुरातन वृक्षांसह सर्व वृक्षांचे जिओटॅगिंग करणे अनिवार्य आहे. जिओटॅगिंग न केल्यास कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

***टीप: अहवाल १००% तयार आणि प्रकाशित– स्थानिक स्वराज्य संस्थेच्या १००% क्षेत्रफळाचा समावेश***

***अहवाल ५०% तयार आणि प्रकाशित– स्थानिक स्वराज्य संस्थेच्या ५०% क्षेत्रफळाचा समावेश***

- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/ सुवाच्य नसल्यास,या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG १५: जमिनीवरील जीवन** | १५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण कारवाई करणे.<br><br>१५.१ : आंतरराष्ट्रीय करारांच्या बंधनांनुसार स्थानिक आणि अंतर्देशीय गोड्या पाण्याच्या साठ्यांचे संवर्धन, पुनर्संचयित आणि शाश्वत वापर आणि त्यांच्या सेवा, विशेषत: जंगले, पाणथळ प्रदेश, पर्वत आणि कोरडवाहू यांच्या संवर्धनाची खात्री करणे. |
|---|---|---|

# १.१.३ जिओटॅगिंगसह वृक्षगणना- तयारी आणि प्रकाशन












<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत</u>

# १.१.४ रोपवाटिकेची निर्मिती

**गुण १००**

रोपवाटिका ही रोपे लागवडीसाठी तयार होईपर्यंत त्यांना अनुकूल परिस्थितीत ठेवण्यासाठी निर्माण केली जाणारी एक व्यवस्थापित जागा आहे. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रात वनीकरण आणि वृक्षारोपण या सारख्या उपक्रमांसाठी केलेल्या प्रयत्नांचे मूल्यमापन करतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | रोपवाटीकेची एकूण क्षमता (चौ. मी) (Relative Marking) | ४० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान रोपवाटीकेत उपलब्ध असलेल्या आणि/किंवा विक्री केलेल्या रोपांची संख्या (ऊंची- ४ फुटांहून अधिक) (Relative Marking) | ६० |

**आवश्यक तपशील :**

- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रात खाजगी रोपवाटिकांसह तयार केलेल्या रोपवाटिकांची संख्या.
- ❑ तयार केलेल्या प्रत्येक रोपवाटिकेची क्षमता चौरस मीटरमध्ये (चौ.मी.)
- ❑ गुगल मॅपवर रोपवाटिकेचे स्थान .
- ❑ रोपवाटीकेचे क्षेत्र.
- ❑ जिओटॅग केलेले छायाचित्र (Size १ ते २ MB) .
- ❑ रोपवाटिकेचा आराखडा (प्रजातींचे विभाजन, देखभाल इत्यादी.)
- ❑ रोपवाटिकेद्वारे उपलब्ध आणि/किंवा विक्री केलेल्या रोपांची संख्या खालील तपशीलांसह: नाव, प्रजाती, विक्रीची संख्या, उंची इ.- विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- ❑ मोजमापासाठीच्या एककांचे रूपांतरण : १ चौ. किमी = १०,००,००० चौ. मी.
- ❑ सादर केलेले दस्तऐवज वैध / सुवाच्य नसल्यास किंवा गुगल लिंक चुकीची असल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 15 LIFE ON LAND | **SDG १५: जमिनीवरील जीवन** | १५.१ : आंतरराष्ट्रीय करारांच्या बंधनांनुसार स्थानिक आणि अंतर्देशीय गोड्या पाण्याच्या साठ्यांचे संवर्धन, पुनर्संचयित आणि शाश्वत वापर आणि त्यांच्या सेवा, विशेषत: जंगले, पाणथळ प्रदेश, पर्वत आणि कोरडवाहू यांच्या संवर्धनाची खात्री करणे. |

## १.१.४ रोपवाटिकेची निर्मिती










सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

| १.१.५ | लोकजैवविविधता नोंदवही (PBR) तयार करणे | गुण १५० |
|---|---|---|

**लोकांच्या जैवविविधता नोंदणी (PBR) मध्ये स्थानिक जैविक संसाधनांची उपलब्धता आणि ज्ञान, त्यांचा औषधी वापर किंवा त्याच्याशी संबंधित इतर कोणत्याही पारंपारिक ज्ञानाची सर्वसमावेशक माहिती असते.शाश्वत पद्धतीने संसाधनांच्या भविष्यातील व्यवस्थापनासाठी हे रजिस्टर आधाररेखा तयार करते. स्थानिक संस्थांनी एखाद्या विशिष्ट क्षेत्राच्या लँडस्केप आणि लोकसंख्येसह जैविक संसाधनांचे संरक्षण आणि दस्तऐवजीकरण यांना प्रोत्साहन देण्यास महत्त्व दिले आहे की नाही ही बाब या निर्देशकाद्वारे तपासली जाईल.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान BMC ने घेतलेल्या बैठकांची संख्या (प्रत्येक बैठकीसाठी ५ गुण) | २० |
| २. | लोकजैवविविधता नोंदवही (PBR): माझी वसुंधरा अभियान ६.० च्या आधी आणि दरम्यान BMC द्वारे तयार आणि मंजूर झाली असल्यास. | ३० |
| ३. | महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळाला (MSBB) लोकजैवविविधता नोंदवही (PBR) सादर केल्यास. | २० |
| ४. | जैवविविधता व्यवस्थापन समिती (BMC) कृती आराखडा | ३० |
| ५. | जैवविविधता कायदा, २००२ वरील क्षमता वृद्धी कार्यक्रमांची एकूण संख्या (प्रत्येक कार्यक्रमासाठी ५ गुण) | १० |
| ६. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान जैवविविधता व्यवस्थापन आराखडा तयार आणि सादर केला | ४० |

**आवश्यक तपशील :**

- ❑ जैवविविधता व्यवस्थापन समितीचे (BMC ) गठित झाल्याचे आदेश/पत्र आणि सदस्य यादीची प्रत.
- ❑ BMC ने दरवर्षी आयोजित केलेल्या किमान चार बैठकांच्या सूचना. माझी वसुंधरा अभियान ६.० च्या कालावधीत दर तीन (३) महिन्यांनी एकदा बैठक आयोजित केली पाहिजे- इतीवृत्तांच्या प्रतीसह सादर करणे.
- ❑ BMC ने ज्या बैठकीत लोकजैवविविधता नोंदवहीला (PBR) मान्यता दिली होती, त्या बैठकीची विषयपत्रिका (अजेंडा) आणि इतीवृत्तांची प्रत
- ❑ PBR BMCने तयार केले आहे आणि मंजूर केले आहे असे सांगणारे BMCकडून प्रमाणपत्र
- ❑ PBR सादर केल्याची प्रत (PBR तयार आणि प्रकाशित केल्यानंतर तो महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळाला **Maharashtra state Biodiversity Board (MSBB)** ला प्रस्तुत करावा.)
- ❑ राष्ट्रीय जैवविविधता प्राधिकरणाने जारी केलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार BMC कृती आराखड्याची प्रत.
- ❑ जैवविविधता कायदा, 2002- वरील क्षमता वृद्धी कार्यक्रमांचा तपशील पीडीएफ स्वरूपात
- ❑ जैवविविधता वारसा स्थळांची यादी व व्यवस्थापन अहवाल
- ❑ जैवविविधता व्यवस्थापन आराखडाची प्रत

कृती आराखड्यात जैव संसाधनांच्या संवर्धनासाठी नमूद केलेल्या मुद्यांचा समावेश असू शकतो. BMC च्या कर्मचाऱ्यांसाठी आवश्यक असलेले प्रशिक्षण आणि भौगोलिक निर्देशकांच्या (G.I.) नोंदणीसाठी विचारात घेण्यासाठी संभाव्य बाबींची यादी समाविष्ट असू शकते.

http://nbaindia.org/uploaded/pdf/Guidelines%20for%20BMC.pdf

- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/ सुवाच्य नसल्यास,या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| 15 LIFE ON LAND | **SDG १५: जमिनीवरील जीवन** | १५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण कारवाई करणे. १५.९: २०३० पर्यंत, पारिस्थितिक प्रणाली आणि जैवविविधता मूल्ये राष्ट्रीय आणि स्थानिक नियोजन, विकास प्रक्रिया, गरिबी कमी करण्याच्या धोरणे आणि खात्यांमध्ये एकत्रित करणे. |
|---|---|---|

# लोकजैवविविधता नोंदवही (PBR) तयार करण्याची पद्धत




- जैवविविधता व्यवस्थापन समितीची वैधता ५ वर्षे आहे.
- समितीमध्ये एक निर्वाचित अध्यक्ष आणि स्थानिक स्वराज्य संस्थेने नामनिर्देशित केलेले सहा सदस्य असतात, ज्यात एक तृतीयांश महिला सदस्य असतात.
- त्यानंतर तांत्रिक मंजुरी गटांद्वारे मूल्यमापन केलेला अहवाल अंतिम मंजुरीसाठी महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळाकडे सादर केला जातो. जर अहवाल राष्ट्रीय जैवविविधता प्राधिकरण (NBA) च्या अटी आणि नियमांचे पालन करत असेल तर संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेला PBR च्या वैधतेबद्दल प्रमाणपत्र जारी केले जाते.
- **PBR चे प्रमाणित स्वरूप आणि राष्ट्रीय जैवविविधता समितीने परिभाषित केलेले आवश्यक नियम आणि PBR नियमांनुसार अहवाल तयार करणे अपेक्षित आहे.**

  ***http://nbaindia.org/uploaded/pdf/PBR%20Format%202013.pdf***

| १.१.८ | बीज संकलन केंद्र | गुण १५० |
|---|---|---|

**बीज संकलन केंद्र हे निरनिराळ्या वृक्ष प्रजातींच्या बिया संरक्षित करून योग्य परिस्तिथीत ठेवण्याचे ठिकाण आहे. स्थानिक वृक्ष प्रजातींचे बीज संकलन केंद्र हे विशेषत: स्थानिक भागातील किंवा परिसंस्थेतील झाडांच्या बिया आणि स्थानिक समुदायांसाठी सांस्कृतिक, पर्यावरणीय किंवा आर्थिक महत्त्व असलेल्या झाडांच्या बियांचे जतन करण्यावर लक्ष केंद्रित करते. देशी किंवा स्थानिक वृक्ष प्रजातींचे बियाणे गोळा करणे, साठवणे आणि वितरीत करणे यासाठी हे केंद्र काम करू शकतात. हे निर्देशक बियाणे सार्वभौमत्व, वृक्ष विविधता यास प्रेरित करतो .**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | बीज संकलन व बीज गोळे (सीड बॉल) बनवण्याकरिता जनजागृती | | २० |
| २. | बीज संकलन केंद्राची उपलब्धता | | ३० |
| | होय | ३० | |
| | नाही | ० | |
| ३. | एकूण संकलित आणि साठवलेल्या स्थानिक झाडांच्या बियांचे प्रमाण (किलोमध्ये) ( Relative Marking) | | ५० |
| ४. | बियाणांचा वापर | | ५० |
| | बीज गोळे (सीड बॉल) बनवण्यासाठी | २५ | |
| | वृक्षारोपणासाठी | २५ | |

**आवश्यक तपशील:**

- घेतलेल्या जनजागृती उपक्रमांची संख्या- विहित केलेल्या एक्सेल स्वरूपात .
- नागरिकांचा सहभाग विहित केलेल्या एक्सेल स्वरूपात.
- बीज संकलन केंद्राच्या स्थानाची गुगल मॅप लिंक.
- संकलित केलेल्या स्थानिक झाडांचे लॉगबुक
- बीज संकलन केंद्रात पॅकेजिंग व लेबलिंग करून जतन केलेल्या बियाणांचे जिओटॅग केलेली छायाचित्र (size १ ते २ MB)
- बीज संकलन केंद्रामधील साठवलेल्या इतर बियाण्याच्या वापराचा कार्यारंभ आदेश -स्थानिक रोपवाटिकेला पुरवठा/ माझी वसुंधरा अभियान ५.० दरम्यान पेरलेले बियाणे (खंदक/ सीसीटी(CCT)/डीप सीसीटी(deep CCT)/ शेताच्या बांधांच्या सीमेवर)
- वापरात आलेल्या बियाणांचे जिओटॅग केलेली छायाचित्रे. (size १ ते २ MB)
- सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास आणि गूगल मॅप लिंक चुकीची असल्यास या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत .

| 15 LIFE ON LAND | SDG १५: जमिनीवरील जीवन | १५.२ : सर्व प्रकारच्या जंगलांच्या शाश्वत व्यवस्थापनाच्या अंमलबजावणीला चालना देणे, जंगलतोड थांबवणे , खराब झालेली जंगले पुनर्संचयित करून जागतिक स्तरावर वनीकरण आणि पुनर्वनीकरणात लक्षणीय वाढ करणे.<br>१५.५ : नैसर्गिक अधिवासांचा ऱ्हास कमी करण्यासाठी, जैवविविधतेचे नुकसान थांबवण्यासाठी आणि धोक्यात आलेल्या प्रजातींचे संरक्षण आणि विलुप्त होण्यापासून रोखण्यासाठी तातडीने आणि महत्त्वपूर्ण |
|---|---|---|

# बीज व्यवस्थापन व बीज गोळे बनवण्याची प्रक्रिया



**बीज संकलन**

जमिनीवरून गोळा करणे- साग, शिवन, बाभळ इ.

झाडांवरून गोळा करणे- अंजन, बिबळ, इ.

शिढी वापरून गोळा करणे- चंपा, रिठा, इ.



**बीज वेचणे**

स्फुटनशील शुष्क फळे व अस्फुटनशील शुष्क फळे-
बिया मळणे / घासणे/ आपटणे
उदा. बाभळ, कांचन, बहावा इ.

गरयुक्त फळे
फळ पिळून त्यातील बी काढा, उदा. कडुलिंब, पिंपळ व पुत्रंजीव.




**बीज संकलन केंद्र**

- बिया योग्यरीत्या सुकवा व त्यांच्यावर योग्य प्रक्रिया करा.
- हे बियाणे स्थानिक स्वराज्य संस्थेच्या बीज संकलन केंद्रात ठेवा.

*टीप: अधिक माहितीसाठी ICFRE चे बीज व्यवस्थापन अहवाल वाचा*

*https://hindi.icfre.gov.in/UserFiles/File/Books/Forest%20Seed%20Management.pdf*

# बीज गोळे  बनवण्याची प्रक्रिया



**मिश्रण** - माती व कंपोस्ट एकत्र करा.

↓

**पाणी मिश्रण** - माती चिकट होईपर्यंत हळू हळू पाणी मिसळा.

↓

**मातीचे गोळे बनवा** - थोडी माती घेऊन त्यात छोटा खड्डा करा. त्यात बियाणे टाका आणि त्याचा गोळा बनवा.

↓

**सीड बॉल्स सुकवणे** - बीज गोळे २४ ते ४८ तासाच्या कालावधीसाठी  सुकवा..

↓

**वापरा**- ठरवलेल्या  ठिकाणी बीज गोळे लावा किंवा पसरवा.

# बीज संकलन केंद्राची निर्मिती

स्थानिक स्वराज्य संस्थेतील लोकांनी आणि विद्यार्थ्यांनी गोळा केलेल्या बिया

↓

स्थानिक स्वराज्य संस्थेतील बीज संकलन केंद्र

इतर संस्था आणि CSR मार्फत मदत

राष्ट्रीय जनुक निधीद्वारे मदत

**बीज साठवणूक** :

- मातीची भांडी, पुन्हा वापरलेले डब्बे, पुनर्वापर केलेले कागदी लिफाफे किंवा बिया टिकवण्यासाठी पिशव्या यांसारख्या हवाबंद डब्ब्याना प्राधान्य द्या.

डब्ब्यावर खालील लेबल असावेत :

- बियाणे संग्राहकाचे नाव
- बियाणे गोळा करण्याची तारीख
- प्रजातींचे सामान्य नाव
- प्रजातींचे वैज्ञानिक नाव
- बीज प्रकार
- पारंपारिक उपयोग

**स्थानिक स्वराज्य संस्थेतील बीज संकलन केंद्र :**

स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या आवारात एक लहान कपाट तयार करावे जे बियाणे संकलन केंद्र म्हणून काम करेल. जेथे नागरिक स्थानिक बिया साठवू शकतील. CSR/अन्य कोणतीही संस्था/व्यक्ती केंद्र निर्माण करण्यासाठी आर्थिक सहाय्य करू शकतात.

---

## साठवलेल्या बियाण्याचा वापर



माझी वसुंधरा अभियानात बीज पेरणी करणे



रोपवाटीकेला पूरवठा



बीज गोळ्यांची निर्मिती



चर/सीसीटी/डीप सीसीटी/शेत बंधाऱ्यांवर पेरणी करणे

# १.१.७ वातावरण अनुकूल शेती

**गुण २५०**

वातावरण अनुकूल शेती ही अशा पद्धतीची शेती आहे जी हवामान बदलाच्या परिणामांशी जुळवून घेऊन उत्पादनक्षमता टिकवून ठेवते किंवा वाढवते. या पद्धतीमध्ये पाण्याचा कार्यक्षम वापर, सेंद्रिय आणि नैसर्गिक शेती, हवामानाशी सुसंगत पीक निवड, मातीचे आरोग्य जपणे, आणि आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर यांचा समावेश होतो. त्यामुळे शेतकऱ्यांना दुष्काळ, पूर, तापमानवाढ यांसारख्या नैसर्गिक आपत्तींना तोंड देता येते, आणि शेती अधिक शाश्वत व उत्पन्नदायक ठरते. हे निर्देशक वातावरण अनुकूल शेती करण्यासाठी प्रेरित करतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान वातावरण अनुकूल शेतीला प्रोत्साहन देण्यासाठी आयोजित केलेल्या जनजागृती कार्यक्रमांची संख्या (Relative Marking) | ७५ |
| २. | FCO मानदंडाचे पालन करणारा कंपोस्ट गुणवत्ता अहवाल. | २५ |
| ३. | मृदा आरोग्य कार्ड असलेल्या शेतकऱ्यांची टक्केवारी (Relative Marking) | २५ |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान ठिबक सिंचन/लघु सिंचन प्रकल्पांतर्गत समाविष्ट शेतजमिनीची टक्केवारी (Relative Marking) | ५० |
| ५. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान सेंद्रिय शेती अंतर्गत आणलेल्या शेतजमिनीची टक्केवारी (परिवर्तन कालावधीतील जमिनीसह) (Relative Marking) | ५० |
| ६. | मिलेट्स (millets) शेती अंतर्गत समाविष्ट असलेल्या शेतजमिनीची टक्केवारी (Relative Marking) | २५ |

**आवश्यक तपशील:**

- ❑ घेतलेल्या जनजागृती उपक्रमांची संख्या नागरिकांचा सहभाग - विहित केलेल्या एक्सेल स्वरूपात
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान अधिकृत प्रयोगशाळांमधून FCO (Fertilizer Control Order) नियमाचे पालन करणाऱ्या कंपोस्ट गुणवत्ता अहवालाची प्रत
- ❑ माती परीक्षणासह शेतजमिनीचा तपशील- विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- ❑ मृदा आरोग्य कार्ड योजनेअंतर्गत मृदा आरोग्य पत्रिकांची प्रत.
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेतील एकूण शेतजमीन (हेक्टर) मध्ये.
- ❑ सेंद्रिय शेती प्रकल्पांतर्गत समाविष्ट असलेली एकूण शेतजमीन (हेक्टर) मध्ये.नोंदणी प्रमाणपत्र, व्यवहार प्रमाणपत्र आणि PGSI किंवा राष्ट्रीय सेंद्रिय उत्पादन कार्यक्रम (NPOP) द्वारे प्रदान केलेले उत्पादन प्रमाणपत्र.
  प्रमाणन संस्थेद्वारे प्रदान केलेले परिवर्तन कालावधी प्रमाणपत्र.
- ❑ तालुका कृषी अधिकारी यांनी प्रमाणित केल्यानुसार ठिबक सिंचन/लघु सिंचन प्रकल्पांतर्गत समाविष्ट असलेली एकूण शेतजमीन (हेक्टरमध्ये)
- ❑ प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेचा लाभ घेतलेल्या लाभार्थ्यांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास आणि गूगल मॅप लिंक चुकीची असल्यास या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत .

| | | |
|---|---|---|
| 15 LIFE ON LAND | **SDG १५: जमिनीवरील जीवन** | १५.३: २०३० पर्यंत, वाळवंटीकरणाचा मुकाबला करणे, वाळवंटीकरण, दुष्काळ आणि पूर यामुळे प्रभावित झालेल्या जमिनीसह निकृष्ट जमीन |

# शाश्वत शेती

## शाश्वत शेतीचे घटक


आंतरपिक


सेंद्रिय आच्छादन


एकीकृत कीटक/ अन्नद्रव्य व्यवस्थापन


पिकांची फेरपालट


कम्पोस्टिंग


जल व्यवस्थापन

## सेंद्रिय शेती

- कीटक नियंत्रण आणि जैविक खतांचा वापर करणाऱ्या शाश्वत कृषी प्रणालीला प्राणी आणि वनस्पतींच्या टाकाऊ पदार्थांपासून आणि नायट्रोजन-फिक्सिंग कव्हर पिकांपासून मिळणाऱ्या जैविक खतांचा वापर केला जातो, त्याला सेंद्रिय शेती म्हणतात.
- सेंद्रिय उत्पादनासाठी राष्ट्रीय कार्यक्रम (NPOP) निकष, प्रक्रिया, प्रमाणन आणि मानके प्रदान करतो.
- सेंद्रिय शेतीमधील परिवर्तन कालावधी हा सेंद्रिय व्यवस्थापन आणि पिकांचे प्रमाणीकरण सुरू होण्याच्या दरम्यानचा काळ असतो.
- रासायनिक खते, कीटकनाशके आणि जमिनीच्या चुकीच्या वापरावर अवलंबून परिवर्तन कालावधी १ ते ३ वर्षांपर्यंत बदलतो.
- वार्षिक आणि द्विवार्षिक पिकांसाठी परिवर्तन कालावधी किमान २ वर्षे आहे आणि बारमाही वनस्पतींसाठी तो ३ वर्षांचा आहे.

## तृण धान्याच्या ( Millet ) उत्पादनाला प्रोत्साहन

तृण धान्य हे लहान बिया असलेले धान्य आहेत जे पौष्टिक, समृद्ध, ग्लूटेन-मुक्त असून ही पर्यावरणास अनुकूल पिके आहेत, त्यांच्या लागवडीसाठी कमीत कमी पाणी आणि कीटकनाशकांचा वापर होतो .

**तृण धान्याचे प्रकार खालीलप्रमाणे आहेत-**

- ज्वारी
- बाजरी
- नाचणी
- बार्नयार्ड बाजरी (झांगोरा)
- छोटी बाजरी (सामा)
- प्रोसो किंवा कॉमन बाजरी (बॅरी)
- फॉक्सटेल/ इटालियन बाजरी (कांगनी)
- कोडो बाजरी (कोद्रा)



उत्तम निचरा असलेली जलोळ, चिकणमाती आणि वालुकामय जमीन तृणधान्य **शेतीसाठी सर्वोत्तम आहे.**

## १.२ घनकचरा व्यवस्थापन

| अ.क्र. | कृतीबिंदू | गुण |
|---|---|---|
| १.२.१ | घनकचरा व्यवस्थापन: निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण आणि संकलन | २५० |
| १.२.२ | ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया | ३५० |
| १.२.३ | सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया /विल्हेवाट | २०० |
| १.२.४ | जुन्या साठलेल्या कचऱ्यावर (Legacy Waste) शास्त्रोक्त प्रक्रिया | १०० |
| १.२.५ | प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल यूज प्लास्टिकवर (SUP) बंदी) | ३०० |
| १.२.६ | जैव-वैद्यकीय (बायो-मेडिकल) कचरा व्यवस्थापन | १०० |
| १.२.७ | ई-कचरा व्यवस्थापन | १०० |
| १.२.८ | स्वच्छतेचा दर्जा | १०० |
| एकूण | | १,५०० |

## १.२.१ घनकचरा व्यवस्थापन: निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण आणि संकलन

**गुण २५०**

सार्वजनिक आरोग्यासाठी आणि पर्यावरणासाठी घनकचरा व्यवस्थापन अत्यंत महत्त्वाचे आहे. घनकचऱ्यावर योग्यरित्या प्रक्रिया न केल्यास, ते जमिनीमध्ये जाते आणि यामुळे माती व भूजल प्रदूषित होते. घनकचरा व्यवस्थापन नियम-२०१६ नुसार, स्थानिक स्वराज्य संस्थांना सर्व घरांमधून विलगीकरण केलेला घनकचरा संकलित करण्याची व्यवस्था करावयाची आहे. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांनी कचऱ्याच्या संकलनाला महत्त्व दिले आहे की नाही आणि त्याचे निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण केले जाते की नाही, हे तपासतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | | गुण |
|---|---|---|---|---|
| १. | निर्मितीच्या ठिकाणी संकलन आणि विलगीकरण केलेल्या घनकचऱ्याची टक्केवारी | | | २०० |
| १(अ) | निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण | | १०० | |
| | ९५% ते १००% | १०० | | |
| | ८०% ते ९५% | ५० | | |
| | ८०% पेक्षा कमी | ० | | |
| १(ब) | संकलन | | १०० | |
| | ९५% ते १०० % | १०० | | |
| | ८०% ते ९५% | ५० | | |
| | ८०% पेक्षा कमी | ० | | |
| २. | काढून टाकलेल्या, कचरा संवेदनशील ठिकाणांची संख्या | | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रामध्ये निर्माण होणाऱ्या घनकचऱ्याचे प्रमाण – मासिक अहवाल.
- ❑ निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण केलेला आणि घरोघरी जाऊन संकलित केलेल्या घनकचऱ्याचे प्रमाण - स्व-मूल्यांकन अहवाल.
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० च्या कालावधीतील लॉगबुक सादर करणे.
- ❑ स्वच्छ भारत मिशन (नागरी) MIS मधून घेतलेली माहिती.
- ❑ जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)- घरोघरी जाऊन घनकचऱ्याचे संकलन.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |

# घनकचरा व्यवस्थापन

## प्राथमिक विलगीकरण



# १.२.१ घनकचरा व्यवस्थापन: निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण आणि संकलन







सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

| १.२.२ | ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया | गुण ३५० |
|---|---|---|

ओला कचरा हा स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रात निर्माण होणाऱ्या घरगुती कचऱ्यातील प्रमुख घटक आहे. यामध्ये भाजीपाला/स्वयंपाक घरातील ओला कचरा, बागेतील कचरा आणि इतर सहज विघटीत होणारा कचरा यांचा समावेश आहे. या कचऱ्याचा वापर साधारणपणे खत निर्मितीसाठी किंवा बायोगॅस संयंत्रामध्ये प्रक्रिया करण्यासाठी केला जातो. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांनी ओल्या कचऱ्यावर खतनिर्मिती प्रक्रियेव्द्वारे किंवा बायोगॅस संयंत्रामध्ये प्रक्रिया करून रसायनमुक्त खते आणि गॅस तयार करण्याला महत्त्व दिले आहे की नाही हे तपासतो.

| मूल्यमापन कार्यपद्धती | | | गुण |
|---|---|---|---|
| १. | कार्यरत ओला कचरा प्रक्रिया केंद्र (कंपोस्ट केंद्र /बायोगॅस केंद्र) | | १०० |
| | होय | १०० | |
| | नाही | ० | |
| २. | प्रक्रिया केलेल्या ओल्या कचऱ्याची टक्केवारी | | १०० |
| | ९५% आणि अधिक | १०० | |
| | ८०% - ९५% | ७५ | |
| | ६०%-८०% | ५० | |
| | ६०% पेक्षा कमी | ० | |
| ३. | कंपोस्टचा वापर: विक्री केलेल्या/स्वतः वापरलेल्या कंपोस्टची टक्केवारी | | १०० |
| | ९०% पेक्षा अधिक | १०० | |
| | ७५% - ९०% | ८० | |
| | ६०% - ७५% | ६० | |
| | ६०% पेक्षा कमी | ० | |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान HARIT ब्रँड प्रमाणित | | ५० |
| | HARIT ब्रँड प्रमाणपत्र देऊन पुन्हा प्रमाणित केलेल्या स्थानिक स्वराज्य संस्था | ५० | |
| | HARIT ब्रँड प्रमाणपत्र देऊन प्रमाणित स्थानिक स्वराज्य संस्था | ३० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ कंपोस्ट केंद्र /बायोगॅस केंद्राचे ठिकाण- गुगल मॅप लिंक .
- ❑ कंपोस्ट प्लांट , उत्पादने आणि तयार केलेले कंपोस्ट विकणारे स्थानिक दुकान यांची जिओटॅग केलेली संकलित छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ निर्माण झालेल्या ओल्या कचऱ्याचे प्रमाण आणि तयार केलेल्या कंपोस्टचे प्रमाण - मासिक अहवाल.
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान अधिकृत प्रयोगशाळेतील खत नियंत्रण आदेश (FCO) मानदंडांचे पालन करणाऱ्या कंपोस्ट गुणवत्ता अहवालाची प्रत.
- ❑ कंपोस्ट उत्पादित (प्रमाण) आणि वापर (विकलेले/स्वतः वापरलेले) तपशील दर्शविणारे लॉगबुक.
- ❑ HARIT ब्रँडच्या प्रमाणपत्राची प्रत.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |
|---|---|---|

# ओला कचरा कंपोस्ट करण्याच्या पद्धती



## पारंपारिक कंपोस्टिंग

- सर्व सेंद्रिय कचरा गोळा करा आणि डब्यात टाका किंवा जमिनीवर त्याचा  ढीग करा.
- नियमित अंतराने कचरा मिसळा (७ दिवस).
- या पद्धती मध्ये कमी मनुष्यबळ आणि क्षेत्र आवश्यक आहे.




## वर्मी कंपोस्टिंग

- कंपोस्टि बनवण्यासाठी गांडूळांचा वापर केला जातो.
- गांडुळे सेंद्रिय पदार्थांचे सेवन करून कंपोस्टची गुणवत्ता वाढविण्यास मदत करतात.



## विन्ड्रो कंपोस्टिंग

- सेंद्रिय कचरा लांब, अरुंद ढिगाऱ्यात/विन्ड्रोज मध्ये ठेवला जातो.
- खताचे मिश्रण आणि वातन करण्यासाठी बँक होल्डरवापर केला जातो.
- ही पद्धत मोठ्या प्रमाणातील ओल्या कचऱ्यासाठी योग्य आहे.




## अवायुजीवी कंपोस्टिंग

- सेंद्रिय कचरा सीलबंद कंटेनरमध्ये किंवा डायजेस्टर मध्ये ठेवला जातो.
- या प्रक्रियेत उप-उत्पादन म्हणून बायोगॅस तयार केला जातो.



## सामुदायिक कंपोस्टिंग

- सेंद्रिय कचरा मोठ्या कंटेनरमध्ये गोळा केला जातो आणि गृहनिर्माण सोसायटी/समुदायातील रहिवासी एकत्रितपणे सेंद्रिय कचऱ्याचे व्यवस्थापन करतात.
- कंपोस्टिंगसाठी पुरेशी जागा असलेल्या मोठ्या गृहनिर्माण सोसायटींसाठी ही पध्दत योग्य आहे.

## १.२.२ ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया















<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत</u>

## १.२.३ सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया / विल्हेवाट

**गुण २००**

सुक्या कचऱ्याचा पुनर्वापर आणि विल्हेवाट लावणे अत्यंत महत्त्वाचे आहे. सुक्या घनकचऱ्यामध्ये प्लास्टिक, काच, कागद, धातू, रबर, अन्न-पॅकेजिंग मटेरियल यांसारख्या पुनर्प्राप्त करण्यायोग्य संसाधनांचा समावेश होतो. कचऱ्याचे मूल्य खूप मोठे आहे आणि सर्वांनी त्याच्या पुनर्वापराचा मार्ग अवलंबला पाहिजे. यामुळे कचरा साठवण्याच्या जागेवर आणि नैसर्गिक संसाधनांवर येत असलेला भार कमी होऊन ते उत्पन्नाचे साधन बनू शकते. स्थानिक स्वराज्य संस्था सुक्या कचऱ्याचा पुनर्वापर/प्रक्रिया /विल्हेवाट किती कार्यक्षमतेने करतात याचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | कार्यात्मक विलगीकरण शेड | | १०० |
| | होय | १०० | |
| | नाही | ० | |
| २. | सुक्या कचऱ्याचे दुय्यम वर्गीकरण | | ५० |
| | ९०% पेक्षा अधिक | ५० | |
| | ९०% पेक्षा कमी | ० | |
| ३. | सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया/ विल्हेवाट | | ५० |
| | अधिकृत यंत्रणेद्वारे विल्हेवाट लावलेल्या सुक्या कचऱ्याची टक्केवारी | | |
| | ८०% पेक्षा अधिक | ५० | |
| | ५०% ते ८०% | ३० | |
| | २५% ते ५०% | १५ | |
| | २५% पेक्षा कमी | ० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ निर्माण झालेल्या आणि प्रक्रिया केलेल्या सुक्या कचऱ्याचे प्रमाण - मासिक अहवाल.
- ❑ पुनर्प्रक्रिया केंद्राचे स्थान / साहित्य पुनर्प्राप्ती सुविधा (MRF) केंद्र - गुगल मॅप / जिओटॅग केलेली छायाचित्रे
- ❑ पुनर्प्रक्रिया केंद्रांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेद्वारे सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया/विल्हेवाट लावण्याची यंत्रणा.
- ❑ विलगीकरण करून प्रक्रिया केलेल्या घातक घनकचऱ्याचे प्रमाण – मासिक अहवाल.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार  नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |

# सुक्या कचऱ्याचे व्यवस्थापन



# १.२.३ सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया / विल्हेवाट







सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

# १.२.४ जुन्या साठलेल्या कचऱ्यावर (Legacy Waste) शास्त्रोक्त प्रक्रिया — गुण १००

वर्षानुवर्षे साठलेला कचरा मोठी जागा व्यापतो आणि रोग पसरवणाऱ्या माश्या आणि लीचेटच्या निर्मितीसाठी एक प्रजनन भूमी बनतो. यामुळे भूगर्भातील पाणी दूषित होऊ शकते. केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळाच्या (CPCB) मार्गदर्शक तत्त्वांनुसार, वर्षानुवर्षे प्रक्रिया न करता साठविलेला जुना कचरा उत्खनन, प्रक्रिया आणि विलगीकरण करून त्याचा पुनर्वापर करण्याची शास्त्रोक्त प्रक्रिया करणे म्हणजे "बायोमाइनिंग" होय. स्थानिक स्वराज्य संस्थांनी जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया करण्याला महत्त्व दिले आहे की नाही याचे मूल्यमापन हा निर्देशक करतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | वर्षानुवर्षे साठलेल्या जुन्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया | | १०० |
| | जमीन पुनर्प्राप्त आणि पुनर्वापर | १०० | |
| | १०० % जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया | ७५ | |
| | ७५% ते १००% जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया केली आणि केली जाते | ५० | |
| | ५०% ते ७५% जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया केली आणि केली जाते | २५ | |
| | ५०% पेक्षा कमी जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया केली आणि केली जाते | ० | |

**आवश्यक तपशील:**

- वर्षानुवर्षे साठवून ठेवलेल्या घनकचरा ठिकाणाचा तपशील (स्थानिक स्वराज्य संस्थेतील)
- साठवून ठेवलेल्या कचऱ्याच्या व्यवस्थापन सुविधेचे गुगल मॅपवरील स्थान.
- अधिकृत प्रमाणपत्रासह वर्षानुवर्षे साठवून ठेवलेल्या घनकचऱ्यावर केलेल्या उपाययोजनांची स्थिती - काम पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र / निविदा सादर प्रमाणपत्र / कोणताही जुना साठलेला कचरा नसल्याच्या प्रमाणपत्राची प्रत.
- विविध टप्प्यावर (आधी-दरम्यान-नंतर) जिओ टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- जर जमीन पुन्हा वापरली जात असेल तर, काम पूर्ण होण्याआधीची व नंतरची छायाचित्रे. (Size १ ते २ MB)
- सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 3 GOOD HEALTH AND WELL-BEING | SDG ३. आरोग्य व लोककल्याण | ३.९ : २०३० पर्यंत, घातक रसायने आणि हवा, पाणी आणि माती प्रदूषण आणि दूषिततेमुळे मृत्यू आणि आजारांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करणे. |
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |

# १.२.४ जुन्या साठलेल्या कचऱ्यावर (Legacy Waste) शास्त्रोक्त प्रक्रिया







सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

| १.२.५ | प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल यूज प्लास्टिकवर (SUP) बंदी) | गुण ३०० |
|---|---|---|

प्लास्टिक कचरा व्यवस्थापन ही एक गंभीर समस्या आहे. जगात दरवर्षी ३०० दशलक्ष मेट्रिक टनपेक्षा जास्त प्लास्टिक तयार होते, त्यापैकी केवळ ९% प्लास्टिकचाच पुनर्वापर केला जातो आणि उर्वरित प्लास्टीक जमिनीवर जमा होते. प्लास्टिकमुळे पर्यावरणाचा होणारा ऱ्हास कमी करण्यासाठी, केंद्र शासनाने १ जुलै २०२२ पासून सिंगल यूज प्लास्टिकसह पॉलिस्टीरीन आणि विस्तारित पॉलिस्टीरिनचे उत्पादन, आयात, साठा, वितरण, विक्री आणि वापर यावर संपूर्ण बंदी घातली आहे. स्थानिक स्वराज्य संस्था कशाप्रकारे या बंदीची अंमलबजावणी आणि जनजागृती करत आहेत, याचे मूल्यमापन हा निर्देशक करतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | जनजागृती मोहिमांचे आयोजन (Relative Marking) | | २०० |
| | सिंगल यूज प्लास्टिक बंदीबाबत जनजागृती मोहिमांचे आयोजन | १०० | |
| | प्लास्टिकला पर्यायी घटकांबद्दल (वस्तू) जनजागृती मोहिमांचे आयोजन | १०० | |
| २. | सिंगल यूज प्लास्टीकच्या निर्मूलनावर कारवाईसह दंडाच्या रकमेचे संकलन | | १०० |

**आवश्यक तपशील:**

- प्लास्टिक कचऱ्याच्या व्यवस्थापनासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेने घेतलेल्या उपक्रमांचा तपशील- विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- सिंगल यूज प्लास्टिक आणि प्लास्टिकला पर्यायी वस्तू याबद्दल आयोजित केलेल्या मोहिमांची संख्या - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- जनजागृती मोहिमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- सिंगल यूज प्लास्टीक (SUP) च्या वापरावर दंड वसूल करण्याबाबत लॉगबुकमध्ये नोंद.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे.<br>१२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |
|---|---|---|

# प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल युज प्लास्टिकवर बंदी)

नियम : प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सुधारणा) नियम-२०२१, दिनांक ३० सप्टेंबर २०२१ पासून ७५ मायक्रॉनपेक्षा कमी जाडीच्या प्लास्टिक कॅरी बॅगचे उत्पादन, आयात, साठवणूक, वितरण, विक्री आणि वापर यावर निर्बंध आणले आहेत. तसेच दिनांक ३१ डिसेंबर २०२२ पासून, १२० मायक्रॉनपेक्षा कमी जाडीच्या प्लास्टिक कॅरी बॅगवर बंदी लागू करण्यात आली आहे.

**प्रतिबंधित सिंगल युज प्लास्टिकच्या वस्तूंची यादी**

| अ.क्र | वस्तू | अ.क्र. | वस्तू |
|---|---|---|---|
| १ | ईयर बड्ससाठी वापरल्या जाणाऱ्या प्लास्टिकच्या काड्या | ११ | चमचे |
| २ | फुग्यांसाठी वापरल्या जाणाऱ्या प्लास्टिकच्या काड्या | १२ | सूरी |
| ३ | प्लास्टीकचे झेंडे | १३ | स्ट्रॉ |
| ४ | चॉकलेट काड्या | १४ | ट्रे |
| ५ | आईसक्रीम काड्या | १५ | काटे चमचे |
| ६ | प्लास्टीक डिश | १६ | प्लास्टीकच्या निमंत्रण पत्रिका |
| ७ | कप | १७ | सिगारेटची पाकिटे |
| ८ | ग्लास | १८ | ढवळणी |
| ९ | सजावटीसाठी पॉलिस्टीरिन (थर्माकॉल) | १९ | मिठाईच्या डब्याभोवती गुंडाळण्यासाठी प्लास्टीक |
| १० | १०० मायक्रॉनपेक्षा कमी जाडीचे प्लास्टिक किंवा PVC बॅनर | | |

**संदर्भ:** ***Press Information Bureau (pib.gov.in)***

# १.२.५ प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल यूज प्लास्टिकवर (SUP) बंदी)









<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत</u>

| १.२.६ | जैव-वैद्यकीय (बायो-मेडिकल) कचरा व्यवस्थापन | गुण १०० |
|---|---|---|

जैव वैद्यकीय कचऱ्याला रुग्णालयातील कचरा देखील म्हणतात. यामध्ये संसर्गजन्य किंवा संभाव्य संसर्गजन्य पदार्थ असलेल्या कचऱ्याचा समावेश असतो. या प्रकारच्या कचऱ्यामध्ये पॅकेजिंग, वापरलेल्या वैद्यकीय पट्ट्या/मलमपट्ट्या आणि इन्फ्यूजन किट यांसारख्या वैद्यकीय किंवा प्रयोगशाळेच्या रोजच्या कामांशी संबंधित असलेल्या वस्तूंचा समावेश होतो. याशिवाय जैविक अणू किंवा जीव यासारखा संशोधन प्रयोगशाळांमधील कचरा समाविष्ट असतो. हा कचरा पर्यावरणात सोडला जाऊ नये यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेत जैव वैद्यकीय कचऱ्याचे कशाप्रकारे नियोजन केले जाते व किती कार्यक्षमतेने त्याची विल्हेवाट लावली जाते हे या निर्देशकाद्वारे तपासले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | सर्व आरोग्य सेवा आणि वैद्यकीय व्यावसायिक हे सार्वजनिक जैव वैद्यकीय कचरा व्यवस्थापन (CBMWTF) केंद्राचे सदस्य आहेत. | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| २. | शास्त्रोक्त पद्धतीने विल्हेवाट लावलेल्या जैव वैद्यकीय कचऱ्याची टक्केवारी (Relative Marking) | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- बायोमेडिकल वेस्ट डिस्पोजलचे लॉगबुक - स्थानिक संस्थेच्या CBWTF साइटवर जैव वैद्यकीय कचऱ्याचे संकलन, पृथक्करण, निर्जंतुकीकरण आणि विल्हेवाट लावण्यासाठीच्या यंत्रणेचा तपशील
- गुगल मॅपवरील स्थान.
- संकलन, वाहतूक आणि विल्हेवाट लावण्यासाठी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने (MPCB) अधिकृत केलेल्या जैव वैद्यकीय कचऱ्याचे व्यवस्थापन सुविधा केंद्राशी – करार
- जैव वैद्यकीय कचऱ्याच्या विल्हेवाटीचे लॉगबुक.
- जिओ-टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रामध्ये रुग्णालय/दवाखाना इत्यादी नसल्यास तालुका वैद्यकीय अधिकारी यांचे प्रमाणपत्र जोडावे.
- प्रदान केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 3 GOOD HEALTH AND WELL-BEING | SDG ३. आरोग्य व लोककल्याण | ३.९ : २०३० पर्यंत, घातक रसायने आणि हवा, पाणी आणि माती प्रदूषण आणि दूषिततेमुळे मृत्यू आणि आजारांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करणे. |
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |

# जैव-वैद्यकीय कचरा व्यवस्थापन

## जैव-वैद्यकीय कचऱ्याची योग्य विल्हेवाट लावणे का गरजेचे आहे?

- जैव-वैद्यकीय कचरा मानव आणि पर्यावरणासाठी धोकादायक असू शकतो कारण त्याने संसर्गजन्य जीवाणू आणि विषाणू वातावरणात पसरू शकतात आणि प्रसारित होऊ शकतात.
- जैव-वैद्यकीय कचरा व्यासास्थापन नियम, २०१६ च्या अनुसूची १ नुसार विहित केलेल्या सांकेतिक रंगीत पिशव्या / डब्यांमध्ये जैव वैद्यकीय कचरा योग्यरित्या वेगळा करून साठवला गेला नाही तर पाणी, माती आणि हवा दुषित होऊ शकते.

**जैव-वैद्यकीय कचरा व्यासास्थापन नियम, २०१६ खालील आस्थापनांमधून आणि त्यातील जैव-वैद्यकीय कचरा निर्माण करणे, हाताळणे, वेगळे करणे, साठवणे आणि गोळा करणे यात सहभागी असलेल्या सर्व व्यक्तींना लागू होतात.**

| जैव-वैद्यकीय कचरा नियम, २०१६ लागू असलेल्या आस्थापनांची यादी | | | |
|---|---|---|---|
| १ | रुग्णालये | ११ | चिकित्सक आस्थापना |
| २ | नर्सिंग होम | १२ | संशोधन आणि शैक्षणिक संस्था |
| ३ | चिकित्सालय | १३ | पॅथॉलॉजिकल आस्थापना |
| ४ | दवाखाने | १४ | आरोग्य शिबिरे, वैद्यकीय शिबिरे |
| ५ | पशुवैद्यकीय संस्था | १५ | लसीकरण शिबिरे, रक्तदान शिबिरे |
| ६ | प्राण्यांची घरे | १६ | शाळा आणि महाविद्यालयांचे प्रथमोपचार कक्ष |
| ७ | रक्तपेढ्या | १७ | न्यायवैद्यक प्रयोगशाळा |
| ८ | आयुष रुग्णालये | १८ | संशोधन प्रयोगशाळा |

## जैव-वैद्यकीय कचरा व्यवस्थापनासाठी डब्यांचे सांकेतिक रंग

मानवी/प्राण्यांचे शरीराचे अवयव, कापूस, मलमपट्टी, कालबाह्य/काढून टाकलेली औषधे, रासायनिक/द्रव कचरा, शरीरातील द्रवांनी डागलेले टाकून दिलेले कापड, वैद्यकीय कचरा.

**पिवळा सांकेतिक वर्ग**

दुषित पुनर्वापर करण्यायोग्य कचरा जसे की IV बाटल्या, नळ्या, सिरिंज, इंजेक्शन, कॅथेटर आणि मूत्र पिशव्या, रक्त पिशव्या आणि इतर दूषित प्लास्टिक आणि रबर उत्पादने.

**लाल सांकेतिक वर्ग**

वापरलेल्या तीक्ष्ण धातूच्या वस्तू जसे की सुया, सुया जोडलेले सिरिंज, स्केलपल्स, ब्लेड, रेझर आणि इतर दूषित धातूची साधने.

**पांढरी सांकेतिक वर्ग**

तुटलेल्या काचेच्या बाटल्या, कुपी, चंबूकी, इंजेक्शनच्या बाटल्या, सूक्ष्मदर्शक पट्ट्या आणि इतर कोणत्याही टाकाऊ काचेच्या वस्तू आणि धातूचे शरीर रोपण

**निळी सांकेतिक वर्ग**

# १.२.६ जैव-वैद्यकीय (बायो-मेडिकल) कचरा व्यवस्थापन







सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

# १.२.७ ई-कचरा व्यवस्थापन

**गुण १००**

**ई-कचऱ्यावर केल्या जाणाऱ्या शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया न केल्यामुळे मानवी आरोग्यावर विपरित परिणाम होतात आणि पर्यावरणाचे प्रदूषण होते. ई-कचऱ्याचे योग्य प्रकारे विलगीकरण आणि संकलन करून तो अधिकृत विघटन करणाऱ्या / पुनर्वापरकर्त्यांकडे पाठवला जाईल याची खात्री करणे हे स्थानिक स्वराज्य संस्थेचे कर्तव्य आहे. ई-कचऱ्याची शास्त्रोक्त पद्धतीने विल्हेवाट लावण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेने घेतलेल्या पुढाकारांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| मूल्यमापन कार्यपद्धती | | | गुण |
|---|---|---|---|
| १. | ई-कचऱ्याचे योग्य विलगीकरण करण्याबाबत जनजागृती उपक्रम (Relative Marking) | | ५० |
| | स्थानिक स्वराज्य संस्थेच्या रहिवाशांसाठी जागरूकता उपक्रम | २५ | |
| | स्थानिक स्वराज्य संस्थेच्या अधिकाऱ्यांसाठी/ ग्रामपंचयात सदस्यांची क्षमता वृद्धी सत्र | २५ | |
| २. | ई-कचरा संकलन आणि विलगीकरण यंत्रणा | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |
| ३. | कार्यरत संकलन केंद्र | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |

**आवश्यक तपशील:**

- ई-कचऱ्याचे योग्य विलगीकरण करण्याबाबत जागरूकता उपक्रमांचा तपशील
- महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने अधिकृत केलेल्या विघटनकर्ता (डिसमंटलर) किंवा पुनर्वापरकर्त्यांसोबत करार
- स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रात उपलब्ध असलेली ई-कचरा संकलन यंत्रणा (जसे की, कचरा संकलन केंद्राची स्थापना, मोबाईल ई-कचरा संकलन इ.)
- अधिकृत प्रमाणपत्र असलेल्या अधिकृत विघटनकर्ता/पुनर्वापरकर्त्याद्वारे स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये ई-कचरा गोळा करण्याच्या यंत्रणेचा तपशील – लॉगबूक
- ई-कचरा संकलन आणि प्रक्रियेच्या विविध टप्प्यावर (आधी-दरम्यान-नंतर) काढलेली जिओ-टॅग छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.
- महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने अधिकृत केलेल्या ई-कचरा पुनर्वापर करणाऱ्यांची यादी: ListofEWaste20082021.pdf (mpcb.gov.in)

| | | |
|---|---|---|
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |

# कार्यरत ई-कचरा संकलन केंद्र

**'ई-कचरा' म्हणजे विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक उपकरणे, संपूर्ण किंवा अंशतः कचरा म्हणून टाकली जाणारी विद्युत उपकरणे, यांसह सोलर छायाचित्रे -व्होय ल्टेइक मॉड्यूल्स/पॅनेल किंवा सेल, उत्पादन, नूतनीकरण आणि दुरुस्ती प्रक्रियेतून नाकारली जाणारी उपकरणे.**

| संकलन केंद्रांसाठी नियमावली | संकलन केंद्रांचे कार्य |
|---|---|
| संकलन केंद्र उत्पादक/विघटनकर्ता/पुनर्वापरकर्ता/नूतनीकरणकर्ता यांच्या वतीने ई-कचरा गोळा करून साठवू शकतो आणि तो अधिकृत विघटन/पुनर्वापर करणाऱ्यांना हस्तांतरित करू शकतो. | संकलन केंद्राकडे आलेल्या प्रत्येक सामानाचे वजन करण्यासाठी संकलन केंद्रात वजन मोजण्याची उपकरणे असणे आवश्यक आहे आणि या संदर्भात नोंद ठेवणे आवश्यक आहे. |
| जिथे निवासी भाग, व्यावसायिक संकुल, शैक्षणिक आणि संशोधन संस्था, निवासी कल्याणकारी संघटना (RWAs) आहेत त्या भागात संकलन केंद्र/पेट्या असू शकतात, ज्याद्वारे येथून ई-कचरा गोळा केला जाऊ शकतो. | संकलन केंद्राने संकलित केलेल्या ई-कचऱ्याच्या नोंदी ठेवाव्यात आणि संबंधित उत्पादकांना त्याचा हिशोब द्यावा. |
| ई-कचरा संकलन गाड्यांचा वापर संस्थांकडून ई-कचरा गोळा करण्यासाठी केला जाऊ शकतो आणि अशा गाड्या संकलन केंद्रांशी जोडल्या जातील. | कोणत्याही संकलन केंद्राची साठवण क्षमता प्रक्रिया केल्या जाणाऱ्या कचऱ्याच्या प्रमाणाशी (वजन आणि संख्या) सुसंगत असावी. |
| संकलन केंद्रातील साहित्य केवळ अधिकृत विघटन करणाऱ्यांना आणि पुनर्वापरकर्त्यांना पाठवले जावे. | संकलन केंद्रामध्ये योग्य अग्निशमन व्यवस्था तसेच आपत्कालीन परिस्थितीत बाहेर पडण्यासाठी सुटकेचे मार्ग असणे आवश्यक आहे. |
| संकलन केंद्रांची संख्या ई-कचऱ्याच्या निर्मितीच्या तुलनेत योग्य प्रमाणात आणि सुनियोजित असावी. | ई-कचरा साठवण्यासाठी आच्छादित आडोसा/जागा वापराव्यात. |
| उत्पादकांनी त्यांच्या स्वतःच्या संकलन केंद्रांचा तपशील नमूद करावा. | संकलन केंद्राने ई-कचरा उत्पादन श्रेणीनुसार साठवला पाहिजे. |

**टीप: कृपया ई-कचरा (व्यवस्थापन) नियम, २०१६ च्या अंमलबजावणीमधील मार्गदर्शक तत्त्वे :**
*https://cpcb.nic.in/displayपीडीएफ.php?id=aHdtZC9HVUlERUxJTkVTX0VXQVNURV9SVUxFU18yMDE2LnBkZg*

# १.२.७ ई-कचरा व्यवस्थापन












<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत</u>

| १.२.८ | स्वच्छतेचा दर्जा | गुण १०० |
|---|---|---|

उघड्यावर शौच केल्यामुळे माती आणि जल प्रदूषण होते. केंद्र शासनाने नागरिकांच्या वर्तणुकीत बदल घडवून देशाला हागणदारीमुक्त करण्याला अत्यंत महत्त्व दिले आहे. सहभागी ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थानी त्यांच्या क्षेत्राला हागणदारीमुक्त करण्यासाठी महत्त्व दिले आहे की नाही याचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | ओडीएफ प्लस स्थिती | | १०० |
| | मॉडेल | १०० | |
| | उदयोन्मुख | ९० | |
| | आकांक्षी | ७५ | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्राप्त झालेले व वैध असलेले ओडीएफ प्लस – मॉडेल, उदयोन्मुख आणि आकांक्षी प्रमाणपत्र
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यानचे वैध प्रमाणपत्र मूल्यमापनासाठी विचारात घेतले जाईल.
- ❑ ओडीएफ प्लस – मॉडेल, उदयोन्मुख आणि आकांक्षी स्थितीवर आधारित मूल्यांकन केले जाईल.
- ❑ **सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत.**

| | | |
|---|---|---|
| 6 CLEAN WATER AND SANITATION | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.२: २०३० पर्यंत, सर्वांसाठी समान स्वच्छता, उघड्यावर शौचास जाणे समाप्त करणे, महिला आणि मुलींच्या आणि असुरक्षित परिस्थितीत असलेल्या लोकांच्या गरजांकडे विशेष लक्ष देणे |

## २ वायू

| अ/क्र. | कृती बिंदु | गुण |
|---|---|---|
| **२.१** | **वायू गुणवत्ता परिक्षण -** पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEFCC) किंवा NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेद्वारे | २०० |
| **२.२** | **वायू प्रदूषण कमी करणे** | |
| २.२.१ | फटाक्यांवर बंदी घालण्याकरिता पुढाकार | १७५ |
| २.२.२ | कृषी कचरा व्यवस्थापन (शेतातील कचरा उघड्यावर जाळणे.) | ३०० |
| २.२.३ | गॅस कनेक्शन | २०० |
| २.२. ४ | बांधकाम व पाडकाम कचऱ्याचे व्यवस्थापन | ३०० |
| **२.३** | **इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरणाची प्रभावी अंमलबजावणी** | |
| २.३.१ | इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरण : इलेक्ट्रिक वाहनांची संख्या | ५०० |
| २.३.२ | इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्टेशनची संख्या | ३०० |
| **२.४** | **ध्वनी प्रदूषण कमी करणे** | १७५ |
| **२.५** | **वातावरणीय बदल (Climate Change) आणि आपत्ती व्यवस्थापनाची तयारी** | ३५० |
| **एकूण** | | **२,५००** |

| २.१ | वायू गुणवत्ता परिक्षण - पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEFCC) किंवा NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेद्वारे | गुण २०० |
|---|---|---|

**स्वच्छ श्वास घेणे निरोगी जीवन जगण्यासाठी गरजेचे आहे. अनेक कारणांमुळे हवेची गुणवत्ता सतत खालावत असल्यामुळे याचा लाखो लोकांवर परिणाम होत आहे. या निर्देशकाचा उद्देश स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांच्या क्षेत्रातील हवेच्या गुणवत्तेचे परीक्षण करण्यासाठी प्रोत्साहित करणे आणि त्यात सुधारणा करण्यासाठी पुढाकार घ्यायला लावणे हा आहे.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | MoEFCC / NABL प्रमाणित आणि मान्यताप्राप्त प्रयोगशाळांकडून वायू गुणवत्ता निरीक्षण अहवाल | | २०० |
| | • ६ किंवा अधिक अहवाल | २०० | |
| | • ४ अहवाल | १५० | |
| | • ३ अहवाल | १०० | |
| | • २ अहवाल | ५० | |
| | • २ पेक्षा कमी अहवाल | ० | |

**आवश्यक तपशील:**

- पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEFCC) / NABL प्रमाणित आणि मान्यताप्राप्त प्रयोगशाळांद्वारे वायू गुणवत्ता निरीक्षण अहवाल: ($PM_{2.5}$, $PM_{10}$, $SO_2$ आणि $NO_x$).
  - *२४ तास सातत्याने निरीक्षण*
  - *वायू गुणवत्ता निर्देशांक (air quality index)*
  - *वायू प्रदूषणाचे प्रमाण अधिक असणाऱ्या गर्दीच्या ठिकाणी निरीक्षण करणे आवश्यक.*
- दोन अहवालांमध्ये किमान १ महिन्याचे अंतर असावे.
- जिओटॅग छायाचित्रे (Size १ ते २ MB): सभोवतालच्या वायूच्या गुणवत्तेचे सातत्याने निरीक्षण करणारी केंद्रे आणि त्यांच्या स्थानांचा तपशील.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG ३. आरोग्य व लोककल्याण** | ३.९ : २०३० पर्यंत, घातक रसायने आणि हवा, पाणी आणि माती प्रदूषण आणि दूषिततेमुळे मृत्यू आणि आजारांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करणे. |
|---|---|---|

# २.१ वायू गुणवत्ता परिक्षण - पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEFCC) किंवा NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेद्वारे













सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

| २.२.१ | फटाक्यांवर बंदी घालण्याकरिता पुढाकार | गुण १७५ |
|---|---|---|

सण-उत्सव, कार्यक्रमांच्या निमित्ताने फटाके वाजवले जातात. त्यांच्यामध्ये कार्बन आणि सल्फर मोठ्या प्रमाणात असते आणि ते विषारी वायू हवेत सोडतात. हा विषारी वायू वनस्पती आणि प्राणी दोघांनाही हानिकारक आहे. पर्यावरणाच्या हितासाठी फटाक्यांच्या वापरावर बंदी घालणे आवश्यक आहे. या उद्देशाने या निर्देशकाच्या माध्यमातून स्थानिक स्वराज्य संस्था फटाके बंदीच्या दृष्टीने कशी अंमलबजावणी करत आहेत, याची पडताळणी केली जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | फटाके विक्री आणि वापरावर बंदी घातलेल्या आदेशाची प्रत | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |
| २. | वृत्तपत्रात प्रकाशित झालेल्या आदेशाची/सूचनेची प्रत | | २५ |
| ३. | स्थानिक स्वराज्य संस्थांनी घेतलेल्या जनजागृती कार्यक्रम/ उपक्रमांची संख्या **(Relative Marking)** | | ५० |
| | शैक्षणिक संस्थांमध्ये आयोजित केलेल्या जनजागृती कार्यक्रम/उपक्रमांची संख्या | ३० | |
| | शैक्षणिक संस्थांव्यतिरिक्त आयोजित केलेल्या जनजागृती कार्यक्रम/उपक्रमांची संख्या | २० | |
| ४. | सण उत्सवाच्या संध्याकाळी/दुसऱ्या दिवशी सकाळचा वायू गुणवत्ता निरीक्षण अहवाल – AQI - राष्ट्रीय वायू गुणवत्ता निर्देशांकानुसार. | | ७५ |
| | ०-१०० (उत्तम/समाधानकारक) | ७५ | |
| | १०१- २०० (सामान्य) | ५० | |
| | २०१ – ५०० (खराब/ खूप खराब/तीव्र) | ० | |

**आवश्यक तपशील:**

- स्थानिक प्राधिकरणांकडून फटाके विक्री आणि वापरावर बंदी घातलेल्या अधिसूचनेची प्रत.
- वृत्तपत्रात प्रकाशित झालेल्या आदेशाचा/सूचनेचे छायाचित्र/वेबपेजची लिंक.
- जनजागृती कार्यक्रमांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- जनजागृती कार्यक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- उत्सवाच्या संध्याकाळी/उत्सवाच्या दुसऱ्या दिवशी सकाळी MoEFCC/NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळांकडून वायू गुणवत्ता निरीक्षण अहवाल
- राष्ट्रीय वायू गुणवत्ता निर्देशांक: https://app.cpcbccr.com/AQI_India/
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |
|---|---|---|

# २.२.१ फटाक्यांवर बंदी घालण्याकरिता पुढाकार








फलटण नगर परिषद, फलटण, जि सातारा

Paper Notification

जाहीर आवाहन

फलटण नगर परिषद, फलटण

सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

| २.२.२ | कृषी कचरा व्यवस्थापन (शेतातील कचरा उघड्यावर जाळणे) | गुण ३०० |
|---|---|---|

पेरणीच्या आधी शेतामध्ये तयार होणारा कचरा (पिकांचे अवशेष, गवत इ.) शेतात जाळला जातो. परंतु याच्यामुळे कार्बन डायऑक्साइड (CO2), कार्बन मोनोऑक्साइड (CO), सल्फर ऑक्साइड (SOx), कणस्वरूप पदार्थ (पार्टिक्युलेट मॅटर) आणि ब्लॅक कार्बन यांसारखे विषारी वायू हवेमध्ये सोडले जातात. स्थानिक स्वराज्य संस्थांनी कृषी कचरा व्यवस्थापनासाठी प्रयत्न केले आहेत की नाही याचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | कृषी कचरा व्यवस्थापनासाठी राबविण्यात आलेल्या जनजागृती उपक्रमांची संख्या. **(Relative Marking)** | | ५० |
| २. | पिकांचे अवशेष जाळण्यावर बंदी | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| ३. | शेतकरी उत्पादक संघटनांची (FPOs) निर्मिती : शेतातील कचरा संकलन व त्यातून पेलेट, नारळापासून कोकोपीटची निर्मिती, इत्यादि करण्यासाठी. | | १०० |
| ४. | स्थानिक स्वराज्य संस्थेत बायोमास संकलन आणि पृथक्करण सुविधा | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| ५. | जैवइंधन म्हणून वापरल्या जाणाऱ्या बायोमासच्या टक्केवारी | | ५० |
| | ७५% - १००% | ५० | |
| | ५०% - ७५% | ४० | |
| | २५% - ५०% | ३० | |
| | २५% पेक्षा कमी | ० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ कृषी कचरा व्यवस्थापनासाठी पिकांचे अवशेष जाळण्यावर बंदी घालण्याच्या आदेशाची प्रत.
- ❑ शेतातील कचरा संकलन व त्यातून पेलेट, नारळापासून कोकोपीटची निर्मिती करण्यासाठी शेतकरी उत्पादक संघटनांची (FPOs) निर्मिती पत्राची प्रत.
- ❑ कृषी कचरा व्यवस्थापनासाठी जनजागृती उपक्रमांची जिओ-टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन** | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे. |
|---|---|---|

| २.२.३ | गॅस कनेक्शन | गुण २०० |
|---|---|---|

स्वयंपाकासाठी लाकूड/शेणाच्या गोवऱ्यांचा वापर करणे, हे ग्रामीण भागातील घरगुती वायू प्रदूषणाचे प्रमुख कारण आहे. घरगुती वायू प्रदूषणामुळे स्ट्रोक, हृदयरोग, दीर्घकालीन अवरोधी फुफ्फुस रोग (COPD) आणि फुफ्फुसाचा कर्करोग यांसारखे अनेक असंसर्गजन्य रोग होतात. ग्रामीण घरांमध्ये गॅस जोडणी (LPG and Biogas Plants) वाढविण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्था कशा प्रकारे लक्ष केंद्रीत करत आहे याचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान घरांमध्ये नवीन गॅस जोडणीची टक्केवारी **(Relative Marking)** | १०० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० पूर्वी घरांमध्ये असणाऱ्या गॅस जोडणीची टक्केवारी **(Relative Marking)** | १०० |

**आवश्यक तपशील:**

- स्थानिक स्वराज्य संस्थेतील घरांची संख्या.
- स्वयंपाकासाठी गॅसचा वापर करणाऱ्या घरांची टक्केवारी- एलपीजी आणि/किंवा बायोगॅस- विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | SDG ७. सुलभ आणि स्वच्छ ऊर्जा | ७.१: २०३० पर्यंत, परवडणाऱ्या, विश्वासार्ह आणि आधुनिक ऊर्जा सेवांचा सार्वत्रिक प्रवेश सुनिश्चित करणे. |
|---|---|---|

# २.२.४ बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन

**गुण ३००**

बांधकाम पाडकामाच्या ठिकाणांवरून निघणाऱ्या धुळीमुळे ३० टक्के वायू प्रदूषण होते. बांधकाम आणि पाडकाम (कन्स्ट्रक्शन अँड डेमोलिशन (C&D) कचऱ्याचे शास्त्रोक्त पद्धतीने व्यवस्थापन केल्यास वायू प्रदूषण कमी करण्यात महत्त्वाची भूमिका बजावते. बांधकाम आणि पाडकाम कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ नुसार स्थानिक स्वराज्य संस्थांना "त्यांच्या अधिकारक्षेत्रातील बांधकाम आणि पाडकाम कचऱ्याचे योग्य व्यवस्थापन" करण्याची शिफारस करतो. स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापनासाठी केलेल्या कामांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | योग्य कव्हर असलेल्या बांधकाम व पाडकाम कचरा साठवणुकीसाठी उपलब्ध जमीन/क्षेत्राची निवड | | ५० |
| २. | संकलनासाठी असलेली वाहने | | ७५ |
| | GPS ट्रॅकर असलेली वाहने | ७५ | |
| | GPS ट्रॅकर नसलेली वाहने | ५० | |
| ३. | बांधकाम व पाडकाम कचऱ्याचे विलगीकरण | | २५ |
| ४. | बांधकाम व पाडकाम कचरा प्रक्रिया सुविधा | | ७५ |
| | कार्यरत प्रक्रिया केंद्र | ७५ | |
| | निविदा मागवल्या असल्यास | ५० | |
| ५. | बांधकाम व पाडकाम कचऱ्याच्या पुनर्वापराची टक्केवारी **(Relative Marking)** | | २५ |
| ६. | योग्य कव्हर असलेल्या बांधकाम ठिकाणांची टक्केवारी **(Relative Marking)** | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ कचरा साठवण्यासाठी निवडल्या गेलेल्या जमिनीचा/क्षेत्राचा तपशील आणि गुगल माप लिंक.
- ❑ बांधकाम व पाडकाम कचरा गोळा करण्यासाठी GPS ट्रॅकर असलेल्या व नसलेल्या वाहनांचे लॉगबुक/नोंदणीपत्र.
- ❑ विलंगीकरण केलेल्या बांधकाम व पाडकाम कचऱ्याचे वर्गीकरण
- ❑ एकूण संकलित, विलगीकरण आणि पुनर्वापर केला जाणारा बांधकाम व पाडकाम कचऱ्याचा तपशील (टनमध्ये )- लॉगबुकसह.
- ❑ बांधकाम ठिकाणावर धूळ प्रदूषण नियंत्रित करण्यासाठी बांधकाम ठिकाण योग्यरित्या झाकल्या पाहिजेत.
- ❑ बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन प्रक्रियेची टप्प्याटप्प्याने जिओटॅग केलेली छायाचित्रे (size १ ते २ MB).
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ७. सुलभ आणि स्वच्छ ऊर्जा** | ७.१: २०३० पर्यंत, परवडणाऱ्या, विश्वासार्ह आणि आधुनिक ऊर्जा सेवांचा सार्वत्रिक प्रवेश सुनिश्चित करणे. |

## २.३.१ इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरण : इलेक्ट्रिक वाहने

**गुण ५००**

**जीवाश्म इंधनावरचे अवलंबित्व कमी करण्यासाठी, हरितगृह वायू उत्सर्जन कमी करण्यासाठी आणि ऊर्जा कार्यक्षमता सुधारण्यासाठी इलेक्ट्रिक वाहतूक (ई-वाहतूक) हे सर्वात अनुकूल तंत्रज्ञान आहे. महाराष्ट्र राज्य इलेक्ट्रिक वाहन धोरण, २०२१ चे "राज्यात बॅटरी इलेक्ट्रिक व्हेईकल (BEVs) च्या अवलंबनाला गती देऊन २०२५ पर्यंत नवीन वाहनांच्या नोंदणीमध्ये १०% योगदान मिळविण्याचे उद्दिष्ट आहे. रस्त्यावरील वाहनांच्या विदयुतीकरणाला चालना देण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेने घेतलेल्या पुढाकारांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० **(Relative Marking)** दरम्यान स्थानिक संस्था क्षेत्रात नोंदणीकृत ईव्ही | | ३०० |
| | दुचाकी ई-वाहन | १०० | |
| | तीनचाकी ई-वाहन | १०० | |
| | चारचाकी ई-वाहन | १०० | |
| २. | सार्वजनिक ई-वाहन वाहतुकीची टक्केवारी **(Relative Marking)** | | २०० |
| | ५१% किंवा अधिक | २०० | |
| | २६%-५०% | १५० | |
| | ११%-२५% | १०० | |
| | १०% पेक्षा कमी | ० | |

**आवश्यक तपशील:**

- संबंधित RTO कडील तपशीलवार माहितीमध्ये समाविष्ट असावे -
- नोंदणीकृत ईव्हीची संख्या (दुचाकी [2W], तीनचाकी [3W] आणि चारचाकी [4W]),
- स्थानिक संस्थेने खरेदी केलेल्या ईव्हीची संख्या.
- 250 वॅट क्षमतेच्या दुचाकींना आरटीओकडे नोंदणीची आवश्यकता नसल्यामुळे अशा ईव्ही विक्रेत्याकडून प्राप्त होणारा ईव्हीचा तपशील ग्राह्य धरला जाईल.
- सार्वजनिक वाहतुकीसाठी वापरल्या जाणाऱ्या स्थानिक संस्थेतील वाहनांचा तपशील.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 13 CLIMATE ACTION | **SDG १३. वातावरणीय कृती** | १३.२ : राष्ट्रीय धोरणे, रणनीती आणि नियोजनामध्ये हवामान बदलाचे उपाय एकत्रित करणे. |

## २.३.१ इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरण : इलेक्ट्रिक वाहने













<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत</u>

# २.३.२ इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्टेशन

**गुण ३००**

वाहतूक हे वायू प्रदूषणाचे प्रमुख कारण आहे, मात्र जीवनाचा अविभाज्य भाग असल्याने तो टाळता येत नाही. इलेक्ट्रिक वाहनांचा (ईव्ही) अवलंब केल्याने शहरांमधील प्रदूषणाची पातळी कमी होऊ शकते. ई-वाहनांचा वापर करण्यासाठी पायाभूत सुविधांची अनुपलब्धता ही एक प्रमुख अडचण आहे. त्यामुळे, ई-वाहनांचा वापर वाढविण्याच्या अनुषंगाने पायाभूत सुविधा वाढविण्याकरिता प्रयत्न करणे महत्वाचे आहे. ई-वाहन चार्जिंग स्टेशन तयार करून ई-वाहतूक सुविधा विकसित करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या प्रयत्नांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान तयार केलेल्या ईव्ही चार्जिंग स्टेशनची संख्या **(Relative Marking)** | | १०० |
| | दुचाकी | ५० | |
| | चारचाकी | ५० | |
| २. | **Upkeep:**<br>माझी वसुंधरा अभियान २.० ,३.०, ४.० आणि ५.० दरम्यान तयार केलेल्या ईव्ही चार्जिंग स्टेशनची संख्या आणि देखभाल **(Relative Marking)** | | ५० |
| | दुचाकी | २५ | |
| | चारचाकी | २५ | |
| ३. | चार्जिंग स्टेशनवर उपलब्ध असलेल्या कार्यरत चार्जिंग पॉइंट्सची एकूण संख्या. **(Relative Marking)** | | ५० |
| ४. | अक्षय ऊर्जा पुरवठ्यासह चार्जिंग स्टेशनची संख्या **(Relative Marking)** | | १०० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ माझी वसुंधरा अभियान २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान तयार केलेल्या ईव्ही चार्जिंग स्टेशनचे तपशील – विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- ❑ गुगल मॅपवर पूर्ण पत्ता, स्थान.
- ❑ ईव्ही चार्जिंग स्टेशनच्या वीज बिलाची प्रत.
- ❑ कार्यारंभ आदेश , कार्य पूर्णत्व प्रमाणपत्र आणि आर्थिक प्रगतीचा अहवाल .
- ❑ *महाराष्ट्र EV धोरण :* https://gr.maharashtra.gov.in/Site/Upload/Government%20Resolutions/Marathi/202505231834008229....pdf

- ईव्ही चार्जिंग स्टेशनची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size 1 ते 2 MB).
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.
- स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेली माहिती माझी वसुंधरा अभियान २.० ,३.० आणि ४.० दरम्यान MIS मध्ये भरलेल्या माहितीशी जुळत नसल्यास, कोणतेही गुण दिले जाणार नाहीत. (केवळ अपकीपसाठी (Upkeep) लागू).

| | | |
|---|---|---|
| | **SDG ९. उद्योग, नाविन्यपूर्ण उपक्रम आणि पायाभूत सुविधा** | ९.१ : सर्वांसाठी परवडणाऱ्या आणि समान प्रवेशावर लक्ष केंद्रित करून आर्थिक विकास आणि मानवी कल्याणासाठी प्रादेशिक आणि सीमापार पायाभूत सुविधांसह गुणवत्तापूर्ण, विश्वासार्ह, टिकाऊ आणि लवचिक पायाभूत सुविधा विकसित करणे. |

# ई-वाहनांची चार्जिंग चे वर्गीकरण

**१. पद्धत १** - AC चार्जिंग - केबल आणि प्लगचा वापर करून एक स्टँडर्ड सॉकेट आउटलेट वापरण्यात येते. सामान्यतः याची शिफारस केली जात नाही.

**२. पद्धत २** - AC चार्जिंग - केबल आणि प्लगचा वापर करून अंतर्भूत संरक्षण आणि नियंत्रण क्षमतेसह एक स्टँडर्ड सॉकेट आउटलेट वापरण्यात येते. हे घरगुती चार्जिंगसाठी वापरले जाते.

**३. पद्धत ३** - AC चार्जिंग - ई-वाहनाला वीज पुरवण्यासाठी वेगळे उपकरण वापरले जाते. ही पद्धत व्यावसायिक किंवा सार्वजनिक चार्जिंग करण्यासाठी वापरली जाते.

**४. पद्धत ४** - DC चार्जिंग - ई -वाहनाला वीज पुरवण्यासाठी वेगळे उपकरण वापरले जाते. ही पद्धत व्यावसायिक किंवा सार्वजनिक चार्जिंग करण्यासाठी वापरली जाते..

## पॉवर लेव्हल (पॉवर रेटिंग) नुसार ईव्ही चार्जिंगचे वर्गीकरण खाली दिले आहे:

| | पॉवर लेव्हल (P) | विद्युत प्रवाह | सुसंगत EV वाहन प्रकार |
|---|---|---|---|
| सामान्य पॉवर चार्जिंग | $P \leq 7kW$ | AC & DC | दु-चाकी, तीन-चाकी, ई-कार आणि एक टनापर्यंत वजन असणारी हलकी व्यावसायिक वाहने |
| | $7\ kW < P \leq 22kW$ | AC & DC | |
| उच्च पॉवर चार्जिंग | $22kW < P \leq 50kW$ | DC | ई-कार आणि एक ते सहा टनापर्यंत वजन असणारी हलकी व मध्यम व्यावसायिक वाहने |
| | $50kW < P < 200kW$ | DC | |

**संदर्भ**: https://www.niti.gov.in/sites/default/files/2021-08/HandbookforEVChargingInfrastructureImplementation081221.pdf

## २.३.२ इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्टेशन












सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

## २.४ ध्वनी प्रदूषण कमी करणे — गुण १७५

ध्वनी प्रदूषण म्हणजे त्रासदायक ध्वनी ज्याचा मानव आणि प्राण्यांच्या आरोग्यावर दुष्परिणाम होतो. नैसर्गिक घटना आणि मानवी कृतींमुळे ध्वनी प्रदूषण होते. ह्यात मुख्य कारण मानवनिर्मित स्त्रोत म्हणजे औद्योगिक सुविधा, विमाने, लाऊडस्पीकर, फटाके इ. उच्च आवाजात वापरल्यास, काही इतर उपकरणे देखील ध्वनी प्रदूषणात योगदान देतात, जसे की टेलिव्हिजन, ट्रान्झिस्टर, रेडिओ इ. या निर्देशकामध्ये, स्थानिक स्वराज्य संस्थांचे ध्वनी प्रदूषण रोखण्याच्या त्यांच्या प्रयत्नांवर मूल्यमापन केले जाईल.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | भोंगा (हॉर्न) रोखण्यासाठी जनजागृती उपक्रमांची संख्या. (Relative Marking) | | १०० |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची पहिली तिमाही (एप्रिल-जून) | २५ | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची दुसरी तिमाही (जुलै-सप्टेंबर) | २५ | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची तिसरी तिमाही (ऑक्टोबर-डिसेंबर) | २५ | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची चौथी तिमाही (जानेवारी-मार्च) | २५ | |
| २. | परवानगी दिलेल्या वेळेच्या मर्यादेतनंतर उत्सवादरम्यान सार्वजनिक ठिकाणी लाउडस्पीकर वापरण्याच्या निर्बंधाच्या आदेशाची/ सूचनेची प्रत. | | ५० |
| ३. | शांतता क्षेत्र | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |

**आवश्यक तपशील:**

- जनजागृती उपक्रमांची संख्या (तिमाही) - विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- नागरिकांच्या सहभागाचा तपशील (तिमाही) - विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- परवानगी दिलेल्या वेळेच्या मर्यादेतनंतर उत्सवादरम्यान सार्वजनिक ठिकाणी लाउडस्पीकर वापरण्याच्या निर्बंधाच्या आदेशाची/सूचनेची प्रत.
- स्थानिक स्वराज्य संस्थेने शांतता क्षेत्रासंबंधी जाहीर केलेला अद्ययावत अधिनियम
- शांतता क्षेत्राचे स्थान- गुगल मॅप वर
- कार्यक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |
|---|---|---|

# ध्वनी प्रदूषणाबद्दल जनजागृती

| जागतिक आरोग्य संस्थेच्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार मानक आवाज पातळी | |
|---|---|
| **विशिष्ट आवाज वातावरण** | **आवाजाची मर्यादा (dB)** |
| घरामध्ये | ३०-३५ |
| शाळा आणि मैदानात | ५५ |
| औद्योगिक, व्यावसायिक आणि गर्दीची ठिकाणे | ७० |
| समारंभ, उत्सव आणि मनोरंजन कार्यक्रम | १०० |
| हेडफोन/इयरफोनद्वारे संगीत | ८५ |

| आवाजाच्या संदर्भात परिसरातील हवेची गुणवतेची मानके | | |
|---|---|---|
| क्षेत्र | ध्वनीची मर्यादा | |
| | दिवसाची वेळ (सकाळी ६.०० ते रात्री १०.००) | रात्रीची वेळ (रात्री १०.०० ते सकाळी ६.००) |
| औद्योगिक क्षेत्र | ७५dB | ७०dB |
| व्यावसायिक क्षेत्र | ६५dB | ५५dB |
| रहिवासी क्षेत्र | ५५dB | ४५dB |
| शांतता क्षेत्र | ५०dB | ४०dB |

https://cpc.nic.in/who-guidelines-for-noise-quality/

# शांतता क्षेत्रासाठी निकष

१. शांतता क्षेत्र हे रुग्णालये, शैक्षणिक संस्था आणि न्यायालयांच्या १००-मीटरच्या परीसरातील क्षेत्र आहेत, ज्यांना सक्षम अधिकाऱ्यांनी घोषित केले आहे.
२. या क्षेत्रामध्ये वाहनांचे हॉर्न, लाऊडस्पीकर आणि फटाके वाजवण्यास मनाई आहे.

## ध्वनी प्रदूषण कमी करण्याचे उपाय

### नैसर्गिक उपाय

१. बांबू लागवड
२. वृक्षारोपण
३. मातीचे बंधारे
४. हरित भिंती



### मानवनिर्मित उपाय

१. पारदर्शक ऍक्रेलिक पॅनेल
२. आवाज अडथळा भिंती
३. दगडी भिंती
४. परवर्तीय अडथळे



| २.५ | वातावरणीय बदल (Climate Change) आणि आपत्ती व्यवस्थापनाची तयारी | गुण ३५० |
|---|---|---|

**महाराष्ट्राने एक सुरक्षित आणि आपत्ती प्रतिरोधक राज्य तयार करण्यासाठी राज्य आपत्ती व्यवस्थापन कृती आराखडा तयार केला आहे. या कृती आराखड्यामध्ये सर्वांगीण, सक्रिय,बहु-आपत्ती आणि तंत्रज्ञानावर आधारित धोरणे विकसित केली आहेत. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांच्या आपत्ती व्यवस्थापनाचे आणि सहभागाचे मूल्यमापन करेल.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | वातावरणीय बदलाबाबत आणि आपत्ती व्यवस्थापनासाठी जनजागृती निर्माण करण्यासाठी आयोजित केलेल्या कार्यक्रमांची संख्या | | १०० |
| २. | हवामानातील तीव्र बदलांची नोंद | | १०० |
| | होय | १०० | |
| | नाही | ० | |
| ३. | ग्रामपंचायत विकास आराखड्यांतर्गत (GPDP) स्थानिक स्वराज्य संस्थेचा आपत्ती व्यवस्थापन आराखडा | | ५० |
| ४. | ग्रामीण आपत्ती व्यवस्थापन समितीने (VDMC) आयोजित केलेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या भागधारकांसाठी आपत्ती व्यवस्थापनावर क्षमता वृद्धी सत्रांची संख्या **(Relative Marking)** | | ५० |
| ५. | ग्रामपंचायत स्तरावर उपलब्ध असलेली अद्ययावत आपत्ती व्यवस्थापन किट | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ जनजागृती उपक्रमांची संख्या आणि नागरिकांच्या सहभागाचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- ❑ माझी वसुंधरा अभियान संचालनालयाने जारी केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार आयोजित केलेल्या जनजागृती उपक्रमांचा मूल्यमापनासाठी विचार केला जाईल. (संदर्भासाठी मार्गदर्शक सूचना जोडल्या आहेत).
- ❑ जनजागृती कार्यक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेच्या आपत्ती व्यवस्थापन आराखड्याची प्रत.
- ❑ ग्रामपंचायतीच्या नोटीस बोर्डवरील आपत्ती व्यवस्थापन आराखड्याचे छायाचित्र.
- ❑ ग्रामीण आपत्ती व्यवस्थापन समिती आयोजित क्षमता वृद्धी सत्रांचा इतिवृत्त. पावसाळ्यापूर्वी सत्रे आयोजित केली जावीत आणि बैठकीच्या नोंदींच्या प्रतीसह तपशील सादर केला जावा.
- ❑ क्षमता वृद्धी सत्रांच्या वार्षिक वेळापत्रकाची प्रत.
- ❑ ग्रामपंचायतिच्या संकेतस्थळावर/नोटीस बोर्डवर उपलब्ध असलेल्या आपत्ती व्यवस्थापन किटची यादी.

***टीप- स्थानिक स्वराज्य संस्थेत गेल्या ५ वर्षात घडलेल्या हवामानातील तीव्र बदलांचे आणि आपत्तींचे मॅपिंग करावे. ह्या आपत्तींमध्ये अतिवृष्टी, पूर, भूस्खलन, उष्णकटिबंधीय चक्रीवादळ, उष्णतेची लाट, विजा आणि गडगडाट इत्यादींचा समावेश होतो.***

- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| 13 CLIMATE ACTION | **SDG १३. वातावरणीय कृती** | १३.२ : राष्ट्रीय धोरणे, रणनीती आणि नियोजनामध्ये हवामान बदलाचे उपाय एकत्रित करणे.<br>१३.३ : हवामान बदल कमी करणे, अनुकूलन आणि पूर्व चेतावणी यावर शिक्षण, जागरूकता वाढवणे आणि मानवी आणि संस्थात्मक क्षमता सुधारणे. |
|---|---|---|

# ग्रामीण आपत्ती व्यवस्थापन आराखड्याची तयारी

१. ग्रामीण आपत्ती व्यवस्थापन योजनेची तयारी आणि गावातील आपत्ती इतिहासाचे विश्लेषण करण्यासाठी ग्रामस्तरीय बैठक.

२. समितीद्वारे गावाचे प्राथमिक सर्वेक्षण आणि ग्रामीण आपत्ती व्यवस्थापन आराखड्याची उद्धीष्टांची माहिती देणे. तसेच आपत्ती जोखीम प्रतिकारशक्ती वाढवण्यासाठी भूमिका आणि जबाबदाऱ्या परिभाषित करणे.

३. गावातील विविध सामाजिक घटक, धोका, जोखीम आणि असुरक्षिततेचे मॅपिंग; गावपातळीवरील शमन गरजा/प्रकल्पांचे निर्देशन.

४. संसाधन आणि क्षमता मॅपिंग; जनजागृती आणि प्रतिसाद नियोजन.

५. वित्त/निधीच्या स्त्रोतांची ओळख, समितीद्वारे ग्रामीण आपत्ती व्यवस्थापन आराखड्याचा मसुदा तयार करणे आणि इतर उपयुक्त माहिती संलग्न करणे.

६. आराखड्याचं व्यवस्थापन: वेळोवेळी योजनेची तयारी, चाचणी आणि पुनरावृत्ती.

## ३ जल

| अ. क्र. | कृती बिंदु | गुण |
|---|---|---|
| **३.१** | **जल संसाधन संवर्धन आणि पुनर्जीवन** | ४०० |
| **३.२** | **जल संवर्धन** | |
| ३.२.१ | सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग) | २०० |
| ३.२.२ | भूजल पुनर्भरण | २५० |
| **३.३** | **पाण्याचे नुकसान मोजणे आणि गुणवत्तेचे निरीक्षण करणे** | |
| ३.३.१ | जल लेखापरीक्षण | १५० |
| ३.३.२ | पाणीपुरवठा यंत्रणेत पाण्याचे मोजमाप (water metering) | १०० |
| **३.४** | **पाणीपुरवठा आणि सांडपाण्याचे नियोजन** | २५० |
| **३.५** | **शाश्वत सणांचा प्रचार** | २०० |
| **३.६** | **जल परिसंस्थेचे संवर्धन** | १०० |
| **३.७** | **पंचायत प्रगती निर्देशांक** | १०० |
| | **एकूण** | **१,७५०** |

# ३.१ जल संसाधन संवर्धन आणि पुनर्जीवन

**गुण ४००**

**जल हा पृथ्वीवरील जीवनाचा आधार असून एक मौल्यवान नैसर्गिक घटक आहे. गेल्या काही वर्षात पाण्याच्या अयोग्य वापरामुळे आपल्या जलस्रोतांवर ताण पडत आहे. त्यामुळे पाण्याची टंचाई कमी करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने जलयुक्त शिवार अभियानामार्फत जल संसाधन संवर्धनाचे काम हाती घेतले आहे. या निर्देशकाद्वारे जलस्रोतांचे संवर्धन आणि पुनर्जीवन करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांद्वारे करण्यात येणाऱ्या कामांचे परीक्षण करण्यात येईल.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | पाणी पुरवठा व स्वच्छता समिती (WSSC)द्वारे मंजूर केलेल्या जलस्रोतांचा संवर्धन आराखडा. | ५० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान गाळ/शेवाळ/घनकचरा काढून किंवा दुरुस्तीच्या कामाद्वारे पुनर्जीवित केलेल्या अस्तित्वात असलेल्या जलस्रोतांची संख्या (Relative marking) | १०० |
| ३. | विद्यमान जलस्रोतांच्या पुनर्जीवनामुळे पाण्याच्या साठवण क्षमतेमध्ये झालेली वाढ – घनमीटर मध्ये (m3) (Relative Marking) | ५० |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान नव्याने विकसित केलेल्या जलस्रोतांची संख्या | ५० |
| ५. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान विद्यमान जलस्रोतांच्या पुनर्जीवनाद्वारे पाणी साठवण क्षमतेत पडलेली भर (घनमीटरमध्ये) (Relative Marking) | ५० |
| ६. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान कार्यान्वित केलेले एकूण CCT/Deep CCT प्रकल्प (Relative Marking) | ५० |
| ७. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान CCT/Deep CCT प्रकल्पांद्वारे विकसित केलेले पाणलोट क्षेत्र (हेक्टर मध्ये) (Relative Marking) | ५० |

**आवश्यक तपशील:**

- ☐ पाणी पुरवठा व स्वच्छता समिती (WSSC)द्वारे मंजूर केलेल्या जलस्रोतांचा संवर्धन आराखड्याची प्रत.
- ☐ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान गाळ/शेवाळ/ घनकचरा काढून किंवा दुरुस्तीच्या कामाद्वारे पुनर्जीवित केलेल्या जलस्रोतांची संख्या - विहित केलेल्या एक्सेलमध्ये गुगल मॅप लिंक सहित
- ☐ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान तयार केलेले नवीन जल्स्रोतांची संख्या आणि तपशील विहित केलेल्या एक्सेलमध्ये गुगल मॅप लिंक सहित
- ☐ जलस्रोतांचे (घनमीटरमध्ये) - पाणी साठवण क्षमतेत भर - मोजमाप पुस्तिकेची प्रत (Copy of Measurement Book)
- ☐ CCT (Continuous Contour Trench) आणि Deep CCT प्रकल्पांचे तपशील - प्रकल्पांची लांबी (मीटरमध्ये)
- ☐ प्रक्रिया केलेल्या पाणलोट क्षेत्राचा तपशील (हेक्टरमध्ये) मोजमाप पुस्तिकेची प्रत (Copy of Measurement Book)
- ☐ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान केलेल्या कामांचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल- कार्यारंभ आदेश व कार्यपूर्णत्व प्रमाणपत्र.
- ☐ विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- ☐ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |

# ३.१ जल संसाधन संवर्धन आणि पुनर्जीवन










सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत

# ३.२.१ सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग) गुण २००

**रेन वॉटर हार्वेस्टिंग ही घराचे छत (स्लॅब), रस्ते, उद्याने, मैदाने इ. वरील पावसाच्या पाण्याचे संकलन करून साठविण्याची एक सोपी प्रक्रिया आहे. याद्वारे साठविलेले पाणी भूजल पुनर्भरण करण्यासाठी किंवा नंतर वापरण्यासाठी साठविले जाते. रेन वॉटर हार्वेस्टिंग करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी केलेल्या कामांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| | मूल्यमापण कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० आधी आणि दरम्यान स्थापित केलेल्या कार्यरत रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्प असलेल्या सार्वजनिक इमारतींची टक्केवारी | | १०० |
| | १००% | १०० | |
| | ७५% ते १००% | ७५ | |
| | ५०% ते ७५% | ५० | |
| | ५०% पेक्षा कमी | ० | |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० च्या कालावधी दरम्यान साठवलेले पावसाचे पाणी – घन मीटरमध्ये (m3) **(Relative Marking)** | | ५० |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान खाजगी मालमत्ता, पाझर खड्डे आणि कार्यक्षम पाणी वापर यावर RWH च्या जनजागृती उपक्रमांची संख्या. **(Relative Marking)** | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- छतावरील रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्प असणाऱ्या सार्वजनिक इमारतींची यादी - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- रेन वॉटर हार्वेस्टिंग केलेल्या सार्वजनिक इमारतींचे गूगल मॅपवरील स्थान (लोकेशन)
- या निर्देशकासाठी, निवासी इमारती वगळता सार्वजनिक इमारती, कोणत्याही व्यावसायिक किंवा अव्यावसायिक आस्थापना यासह शासकीय इमारती, स्थानिक इमारती, सिनेमागृह/नाट्यगृह, शॉपिंग कॉम्प्लेक्स, रुग्णालये इत्यादींचा समावेश असेल.
- रेन वॉटर हार्वेस्टिंगद्वारे साठविण्यात आलेल्या पाण्याची नोंद - घन मीटरमध्ये (m3: 1m3=1000L)
- स्थानिक स्वराज्य संस्थांद्वारे स्थापित आणि प्रमाणित केलेल्या रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्पांचा मूल्यांकनासाठी समावेश केला जाईल. याची खात्री करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी खालील बाबी लक्षात ठेवाव्या :
  - रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्पांची कार्यरत स्थिती
  - रेन वॉटर हार्वेस्टिंग प्रकल्पांचे पाणलोट क्षेत्र/छत (स्लॅब)
  - गळती/तुटलेले पाईप टाळावेत.
  - परकोलेशन पॉइंटची उपलब्धता
- RWHची विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- रेन वॉटर हार्वेस्टिंग, पाझर खड्डे, विहित एक्सेल नमुन्यात कार्यक्षम पाण्याचा वापर यावरील प्रचारात्मक जनजागृती उपक्रमांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये .
- जनजागृती उपक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता | ६.b: पाणी आणि स्वच्छता व्यवस्थापन सुधारण्यासाठी स्थानिक समुदायांच्या सहभागास समर्थन करून बळकट करणे.<br>६.५: २०३० पर्यंत, सर्व स्तरांवर एकात्मिक जलस्रोत व्यवस्थापनाची अंमलबजावणी करून सीमापार सहकार्याचा समावेश करणे. |
|---|---|---|

# सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग)

रेनवॉटर हार्वेस्टिंग प्रणालीमध्ये पुढील घटकांचा समावेश असतो  (जलशक्ती अभियानाच्या व्याख्यानुसार):




पाणलोट किंवा प्रणाली ज्यात पाणी रोखून साठवले जाते



साठवण सुविधेत पाणी वाहून नेण्यासाठी पाईप्स/नलिकांची प्रणाली



पावसाच्या पाण्याबरोबर वाहून आलेली घाण काढण्यासाठी फिल्टर युनिट



पाणी साठवण्यासाठी टाकी किंवा भूजल पुनर्भरण संरचना

सदर छायाचित्रे  केवळ उदाहरणासाठी दर्शविण्यात आली आहेत .

# पावसाच्या पाण्याची गणना कशी करावी?

रेन वॉटर हार्वेस्टिंगद्वारे वर्षभर साठवलेले पावसाचे पाणी मोजण्याचे सूत्र खालीलप्रमाणे आहे:

जर,

Q = लीटर मध्ये साठवलेल्या पावसाच्या पाण्याचे प्रमाण (घन मीटरमध्ये )

M = सरासरी वार्षिक पाऊस मिली मीटरमध्ये

A = पाणलोट क्षेत्र चौरस मीटरमध्ये

R = भूमिगत गटर प्रणालीमधील अपरिहार्य लहान गळतीमुळे होणारे नुकसान किंवा पुरेसा प्रवाह निर्माण करण्यासाठी खूप हलका पाऊस किंवा अतिवृष्टीमुळे भरून वाहणारे नाले इ. द्वारे वाहून गेलेल्या (रनऑफ) पाण्याचा गुणांक

तर,

पावसाच्या पाण्याचे प्रमाण (जे घन मीटरमध्ये साठवले जाऊ शकते) Q = ‘M’ x ‘A’ x ‘R’

वाहून जाणाऱ्या पाण्याचा (रनऑफ) गुणांक छताच्या सामग्रीच्या प्रकारानुसार बदलतो; सामग्रीचा प्रकार आणि त्यांचे रनऑफ गुणांक खाली दिले आहेत.

| प्रकार | रनऑफ गुणांक |
|---|---|
| गॅल्वनाइज्ड लोखंडी पत्रा | >०.९ |
| (पन्हाळी) धातूची पत्रे | ०.७ ते ०.९ |
| फरशी | ०.८ ते ०.९ |
| काँक्रीट | ०.६ ते ०.८ |
| विटांचा फुटपाथ | ०.५ ते ०.६ |
| दगडी नैसर्गिक पाणलोट | ०.२ ते ०.५ |
| मातीचा उतार | ० ते ०.३ |
| हरित क्षेत्र | ०.०५ ते ०.१ |

# ३.२.१ सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग)










<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत</u>

| ३.२.२ | भूजल पुनर्भरण | गुण २५० |
|---|---|---|

**भूजलावरील मोठ्या प्रमाणात अवलंबित्वामुळे अनेक विहिरी आणि बोअरवेल कोरड्या पडल्या असून त्यांच्या संवर्धनाची गरज निर्माण झाली आहे. भूजल पुनर्भरण विहिरी आणि विंधन विहिरींचे पुनर्जीवन आणि पुनर्भरण करून भूजलाची पातळी वाढवण्यावर लक्ष केंद्रित करते. हे निर्देशक भूजल पुनर्भरण सुनिश्चित करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी घेतलेल्या पुढाकारांचे मूल्यमापन करतो.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | स्थानिक संस्थेतील कार्यरत, अकार्यरत , खाजगी आणि सार्वजनिक विहिरी आणि विंधन विहिरींची संख्या. | | ५० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान पुनर्जीवित/पुनर्भरण केलेल्या अकार्यरत विहिरींची संख्या (Relative Marking) | | ५० |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान पुनर्भरण केलेल्या अकार्यरत विंधन विहिरींची संख्या (Relative Marking) | | ५० |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान नव्याने निर्माण केलेल्या पाझर खड्ड्यांची संख्या (Relative Marking) | | ५० |
| ५. | **अपकीप (Upkeep):** माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान निर्माण करण्यात आलेल्या कार्यरत आणि देखभाल करण्यात येणाऱ्या पाझर खड्ड्यांची संख्या (Relative Marking) | | २० |
| ६. | विहिरी/विंधन विहिरींची टक्केवारी | | ३० |
| | हिरवे कार्ड | ३० | |
| | पिवळे कार्ड | १५ | |
| | लाल कार्ड | ० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेतील सर्व (अकार्यरत /कार्यरत ) खाजगी आणि सार्वजनिक विहिरी आणि विंधन विहिरींची संख्या.
- ❑ पुनर्जीवन /पुनर्भरणासाठी हाती घेतलेल्या प्रकल्पांची संख्या- विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ गुगल मॅपवर प्रकल्पाचे स्थान.
- ❑ विहिरी/विंधन विहिरी पुनर्जीवन /पुनर्भरण प्रकल्पाचे कार्यारंभ आदेश आणि देखभाल अहवाल.
- ❑ विविध टप्प्यांवरील (आधी-दरम्यान-नंतर) जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० आधी आणि दरम्यान निर्माण करण्यात आलेल्या नव्या पाझर खड्ड्यांच्या संख्येचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ पाझर खड्ड्यांचे प्रकल्पाची क्षमता आणि प्रकल्प अहवाल
- ❑ गूगल मॅपवर पाझर खड्ड्यांचे स्थान (लोकेशन).
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.५: २०३० पर्यंत, सर्व स्तरांवर एकात्मिक जलस्रोत व्यवस्थापनाची अंमलबजावणी करून सीमापार सहकार्याचा समावेश करणे.<br>६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |
|---|---|---|

# भूजल पुनर्भरण
# (विहिरी/विंधन विहिर)











विंधन विहिर किंवा अकार्यरत विंधन विहीरीभोवती पुनर्भरण संरचना

**भूजल पुनर्भरण:** व्यवस्थापित भूजल पुनर्भरण हे भूजल पुनर्प्राप्तीसाठी किंवा पर्यावरणीय फायद्यासाठी पाण्याचे उद्देशपूर्ण पुनर्भरण आहे. हे विद्यमान विहिरींमध्ये पाणी सोडणे आणि विंधन विहिरींभोवती योग्य फिल्टर मीडियासह पुनर्भरण खड्डा बांधून केले जाऊ शकते.

***सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.***

# ३.३.१ जल लेखापरीक्षण (वॉटर ऑडिट)

**गुण १५०**

**जल अंदाजपत्रक ही ग्रामपंचायतीमध्ये पाण्याची गरज आणि उपलब्धता मोजण्याची एक पद्धत आहे. सूक्ष्म सिंचन आणि कृषी-हवामान क्षेत्राला अनुरूप पीक पद्धतीचा अवलंब करून कृषी क्षेत्रातील जलवापर कार्यक्षमता सुधारण्यासाठी, स्थानिकांमध्ये प्रसार करण्यासाठी ग्राम कृती आराखड्याचा एक भाग म्हणून जल अंदाजपत्रक आणि लेखापरीक्षण केले जाते. यामुळे स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांच्या क्षेत्रात जलसंधारण करण्यास मदत होते.**

<table>
<tr><th colspan="3">मूल्यमापन कार्यपद्धती</th><th>गुण</th></tr>
<tr><td>१.</td><td colspan="2">पर्जन्यमापक वापरून पावसाचे मोजमाप आणि लॉगबुकमध्ये केलेली नोंद.</td><td>२०</td></tr>
<tr><td>२.</td><td colspan="2">ग्रामपंचायतीने तयार केलेला जल अंदाजपत्रक अहवाल सादर करणे.</td><td>२०</td></tr>
<tr><td>३.</td><td colspan="2">पाण्याच्या अंदाजपत्रकानुसार केलेली कार्यवाही.</td><td>५०</td></tr>
<tr><td rowspan="3">४.</td><td colspan="2">ग्रामपंचायतीच्या पाणी पुरवठा योजनेचे जल लेखापरीक्षण (वॉटर ऑडिट)</td><td>२०</td></tr>
<tr><td>होय</td><td>२०</td><td rowspan="2"></td></tr>
<tr><td>नाही</td><td>०</td></tr>
<tr><td>५.</td><td colspan="2">ग्रामपंचायतीच्या पाणीपुरवठा यंत्रणेच्या लेखापरीक्षणानुसार केलेल्या शिफारशींच्या अंमलबजाणीची टक्केवारी</td><td>४०</td></tr>
</table>

**आवश्यक तपशील :**

- पर्जन्यमापकाव्दारे नोंदवलेल्या पावसाचे प्रमाण - मासिक लॉगबुक
- ग्रामसभेने मंजूर केलेल्या जल अंदाजपत्रकाच्या अहवालाची प्रत
- स्थानिक स्वराज्य संस्थेच्या पाणीपुरवठा यंत्रणेच्या लेखापरीक्षण अहवालाची सामाजिक लेखा परीक्षण किंवा सक्षम प्राधिकाऱ्याद्वारे अधिकृत करण्यात आलेली प्रत
- ग्रामपंचायतीच्या सुचनाफलकावर लावण्यात आलेले जल अंदाजपत्रक – सुचना फलकाची जिओ-टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- जल लेखापरीक्षण आणि शिफारशीच्या अंमलबजावणीसाठीचे कार्यारंभ आदेश.
- जल लेखापरीक्षण पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.४: २०३० पर्यंत, सर्व क्षेत्रांमध्ये पाणी वापर कार्यक्षमतेत लक्षणीय वाढ करून पाण्याची टंचाई दूर करण्यासाठी आणि पाणी टंचाईने ग्रस्त लोकांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करण्यासाठी शाश्वत उपसा आणि गोड्या पाण्याचा पुरवठा सुनिश्चित करणे.<br>६.५: २०३० पर्यंत, सर्व स्तरांवर एकात्मिक जलस्रोत व्यवस्थापनाची अंमलबजावणी करून सीमापार सहकार्याचा समावेश करणे. |
|---|---|---|

# पर्जन्यमापक मार्गदर्शक तत्त्वे

- हवामान खात्याद्वारे देण्यात आलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार विशिष्ट आकारमानाचे भांडे पावसात ठेवावे (१ लीटरच्या प्लास्टिक बाटलीच्या तोंडाकडील निमूळता भाग कापून बाटलीतच उलटा ठेवला, तर असे भांडे तयार होईल.)
- गावामध्ये सर्वत्र समान पाऊस पडतो, त्यामुळे हे भांडे गावात कुठेही ठेवले तरी चालेल.
- त्या भांड्यामध्ये २४ तासामध्ये (किंवा काही ठराविक कालावधीत) साचलेले पावसाचे पाणी मोजावे. (प्लास्टिकची बाटली वापरत असल्यास त्या बाटलीवर मोजपट्टीने ठराविक अंतरावर खुणा करणे आवश्यक आहे. तसेच बाटलीच्या तळाला काही लहान दगड टाकावे, ज्यामुळे बाटली वजनदार होऊन स्थिर उभी राहील व बाटलीचा तळसुद्धा समान होईल).
- या २४ तासामध्ये (किंवा ठराविक कालावधी नंतर) समजा १० मिली मीटर उंची इतके पाणी भांड्यामध्ये (किंवा बाटलीमध्ये) साचले असेल तर गावात १० मिली मीटर पाऊस पडला असे समजले जाते.
- जमिनीवर पडलेले पाणी इकडे तिकडे जाऊ न देता व जमिनीत मुरू न देता जसेच्या तसे पसरवले तर १० मिली मीटर रुंदीचा थर तयार होईल.

**PARTS OF A RAIN GAUGE**

- FUNNEL
- CYLINDER
- COLLECTING BOTTLE
- OUTER CYLINDER





पर्जन्यमापक यंत्र




पुर्नवीनीकरण केलेले पर्जन्यमापक

# पीक जल अंदाजपत्रक (जल अंदाजपत्रकानुसार केलेली क्रिया)

गावच्या पाणलोट विकास समितीने व ग्रामपंचायतने उपलब्ध जलस्रोतांचे मॅपिंग व चर्चा करावी

↓

अक्षय जलस्रोत, मृदाचाचणी, पीक निवड व पीक उत्पादनाचे शेतकऱ्यांसोबत मूल्यांकन

↓

पाणी उपसण्याचा काळ, पाण्याचा वापर, वर्तमान बाजाराचा कल यांचे विश्लेषण आणि पीक नफा व पीक जल अंदाजपत्रक बनवणे

↓

जमिनीची संभाव्य स्थिती व पाण्याचा कार्यक्षम वापर याचा विचार करून प्रचलित नियमानुसार पीक आराखडा तयार करणे.



गावकरी त्यांच्या भागाचा नैसर्गिक स्रोत नकाशा तपासताना. *छायाचित्र सूत्र - WOTR.*




स्थानिक पातळीवर पाण्याचे व्यवस्थापन करण्यासाठी जल अंदाजपत्रक साधन *छायाचित्र सूत्र- WOTR.*

वॉटरशेड सपोर्ट सर्व्हिसेस अँड ॲक्टिव्हिटीज नेटवर्क (WASSAN) आणि वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) यांनी विकसित केलेली पीक पाणी बजेट साधने स्थानिक स्वराज्य संस्थांद्वारे वापरली जाऊ शकतात.

संदर्भ - https://www.wassan.org/wp-content/uploads/2022/03/Crop_Water_Budgeting.pdf
https://wotr-website-publications.s3.ap-south-1.amazonaws.com/Water_Budgeting_Brochure_English.pdf

सूत्र: How to facilitate "Crop Water Budgeting" by Watershed Communities, A Process guide by WASSAN.

# ३.३.२ पाणीपुरवठा यंत्रणेत पाण्याचे मोजमाप (Water Metering)

**गुण १००**

पाणी मीटरिंग आवश्यक आहे कारण यामुळे पाण्याचा अचूक वापर मोजता येतो, गळती ओळखता येते आणि बचत करता येते. वापरावर आधारित बिलिंगमुळे नागरिक अधिक जबाबदारीने पाणी वापरतात. यामुळे पाणीटंचाईच्या भागात पाणी व्यवस्थापन सुधारते आणि पाण्याचा अपव्यय टाळता येतो. मीटरिंग ही जलसंवर्धनासाठी प्रभावी आणि आवश्यक पायरी आहे. हे निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये पुरवल्या जाणाऱ्या पाण्याच्या मोजमापावर मूल्यांकन करते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | जलशुद्धीकरण केंद्रात कार्यरत पाण्याचे मीटर आहे का? | | २० |
| | होय | २० | |
| | नाही | ० | |
| २. | उच्च जलधारण टाक्यांवर (OHT) कार्यरत पाण्याच्या मीटरची टक्केवारी | | ३० |
| | ९०% आणि अधिक | ३० | |
| | ५०% - ९०% | १५ | |
| | ५०% पेक्षा कमी | ० | |
| ३. | घरे आणि मोठ्या प्रमाणात वापरकर्ते (व्यावसायिक/संस्थात्मक) येथे कार्यरत पाण्याच्या मीटरची टक्केवारी | | ५० |
| | ९०% आणि अधिक | ५० | |
| | ७०%-९०% | ४० | |
| | ५०%-७०% | ३० | |
| | ५०% पेक्षा कमी | ० | |

**आवश्यक तपशील :**

- ❑ जलशुद्धीकरण केंद्र (WTP), उच्च जलधारण टाकी (OHT) येथे घेतलेल्या पाण्याच्या मीटर रीडिंग्सची नोंदवही.
- ❑ घाऊक/मोठ्या प्रमाणात वापरकर्त्यांचे पाणीबिल व घरगुती पाणीपट्टी संकलनाचा सारांश.
- ❑ WTP, OHT व घाऊक/मोठ्या प्रमाणात वापरकर्त्यांकडे बसवलेल्या जलमीटरची माहिती - Excel शीट.
- ❑ गुगल मॅपवर कार्यरत घरगुती जलमीटरचे स्थान.
- ❑ प्रकल्पांची भौतिक व आर्थिक प्रगती याचा संक्षिप्त अहवाल.
- ❑ WTP, OHT व घाऊक/ मोठ्या प्रमाणात वापरकर्त्यांकडे कार्यरत जलमीटरचे भू-टॅग केलेले (1 ते 2 MB आकाराचे) छायाचित्र.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| 6 CLEAN WATER AND SANITATION | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.१: २०३० पर्यंत, सर्वांसाठी सुरक्षित आणि परवडणाऱ्या पिण्याच्या पाण्याचा सार्वत्रिक आणि समान सुविधा निर्माण करणे.<br>६.४: २०३० पर्यंत, सर्व क्षेत्रांमध्ये पाणी वापर कार्यक्षमतेत लक्षणीय वाढ करून पाण्याची टंचाई दूर करण्यासाठी आणि पाणी टंचाईने ग्रस्त लोकांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करण्यासाठी शाश्वत उपसा आणि गोड्या पाण्याचा पुरवठा सुनिश्चित करणे. |
|---|---|---|

# ३.४ पाणीपुरवठा व सांडपाण्याचे नियोजन

**गुण २५०**

पिण्यासाठी शुद्ध आणि सुरक्षित पाणी उपलब्ध असणे जीवनासाठी अत्यावश्यक आहे आणि पिण्यायोग्य पाणी मिळणे हा प्रत्येक नागरिकाचा मूलभूत अधिकार आहे. परंतु, बऱ्याच घरांमध्ये नळाद्वारे पाणीपुरवठा होत नसल्याने आरोग्याच्या अनेक समस्या उद्धवतात. भारत सरकार स्वच्छ भारत अभियानामार्फत ग्रामीण भागात सांडपाण्याची प्रक्रिया व पुनर्वापरास प्रोत्साहन देते. स्थानिक स्वराज्य संस्थेमधील किती घरांमध्ये नळाद्वारे पाणीपुरवठा करण्यात येत आहे आणि सांडपाणी व्यवस्थापनासाठी केलेल्या उपाययोजना किती परिणामकारक आहेत, हे या निर्देशकाद्वारे तपासण्यात येते.

| | मुल्यामापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | नळाद्वारे पाणीपुरवठा असलेल्या घर व शिक्षण संस्थांची टक्केवारी (Relative Marking) | | ५० |
| २. | ग्रामपंचायतीला मिळालेले हर घर जल प्रमाणपत्र | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| ३. | नळ जल मित्रांची निवड व प्रशिक्षण | | ५० |
| ४. | कार्यरत सार्वजनिक सांडपाणी प्रक्रिया केंद्र | | ५० |
| | होय | ५० | |
| | नाही | ० | |
| ५. | पाण्याच्या पुनर्वापराची टक्केवारी (Relative Marking) | | ५० |
| | ७५% पेक्षा अधिक | ५० | |
| | ५०%- ७५% | ४० | |
| | २५%-५०% | ३० | |
| | २५%पेक्षा कमी | ० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ घरे व  शिक्षण संस्थांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेमधील नळाद्वारे पाणी पुरवठा केल्या जाणाऱ्या एकूण कुटुंब, शाळा आणि अंगणवाडी केंद्रांची संख्या – जल जीवन मिशन पोर्टलवरील प्रत.
- ❑ हर घर जल प्रमाणपत्राची प्रत
- ❑ नळ जल मित्र प्रशिक्षण अहवालाची प्रत
- ❑ सांडपाणी प्रक्रिया केंद्राचे लोकेशन- गुगल मॅप लिंक
- ❑ जिओटॅग केलेली छायाचित्रे (size १ ते २ MB)
- ❑ प्रक्रिया यंत्रणेचा आराखडा व तंत्रज्ञानाची प्रत
- ❑ भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल.
- ❑ पाण्याचे संकलन, प्रक्रिया व पुनर्वापराचा तपशील दर्शविणारे लॉगबुक
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| 6 CLEAN WATER AND SANITATION | **SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता** | ६.१: २०३० पर्यंत, सर्वांसाठी सुरक्षित आणि परवडणाऱ्या पिण्याच्या पाण्याचा सार्वत्रिक आणि समान सुविधा निर्माण करणे.<br>६.४: २०३० पर्यंत, सर्व क्षेत्रांमध्ये पाणी वापर कार्यक्षमतेत लक्षणीय वाढ करून  पाण्याची टंचाई दूर करण्यासाठी आणि पाणी टंचाईने ग्रस्त लोकांची संख्या लक्षणीयरीत्या कमी करण्यासाठी शाश्वत उपसा आणि गोड्या पाण्याचा पुरवठा सुनिश्चित करणे. |
|---|---|---|

| ३.५ | शाश्वत सणांचा प्रचार | गुण २०० |
|---|---|---|

**नद्या, तलाव, खाचर, खाडी, किनारपट्टया, विहिरी इत्यादी जलाशयांमध्ये मूर्तींचे विसर्जन केले जाते, यामुळे जल प्रदूषण होते. पर्यावरण संरक्षण करून प्रदूषणावर नियंत्रण ठेवून सण साजरे करणे आवश्यक आहे. मूर्ती विसर्जनामुळे होणारे जल प्रदूषण कमी करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी आयोजित केलेल्या उपक्रमांचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १ . | पर्यावरणपुरक मूर्ती आणि विसर्जनाचा प्रचार करण्यासाठी घेण्यात आलेल्या प्रचारात्मक कार्यक्रमांची संख्या (Relative Marking) | ५० |
| २. | निर्माण करण्यात आलेल्या कृत्रिम विसर्जन स्थळांची संख्या (Relative Marking) | ३० |
| ३. | स्थापना करण्यात आलेल्या पर्यावरणपूरक मूर्तींची टक्केवारी (Relative Marking) | २० |
| ४. | विसर्जनाच्या आधी आणि नंतर निर्माल्याचे संकलन, विलगीकरण, वाहतूक आणि प्रक्रिया | ५० |
| ५. | जमा केलेल्या पर्यावरणपूरक साहित्याच्या पुनर्वापराची टक्केवारी (Relative Marking) | ५० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ प्रचार आणि प्रसार कार्यक्रमांच्या (पर्यावरणपूरक मूर्ती, कृत्रिम विसर्जन स्थळ, शाडू/चिकणमाती पुनर्वापरासाठी देणे) संख्येचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ सामाजिक माध्यमांमधून पर्यावरणपूरक (इको-फ्रेंडली) उपक्रमांचा प्रचार करणाऱ्या सोशल मिडिया पोस्ट्ची लिंक - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ एकूण स्थापना करण्यात आलेल्या पर्यावरणपुरक मूर्तींची संख्या (सार्वजनिक आणि घरगुती)
- ❑ निर्माण करण्यात आलेल्या कृत्रिम विसर्जन स्थळांची एकूण संख्या आणि स्थान यांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ शाडू//चिकणमाती /ओला कचऱ्याचे संकलन, विलगीकरण, प्रक्रिया आणि पुनर्वापर याविषयी सविस्तर अहवाल
- ❑ पर्यावरणपूरक विसर्जनाचा प्रचार आणि प्रसार उपक्रमांची (पथनाट्ये, समाज माध्यमांवर प्रचार, निवासी संकुल व उत्सव समित्यांना मार्गदर्शक तत्वे सांगणे, विसर्जनानंतर शाडू/चिकणमाती पुनर्वापरास देणे, इ. ) - जिओ-टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- ❑ प्रचार आणि प्रसार उपक्रमांमध्ये लावण्यात येणाऱ्या बॅनरवर उपक्रमाचा दिनांक आणि ठिकाणासह माझी वसुंधरा अभियान ६.० ची पार्श्वभूमी असणे आवश्यक आहे.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| 6 CLEAN WATER AND SANITATION | SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता | ६.b: पाणी आणि स्वच्छता व्यवस्थापन सुधारण्यासाठी स्थानिक समुदायांच्या सहभागास समर्थन करून बळकट करणे. |
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |

## ३.५ शाश्वत सणांचा प्रचार













<u>सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत</u>

| ३.६ | जलचर परिसंस्थेचे संवर्धन | गुण १०० |
|---|---|---|

**जल परिसंस्था ही जलचक्राचा एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. ही परिसंस्था प्रदूषक हटविणे, पूरपाण्याचा साठवणूक करणे आणि सूक्ष्म हवामान नियंत्रण यामध्ये मदत करते. वाढते जलतापमान आणि शहरीकरणाच्या क्रिया या परिसंस्थेवर विपरीत परिणाम करत आहेत. हा निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांनी जल परिसंस्थेच्या संवर्धनासाठी हाती घेतलेल्या उपाययोजनांचे मूल्यमापन करतो.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | योग्य मासेमारी पद्धती आणि स्थानिक जलचर प्रजातींचे संरक्षण करण्यासाठी आयोजित केलेल्या जनजागृती उपक्रमांची संख्या. | | ३० |
| २. | स्थानिक  स्वराज्य संस्थेत मत्स्यपालन प्रयोगशाळा/शेती आहेत का? | | २० |
| | होय | २० | |
| | नाही | ० | |
| ३. | पाणथळ क्षेत्रांचे संक्षिप्त दस्तऐवज तयार करणे | | ५० |

❑ **आवश्यक तपशील:**

❑ प्रचार आणि प्रसार कार्यक्रमांच्या संख्येचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये

❑ मत्स्यपालन प्रयोगशाळा/शेतीचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये

❑ पाणथळ जमीन (संवर्धन आणि व्यवस्थापन) नियम-२०१७ नुसार पाणथळ जमिनीच्या संक्षिप्त दस्तऐवजाची प्रत.

❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

❑ अधिक माहितीसाठी :

१) https://moef.gov.in/wp-content/uploads/2020/01/final-version-and-printed-wetland-guidelines-rules-2017-04.01.20.pdf

२) https://moef.gov.in/wp-content/uploads/2019/09/Wetlands2017.pdf

| | | |
|---|---|---|
| | SDG ६. स्वच्छ पाणी व स्वच्छता | ६.६: पर्वत, जंगले, पाणथळ जागा, नद्या, जलचर आणि तलावांसह पाण्याशी संबंधित परिसंस्थांचे संरक्षण आणि पुनर्संचय करणे. |
| | SDG १५. जमिनीवरील जीवन | १५.१ : आंतरराष्ट्रीय करारांच्या बंधनांनुसार स्थानिक आणि अंतर्देशीय गोड्या पाण्याच्या साठ्यांचे संवर्धन, पुनर्संचयित आणि शाश्वत वापर आणि त्यांच्या सेवा, विशेषत: जंगले, पाणथळ प्रदेश, पर्वत आणि कोरडवाहू यांच्या संवर्धनाची खात्री करणे. |

| ३.७ | पंचायत प्रगती निर्देशांक | गुण १०० |
|---|---|---|

**पंचायत प्रगती निर्देशांक (PAI) हा एक संमिश्र निर्देशांक आहे जो शाश्वत विकास उद्दिष्टे (SDGs) साध्य करण्यासाठी पंचायतींच्या कामगिरीचे मूल्यमापन करतो. पंचायत प्रगती निर्देशांक (PAI) पर्यावरणीय शाश्वतता आणि पायाभूत सुविधांसह नऊ विषयांचा विचार करते. हे निर्देशक स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सर्वांगीण विकासाचे आणि कामगिरीचे मूल्यांकन करते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | पंचायत **प्रगती** निर्देशांकात (PAI) मिळालेली श्रेणी | | १०० |
| | श्रेणी अ+(९०% पेक्षा अधिक) | १०० | |
| | श्रेणी अ (७५-९०% मध्ये) | ८० | |
| | श्रेणी ब (६०-७५% मध्ये) | ६० | |
| | श्रेणी क (४०-६०% मध्ये) | ४० | |
| | श्रेणी ड (४०% पेक्षा कमी) | ० | |

**आवश्यक तपशील:**

- पंचायत **प्रगती** निर्देशांक (PAI) प्रमाणपत्राची प्रत.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG ८. सभ्य रोजगार आणि आर्थिक वाढ** | ८.३ : उत्पादक क्रियाकलाप, सभ्य रोजगार निर्मिती, उद्योजकता, सर्जनशीलता आणि नवकल्पना यांना समर्थन देणाऱ्या विकासाभिमुख धोरणांना प्रोत्साहन देऊन वित्तीय सेवांमध्ये प्रवेशासह सूक्ष्म, लघु आणि मध्यम-आकाराच्या उद्योगांच्या औपचारिकीकरण आणि वाढीस प्रोत्साहन देणे. |
|---|---|---|

## ४ अग्नि

| अ/क्र. | कृती बिंदु | गुण |
| --- | --- | --- |
| **४.१** | **नुतनीकरणयोग्य ऊर्जा स्रोत आणि निव्वळ शून्य कार्बन उत्सर्जनाबाबत प्रसार व प्रचार** | ४०० |
| **४.२** | **कार्बन उत्सर्जन कमी असलेल्या उर्जा स्त्रोतांचा अवलंब** | |
| ४.२.१ | हरित पथदिवे | २०० |
| ४.२.२ | सार्वजनिक आणि खाजगी इमारतींवर सौर ऊर्जा प्रकल्प बसवणे | ५०० |
| ४.२.३ | अक्षय ऊर्जेचा स्त्रोत म्हणून बायोगॅस संयंत्रे | ३०० |
| ४.२.४ | सोलार (सौर) पंप | २०० |
| ४.२.५. | विकेंद्रित सौर ऊर्जा संयंत्रे | २०० |
| | **एकूण** | **१,८००** |

# ४.१ नुतनीकरणयोग्य ऊर्जा स्त्रोत आणि निव्वळ शून्य कार्बन उत्सर्जनाबाबत प्रसार व प्रचार

**गुण ४००**

**कोळसा, जीवाश्म इंधन इत्यादी उर्जेचे पारंपारिक स्त्रोत आहेत. या इंधनाच्या ज्वलनामुळे प्रदूषण होते व हे स्त्रोत पुन्हा मिळवता येणारे नाहीत. याउलट नुतनीकरणयोग्य ऊर्जा ही नैसर्गिक स्त्रोतांपासून मिळविली जाते आणि ती पर्यावरणासाठी सुरक्षित देखील आहे. त्यामुळे पर्यावरणाच्या हितासाठी अक्षय ऊर्जेच्या वापराला प्रोत्साहन दिले पाहिजे कारण आपण आपल्या निव्वळ शून्य वचनबद्धतेकडे वाटचाल करत आहोत. या निर्देशकामध्ये, नुतनीकरणयोग्य ऊर्जेच्या वापराला प्रोत्साहन देण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी आयोजित केलेल्या जनजागृती उपक्रमांच्या आधारे मूल्यमापन केले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान नुतनीकरणयोग्य उर्जा आणि निव्वळ शून्य संदर्भात जनजागृती कार्यक्रमांची संख्या | | ४०० |
| | माझी वसुंधरा अभियाना ६.० ची पहिली तिमाही (एप्रिल - जून) **(Relative Marking)** | १०० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची दुसरी तिमाही (जुलै – सप्टेंबर) **(Relative Marking)** | १०० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची तिसरी तिमाही (ऑक्टोबर – डिसेंबर) **(Relative Marking)** | १०० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची चौथी तिमाही (जानेवारी - मार्च) **(Relative Marking)** | १०० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थांद्वारे आयोजित जनजागृती उपक्रमांची संख्या - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ नागरिकांच्या सहभागाचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ माझी वसुंधरा अभियान संचालनालयाने जारी केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार आयोजित केलेल्या जनजागृती उपक्रमांचा मूल्यांकनासाठी विचार केला जाईल.
- ❑ प्रचारात्मक उपक्रमांमध्ये पुढील गोष्टींचा देखील समावेश होतो; सौर स्थापना, सौर बंब आणि इतर प्रकारचे अक्षय ऊर्जा स्रोत आणि निव्वळ शून्य.
- ❑ उपक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| SDG ७. सुलभ आणि स्वच्छ ऊर्जा | ७.१: २०३० पर्यंत, परवडणाऱ्या, विश्वासार्ह आणि आधुनिक ऊर्जा सेवांचा सार्वत्रिक प्रवेश सुनिश्चित करणे.<br>७.२: २०३० पर्यंत, जागतिक ऊर्जा मिश्रणात अक्षय ऊर्जेचा वाटा लक्षणीयरीत्या वाढवणे. |
|---|---|

# अक्षय ऊर्जा

## अक्षय ऊर्जा

अक्षय ऊर्जा ही नैसर्गिक स्तोतांपासून उत्पादित होते जी वापराच्या अधिक पटीने निर्मित होते. ही संसाधने अमर्यादित आहेत. अक्षय ऊर्जेचा वापर हा वीज निर्मितीसाठी, जागा वातानुकुलीत करण्यासाठी, पाणी गरम/थंड करणे आणि वाहतुकीसाठी केला जाऊ शकतो.




# Net Zero (निव्वळ शून्य )

## Net zero (निव्वळ शून्य )

- निव्वळ शून्य हे हरितगृह वायूंचे उत्पादन आणि वातावरणातून काढून टाकलेल्या हरितगृह वायूंचे प्रमाण यांच्यातील संतुलन आहे. निव्वळ शून्य लक्ष्य गाठण्यासाठी कार्बन निर्मुलनाच्या प्रक्रियेद्वारे हरितगृह वायूंचे उत्सर्जन कमी करून त्यांना वातावरणातून काढून टाकले जाते.
- भारताने २०७० पर्यंत निव्वळ शून्य गाठण्याचे लक्ष्य जाहीर केले आहे.
- भारताने २०३० पर्यंत हरितगृह वायूंच्या उत्सर्जनाचे GDP अंतर्गत उत्पादनाचे प्रमाण २००५ च्या पातळीच्या ४५% पर्यंत कमी करण्यासाठी वचनबद्धता दर्शवली आहे.
- भारताने २०३० पर्यंत त्याच्या एकूण विद्युत उर्जा क्षमतेपैकी ५०% अपारंपारिक इंधन-आधारित ऊर्जा संसाधनांमधून स्थापित करण्यास वचनबद्धता दर्शवली आहे.

# ४.१ नुतनीकरणयोग्य ऊर्जा स्त्रोत आणि निव्वळ शून्य संदर्भात प्रचारात्मक आणि जनजागृती उपक्रम







*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

# ४.२.१ हरित पथदिवे

**गुण २००**

**हरित** पथदिवे बसवल्यामुळे वीज बचत होते व स्थानिक स्वराज्य संस्थेचे कार्बन फूटप्रिंट देखील कमी होते. यामुळे एचपीएस(HPS) बल्ब ऐवजी **हरित** पथदिवे बसविणे पर्यावरण संरक्षणाच्या दृष्टीने महत्वाचे पाऊल आहे. या निर्देशकामध्ये, स्थानिक स्वराज्य संस्थांनी सर्व पथदिव्यांचे **हरित** पथदिव्यांमध्ये रूपांतर करण्यासाठी घेतलेल्या पुढाकाराचे मूल्यमापन केले जाते.

| मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|
| १. | एकूण पथदिव्यांपैकी एलईडी पथदिव्यांची टक्केवारी | ५० |
| २ | एकूण पथदिव्यांपैकी सौर पथदिव्यांची टक्केवारी | १५० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेतील पथदिव्यांची संख्या
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेतील हरित पथदिव्यांची संख्या
- ❑ पथदिवे बदलल्यामुळे होणाऱ्या ऊर्जाबचतीचा अहवाल - जसे की, दिवे बदलण्या आधीची व नंतरची वीज बिलाची प्रत.
- ❑ भौतिक आणि आर्थिक प्रगती अहवाल
- ❑ पथदिवे बसवण्यासाठी देण्यात आलेल्या कार्यारंभ आदेशाची प्रत.
- ❑ आधी आणि नंतरची छायाचित्रे ( Size १ ते २ MB)
- ❑ गुणांचे वितरण हरित पथदिव्यांच्या टक्केवारीवर आधारित आहे. उदाहरणार्थ;
    - ५० टक्के एलईडी पथदिव्यांसाठी
    - १०० टक्के सौर पथदिव्यांसाठी १५० गुण.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत

| | SDG ७. सुलभ आणि स्वच्छ ऊर्जा | ७.१: २०३० पर्यंत, परवडणाऱ्या, विश्वासार्ह आणि आधुनिक ऊर्जा सेवांचा सार्वत्रिक प्रवेश सुनिश्चित करणे.<br><br>७.२: २०३० पर्यंत, जागतिक ऊर्जा मिश्रणात अक्षय ऊर्जेचा वाटा लक्षणीयरीत्या वाढवणे. |
|---|---|---|

## ४.२.१ हरित पथदिवे











<u>*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*</u>

# ४.२.२ सार्वजनिक आणि खाजगी इमारतींवर सौर ऊर्जा प्रकल्प बसवणे

**गुण ५००**

**पारंपारिक ऊर्जेच्या विरूद्ध नूतनीकरण योग्य ऊर्जेच्या वापराकडे संक्रमण करून, स्थानिक स्वराज्य संस्था आपल्या राष्ट्राला २०७० पर्यंत निव्वळ शून्य लक्ष्य आणि २०४७ पर्यंत ऊर्जा स्वातंत्र्याचे लक्ष्य पूर्ण करण्यात मदत करू शकतात. या निर्देशकामध्ये, माझी वसुंधरा अभियान ५.० दरम्यान सौर ऊर्जा आणि नूतनीकरण योग्य ऊर्जा स्थापनांच्या संचयी क्षमतेवर आधारित स्थानिक स्वराज्य संस्थांचे मूल्यमापन केले जाईल.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६ .० मध्ये सौर प्रकल्पांची एकूण क्षमता (किलोवॅटमध्ये) **(Relative Marking)** | | ३०० |
| | सार्वजनिक इमारती | १०० | |
| | सार्वजनिक सेवा पायाभूत सुविधा | १०० | |
| | खाजगी इमारती | १०० | |
| २ | अपकीप (Upkeep):<br>माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान बसवण्यात आलेल्या सौर प्रकल्पांची एकूण क्षमता किलोवॅट (kW) मध्ये. **(Relative Marking)** | | ५० |
| ३. | स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रात बसवण्यात आलेल्या सौर वॉटर हीटरची एकूण क्षमता - लिटर प्रतिदिन (LPD) **(Relative Marking)** | | ५० |
| ४. | अक्षय ऊर्जा प्रकल्पांची क्षमता (किलोवॅटमध्ये) **(Relative Marking)** | | १०० |
| | कार्यान्वित आणि कार्यरत | १०० | |
| | निविदा मागवण्यात आल्या आहेत | ५० | |

**आवश्यक तपशील:**

- ❑ सार्वजनिक आणि खाजगी इमारतींचा तपशील- विहित केलेल्या एक्सेल मध्ये.
  - सौर प्रकल्प असणारे छत
  - इमारत संकुलांमध्ये सौर उर्जेची स्थापना
  - सौर वॉटर हीटर
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये अक्षय ऊर्जा प्रकल्पांचा तपशील- विहित केलेल्या एक्सेल मध्ये
- ❑ संकुलांमध्ये अक्षय सौर प्रकल्प बसविल्यामुळे ऊर्जाबचत अहवाल, जसे की - आधी आणि नंतरचे वीज बिल (सौर प्रकल्प असणारे छत/सौर प्रकल्प )
- ❑ सर्व नूतनीकरण योग्य ऊर्जा प्रकल्पांसाठी कार्यान्वित प्रमाणपत्राची प्रत.
- ❑ या निर्देशकासाठी, निवासी इमारती वगळता सार्वजनिक इमारती, कोणत्याही व्यावसायिक किंवा अव्यावसायिक आस्थापना यासह शासकीय इमारती, स्थानिक इमारती, शॉपिंग कॉम्प्लेक्स, रुग्णालये इत्यादींचा समावेश असेल.
- ❑ सौर प्रकल्पांचे जिओटॅग केलेले छायाचित्र (आधी आणि नंतर) (Size १ ते २ MB)
- ❑ ***टीप- मूल्यमापन कार्यापाढती अंक १,२ आणि ३ मध्ये नमूद केलेल्या सौर प्रकल्पांचा अंक ४ मध्ये विचार केला जाणार नाही***
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ७. सुलभ आणि स्वच्छ ऊर्जा** | ७.१: २०३० पर्यंत, परवडणाऱ्या, विश्वासार्ह आणि आधुनिक ऊर्जा सेवांचा सार्वत्रिक प्रवेश सुनिश्चित करणे.<br>७.२: २०३० पर्यंत, जागतिक ऊर्जा मिश्रणात अक्षय ऊर्जेचा वाटा लक्षणीयरीत्या वाढवणे. |

# अक्षय ऊर्जा प्रकल्पांचे प्रकार

अक्षय ऊर्जा प्रकल्प ऊर्जा निर्माण करण्यासाठी शाश्वत संसाधने वापरतात, जसे की सूर्यप्रकाश, वारा, भूऔष्णिक ऊर्जा, पाऊस, भरती आणि बायोमास. अक्षय ऊर्जा प्रकल्पांमध्ये हे समाविष्ट आहे:



**एकाग्रीत सौर पॅनेल**



**फोटोव्होल्टाइक्स**



**पवन ऊर्जा**



**बायोगॅस/बायोमास**



**लघु जलविद्युत प्रकल्प**

# ४.२.२ सार्वजनिक आणि खाजगी इमारतींवर सौर ऊर्जा प्रकल्प बसवणे













*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

| ४.२.३ | जैव वायू प्रकल्प (बायोगॅस प्लांट) - अक्षय ऊर्जेचा स्त्रोत | गुण ३०० |
|---|---|---|

**बायोगॅस हा मुख्यत: ग्रामीण भागात वापरला जाणारा प्रदूषणविरहित उर्जेचा स्त्रोत आहे. या उर्जेच्या वापरामुळे सभोवतालच्या हवेची गुणवत्ता सुधारते आणि हरितगृह (ग्रीन हाऊस) वायूचे उत्सर्जन टाळले जाते. बायोगॅसचा वापर करून स्थानिक स्वराज्य संस्थांनी पारंपरिक ऊर्जा स्त्रोतांवरील अवलंब कसे कमी केले आहे, हे या निर्देशकाद्वारे तपासले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान बसविण्यात आलेल्या आणि कार्यरत असलेल्या बायोगॅस प्रकल्पांची संख्या (Relative Marking) | १५० |
| २. | माझी वसुंधरा अभियान १.०, २.०, ३.०, ४.०, ५.० आणि ६.० दरम्यान स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये बसविण्यात आलेल्या आणि कार्यरत असलेल्या बायोगॅस प्रकल्पांची एकूण क्षमता (घन मीटर प्रतिदिन) (Relative Marking) | १५० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान बसवलेल्या आणि सुस्थितीत असलेल्या बायो-गॅस प्रकल्पांच्या संख्येचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये बसवलेल्या व कार्यरत स्थितीत असणाऱ्या बायोगॅस प्रकल्पांची एकूण क्षमता (माझी वसुंधरा अभियान ६.० पूर्वी बसवलेल्या बायोगॅस प्रकल्पांसह) - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ भौतिक आणि आर्थिक प्रगती अहवाल
- ❑ गुगल मॅपवर बायोगॅस प्रकल्पांचे स्थान
- ❑ बायोगॅस प्रकल्पांची जिओ टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ७. सुलभ आणि स्वच्छ ऊर्जा** | ७.१: २०३० पर्यंत, परवडणाऱ्या, विश्वासार्ह आणि आधुनिक ऊर्जा सेवांचा सार्वत्रिक प्रवेश सुनिश्चित करणे.<br>७.२: २०३० पर्यंत, जागतिक ऊर्जा मिश्रणात अक्षय ऊर्जेचा वाटा लक्षणीयरीत्या वाढवणे. |

| ४.२.४ | सौर पंप | गुण २०० |
|---|---|---|

**सौर पंप हा वीज किंवा डिझेलवरील अवलंबित्व कमी करून इंधनावर आवर्ती खर्च कमी करतो. ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या क्षेत्रात सौर पंपांचा वापर वाढवण्यासाठी हा निर्देशक प्रोत्साहन देतो.**

| मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान वैयक्तिक आणि सामुदायिक ठिकाणी बसवलेल्या सौर पंपांची **संख्या**<br>(Relative Marking) | ५० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान वैयक्तिक आणि सामुदायिक ठिकाणी नव्याने स्थापित केलेल्या सौर पंपाची **क्षमता** (Relative Marking) | ५० |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० पूर्वी वैयक्तिक किंवा सामुदायिक ठिकाणी बसवलेल्या सौर पंपांची एकूण **संख्या**<br>(Relative Marking) | ५० |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० पूर्वी वैयक्तिक आणि सामुदायिक ठिकाणी स्थापित केलेल्या सौर पंपाची **क्षमता** (Relative Marking) | ५० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० पूर्वी आणि दरम्यान बसवलेल्या सौर पंपांचा तपशील – विहित केलेल्या एक्सेल मध्ये
- ❑ भौतिक आणि आर्थिक प्रगती अहवाल.
- ❑ कार्यरत असलेले सौर पंप मूल्यमापनासाठी विचारात घेतले जातील.
- ❑ कार्यरत असणाऱ्या सौर पंपांची जिओ टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | **SDG ७. सुलभ आणि स्वच्छ ऊर्जा** | ७.१: २०३० पर्यंत, परवडणाऱ्या, विश्वासार्ह आणि आधुनिक ऊर्जा सेवांचा सार्वत्रिक प्रवेश सुनिश्चित करणे.<br><br>७.२: २०३० पर्यंत, जागतिक ऊर्जा मिश्रणात अक्षय ऊर्जेचा वाटा लक्षणीयरीत्या वाढवणे. |
|---|---|---|

| ४.२.५ | विकेंद्रित सौर ऊर्जा संयंत्र | गुण २०० |
|---|---|---|

सौर ऊर्जा संयंत्राच्या (प्रकल्प) मदतीने सूर्यप्रकाशाचे विद्युत उर्जेमध्ये रूपांतर केले जाते. विकेंद्रित सौर संयंत्रांचा उद्देश कृषी ग्राहकांना दिवसा वीज पुरवठा करणे हा आहे. २०२५ पर्यंत ३०% फीडर सौर उर्जेवर आणण्याचे महाराष्ट्र शासनाचे उद्दिष्ट आहे. 'मिशन-२०२५' अंतर्गत ७००० मेगावॅट्सचे (MW) विकेंद्रित सौर प्रकल्प जलद गतीने लावण्याचे शासनाचे ध्येय आहे. ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थाना सौर उर्जेचा वापर करण्यास हा निर्देशक प्रोत्साहित करतो.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान स्थापित केलेल्या विकेंद्रित सौर ऊर्जा प्रकल्पांची क्षमता (मेगा वॅट मध्ये) (Relative Marking) | १०० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० पूर्वी स्थापित केलेल्या विकेंद्रित सौर ऊर्जा प्रकल्पांची क्षमता (मेगा वॅट मध्ये) (Relative Marking) | १०० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० च्या पूर्वी आणि दरम्यान स्थापित सौर प्रकल्पांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये
- ❑ कार्यरत स्थितीतील विकेंद्रित सौर उर्जा प्रकल्प मूल्यमापनासाठी विचारात घेतले जातील.
- ❑ विकेंद्रित सौर ऊर्जा प्रकल्पचा काम पूर्ण झाल्याच्या प्रमाणपत्राची प्रत.
- ❑ भौतिक आणि आर्थिक प्रगती अहवाल.
- ❑ कार्यरत स्थितीत असणाऱ्या विकेंद्रित सौर प्रकल्पांची जिओ टॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| SDG ७. सुलभ आणि स्वच्छ ऊर्जा | ७.१: २०३० पर्यंत, परवडणाऱ्या, विश्वासार्ह आणि आधुनिक ऊर्जा सेवांचा सार्वत्रिक प्रवेश सुनिश्चित करणे.<br>७.२: २०३० पर्यंत, जागतिक ऊर्जा मिश्रणात अक्षय ऊर्जेचा वाटा लक्षणीयरीत्या वाढवणे. |
|---|---|

# माझी वसुंधरा अंतर्गत महाराष्ट्रात सौर पॅनेलची स्थापना





नगर परिषद कराड - महाराष्ट्रात विकेंद्रित सौर पॅनेलची अंमलबजावणी

# माझी वसुंधरा अंतर्गत महाराष्ट्रात सौर पॅनेलची स्थापना





नगर परिषद कराड - महाराष्ट्रात विकेंद्रित सौर पॅनेलची अंमलबजावणी

| ५ | आकाश |
|---|---|

| अ. क्र. | कृती बिंदु | गुण |
|---|---|---|
| | **सुधारणा** | |
| ५. १ | ई-प्लेज (#Epledge) नोंदणी आणि पूर्तता | ६०० |
| ५. २ | सोशल मीडियाचा वापर करून माझी वसुंधरा अभियानाची जनजागृती करणे | ४०० |
| ५. ३ | स्पर्धा आणि जनजागृती उपक्रमांद्वारे माझी वसुंधरा अभियानाची जनजागृती करणे | ४०० |
| ५. ४ | तरुणांचा सहभाग आणि पर्यावरण दूतांची निवड | ३०० |
| ५. ५ | सार्वजनिक ठिकाणी माझी वसुंधरा तत्त्वे दर्शवणाऱ्या बाबींच्या माध्यमातून प्रचार आणि प्रसिध्दी | ८०० |
| ५. ६ | बचत गटांचा सहभाग | १०० |
| ५.७ | पर्यायी निधी मिळवण्याचे मार्ग : CSR, सामुदायिक सहभाग व इतर | २०० |
| ५.८ | निसर्गपर्यटन (Ecotourism) | १०० |
| | **शिक्षण** | |
| ५.९ | पर्यावरण सेवा योजनेत शाळांचा सहभाग | २०० |
| ५.१० | महाराष्ट्र युथ फॉर क्लायमेट ॲक्शन (MYCA) उपक्रमाद्वारे हवामान बदलाबाबत तरुणांमध्ये जागरूकता | २०० |
| | एकूण | ३,३०० |

# ५.१ ई-प्लेज (#Epledge) नोंदणी आणि पूर्तता — गुण ६००

**माझी वसुंधरा ई-प्लेज (ई-शपथ) हा महाराष्ट्र शासनाच्या पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाचा एक उपक्रम आहे. या उपक्रमाचा प्रमुख उद्देश, प्रत्येक नागरिकाला पर्यावरण संवर्धनासाठी प्रतिज्ञा देणे आणि शाश्वत जीवनशैली आत्मसात करायला प्रोत्साहित करणे हा आहे. स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रातील नागरिकांनी केलेल्या ई-प्लेज नोंदणीचे मूल्यमापन या निर्देशकाद्वारे केले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान एप्रिल ते जून २०२५ पासून सुरू होणाऱ्या ४ तिमाहींसाठी स्थानिक स्वराज्य संस्थेतील नागरिकांनी पोर्टलवर **वैयक्तिकरित्या** नोंदणी केलेल्या ई-प्लेजची संख्या. (Relative Marking) | | २०० |
| २. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान एप्रिल ते जून २०२५ पासून सुरू होणाऱ्या ४ तिमाहींसाठी स्थानिक स्वराज्य संस्थेतील नागरिकांनी पोर्टलवर **गटांमध्ये** नोंदणी केलेल्या ई-प्लेजची संख्या (Relative Marking) | | १०० |
| ३. | **पूर्तता :** माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान **वैयक्तिकरित्या** नोंदणी आणि पूर्तता केलेल्या ई-प्लेजची टक्केवारी (Relative Marking) | | १०० |
| ४. | **पूर्तता :** माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान **गटांमध्ये** नोंदणी आणि पूर्तता केलेल्या ई-प्लेजची टक्केवारी (Relative Marking) | | १०० |
| ५. | ४ तिमाहींमध्ये सतत ई-प्लेजची पूर्तता करणारे (प्रत्येक तिमाहीतील टॉप १० स्थान विचारात घेतले जातील) | | १०० |
| | i. सर्व ४ तिमाहींमध्ये **वैयक्तिकरित्या** सतत उत्कृष्ट कामगिरी करणारे | ७० | |
| | ii. सर्व ४ तिमाहींमध्ये **गटात** सतत उत्कृष्ट कामगिरी करणारे | ३० | |

**आवश्यक तपशील:**

- स्थानिक स्वराज्य संस्थांमधील नागरिकांनी वैयक्तिक आणि गटांमध्ये घेतलेल्या ई-प्लेजची संख्या तसेच माझी वसुंधरा अभियानाच्या संकेतस्थळावर नोंदणी झालेल्या ई-प्लेजची संख्या https://majhivasundhara.in/en/majhi-vasundhara-pledge
- सर्वाधिक ई-प्लेज नोंदणी सादर केलेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांची यादी माझी वसुंधरा अभियान संचालनालयाद्वारे प्रत्येक तिमाहीनंतर सादर करण्यात येईल.

| SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे.<br>१२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |
|---|---|

# ५.१ ई-प्लेज (#Epledge) नोंदणी आणि पूर्तता










*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

| ५.२ | समाज माध्यमांचा वापर करून माझी वसुंधरा अभियानाची जनजागृती | गुण ४०० |
|---|---|---|

वातावरणीय बदलाबाबत जनजागृती करणाऱ्या विविध उपक्रमांमध्ये वेळोवेळी नावीन्यपूर्ण पद्धतीने नागरिकांचा सक्रिय सहभाग असणे, हे माझी वसुंधरा अभियानाचे एक महत्वाचे उद्दिष्ट आहे. स्थानिक स्वराज्य संस्था विविध कार्यक्रमांचे आयोजन करून, स्पर्धा आणि इतर सामाजिक माध्यमांचा वापर करून जनजागृती करू शकतात. स्थानिक स्वराज्य संस्थानी याबाबतीत किती कार्यक्रमांचे आयोजन केले, माझी वसुंधरा अभियानाबद्दल जनजागृती करण्यासाठी किती प्रयत्न केले, सामाजिक माध्यमांचा कसा वापर केला या सगळ्या बाबींचे मूल्यमापन या निर्देशकाच्या माध्यमातून केले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | सक्रिय सोशल मीडिया प्लॅटफॉर्म | | १५० |
| | फेसबुक पेज/अकाउंट | ५० | |
| | इंस्टाग्राम अकाउंट | ५० | |
| | युट्युब चॅनेल | ५० | |
| २. | सोशल मीडिया प्लॅटफॉर्मवर फॉलोअर्स/सबस्क्रायबर यांची संख्या **(Relative Marking)** | | १५० |
| | फेसबुक पेज/अकाउंट | ५० | |
| | इंस्टाग्राम अकाउंट | ५० | |
| | युट्युब वरील सबस्क्रायबर | ५० | |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० अंतर्गत केलेल्या कामाचा संकलित व्हिडिओ | | १०० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ सोशल मीडिया प्लॅटफॉर्मची लिंक - फेसबुक, इंस्टाग्राम आणि यूट्यूब.
- ❑ विहित एक्सेल फॉरमॅटमध्ये स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सोशल मीडिया पोस्टचा तपशील.
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० अंतर्गत केलेल्या कामाचा संकलित व्हिडिओ यूट्यूब चॅनलवर अपलोड करावा. (व्हिडिओचा कालावधी 2 मिनिटांपेक्षा जास्त नसावा).
- ❑ ***Note-*** **समाजमाध्यमांवरील पोस्टची लिंक ही अकाऊंटच्या मुखपृष्ठाची नसावी. ही लिंक सदर पोस्टचीच आहे याची दक्षता घ्यावी.**
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान दररोज एकूण पदांच्या संख्येवर आधारित मूल्यमापन यंत्रणा पॉइंट 3 साठी मार्किंग केले जाईल. स्थानिक संस्थेने दररोज किमान एक पोस्ट टाकावी.

| | SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे.<br>१२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |
|---|---|---|

| ५.३ | स्पर्धा, जनजागृती उपक्रम राबवून माझी वसुंधरा अभियानाची जनजागृती | गुण ४०० |
|---|---|---|

**वेळेवर आणि नाविन्यपूर्ण पद्धतीने विविध हवामान बदल नियंत्रित करण्यासाठीच्या उपक्रमांमध्ये स्थानिक स्वराज्य संस्थांचा सक्रिय सहभाग हे माझी वसुंधरा अभियानाच्या प्रमुख उद्दिष्टांपैकी एक आहे. स्थानिक स्वराज्य संस्थेद्वारे आयोजित केलेल्या प्रचार/जनजागरूती कार्यक्रम आणि स्पर्धा यांच्या आधारे मूल्यमापन करून हे साध्य केले जाऊ शकते. या निर्देशकामध्ये, माझी वसुंधरा अभियानाला चालना देण्यासाठी जनजागरूती कार्यक्रम, उपक्रम आणि स्पर्धांच्या संख्येवर आधारित स्थानिक स्वराज्य संस्थांचे मूल्यांकन केले जाईल.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | स्थानिक स्वराज्य संस्थेद्वारे आयोजित केलेल्या स्पर्धा/ उपक्रम/जनजागृती कार्यक्रमांची संख्या (Relative Marking) | | ३०० |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची पहिली तिमाही (एप्रिल - जून) **(Relative Marking)** | १०० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची दुसरी तिमाही (जुलै – सप्टेंबर) **(Relative Marking)** | १०० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची तिसरी तिमाही (ऑक्टोबर – डिसेंबर) **(Relative Marking)** | १०० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची चौथी तिमाही (जानेवारी - मार्च) **(Relative Marking)** | १०० | |
| २. | #majhivasundhara सह सोशल मीडिया प्लॅटफॉर्मवर जनजागृती कार्यक्रम/उपक्रम/स्पर्धांसाठी एकूण पोस्टची संख्या **(Relative Marking)** | | ५० |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० च्या प्रसिद्धीसाठी पर्यावरणपूरक साहित्याचा वापर **(Relative Marking)** | | ५० |

**आवश्यक तपशील:**

- **स्थानिक स्वराज्य संस्थेद्वारे आयोजित केलेल्या उपक्रमांची (स्पर्धा ,जनजागृती मोहीमा) संख्या तसेच सहभागींची संख्या (यात खालील सहभागींचा देखील समावेश होतो.)**
    - **खाजगी कंपन्या / स्वयंसेवी संस्था / कॉर्पोरेट्स**
    - **शिक्षण संस्था**
    - **सोसायटी/निवास कल्याण संघटना/नागरिक गट/सिटिझन क्लब**
- **स्थानिक स्वराज्य संस्थेने आयोजित केलेले उपक्रम/कार्यक्रम/स्पर्धा यांचा तपशील – विहित केलेल्या एक्सेलमध्ये**
- **पर्यावरणाशी संबंधित दिवशी दर महिन्याला किमान एका कार्यक्रमाचे आयोजन करावे. (पर्यावरण दिवसांची यादी पुढील पानावर आहे.)**
- **स्थानिक स्वराज्य संस्थेने आयोजित केलेल्या जनजागृती कार्यक्रमांचा/उपक्रमांचा/स्पर्धांचा तपशील - विहित केलेल्या एक्सेलमध्ये (हा तपशील तिमाहीनुसार अद्ययावत करावा.)**
- **जनजागृती करणाऱ्या उपक्रमांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB).**
- **दिलेली समाजमाध्यमांवरील पोस्टची लिंक ही अकाऊंटच्या मुखपृष्ठाची नसावी. ही लिंक सदर पोस्टचीच आहे याची दक्षता घ्यावी.**
- **सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.**

| | SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे.<br>१२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |
|---|---|---|

# पर्यावरण दिनदर्शिका

**जानेवारी**

**दि. २६**
आंतरराष्ट्रीय
स्वच्छ ऊर्जा दिवस

**फेब्रुवारी**

**दि. ०२**
जागतिक पाणथळ दिवस

**दि. २८**
राष्ट्रीय विज्ञान दिन

**मार्च**

दि ०३ जागतिक वन्यजीव दिवस
दि १४ नद्यांसाठी आंतरराष्ट्रीय कृती दिवस
दि १८ जागतिक पुनर्वापर दिवस
दि २१ आंतरराष्ट्रीय वन दिवस
दि २२ जागतिक जल दिवस
दि २३ जागतिक हवामान दिवस

**एप्रिल**

दि ०३ जागतिक जलचर प्राणी दिवस
दि १८ जागतिक वारसा दिवस
दि २२ जागतिक पृथ्वी दिवस

**मे**

दि ०३ आंतरराष्ट्रीय बिबट्या दिवस
दि ११ जागतिक स्थलांतरित पक्षी दिवस
दि ११ स्थानिक पक्षी दिवस
दि १५ जागतिक हवामान बदल दिवस
दि १९ राष्ट्रीय लुप्तप्राय प्रजाती दिवस
दि २० जागतिक जैवविविधता दिवस
दि २२ आंतरराष्ट्रीय जैवविविधता दिवस
दि २३ जागतिक कासव दिवस
दि २३ जागतिक पोपट दिवस

**जून**

दि ०५ जागतिक पर्यावरण दिन
दि ०७ जागतिक अन्न सुरक्षा दिवस
दि ०८ जागतिक महासागर दिवस
दि १५ जागतिक पवन दिवस
दि १७ वाळवंटीकरण आणि दुष्काळाचा सामना करण्यासाठी जागतिक दिवस
दि २२ जागतिक पर्जन्यवन दिन

# पर्यावरण दिनदर्शिका

## जुलै

दि १-७ वनमहोत्सव सप्ताह दिवस
दि २६ खारफुटी आणि पर्यावरणाच्या संवर्धनासाठी आंतरराष्ट्रीय दिवस
दि २८ जागतिक निसर्ग संवर्धन दिवस
दि २९ आंतरराष्ट्रीय व्याघ्र दिवस

## ऑगस्ट

दि १२
जागतिक हत्ती दिवस
दि २०
राष्ट्रीय अक्षय ऊर्जा दिवस

## सप्टेंबर

दि ७ निळ्या आकाशासाठी स्वच्छ हवेचा आंतरराष्ट्रीय दिवस
दि १६ ओझोन थर दिवस
दि १८ जागतिक पाणी देखरेख दिवस
दि २० जागतिक स्वच्छता दिवस
दि २१ शून्य उत्सर्जन दिवस
दि २९ अन्नाचे नुकसान आणि कचऱ्याबद्दल जागरुकता निर्माण करण्यासाठी आंतरराष्ट्रीय दिवस

## ऑक्टोबर

दि २-८ जागतिक वन्यजीव सप्ताह
दि ४ जागतिक प्राणी दिन
दि ७ जागतिक अधिवास दिन
दि १३ नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी आंतरराष्ट्रीय दिवस
दि १४ आंतरराष्ट्रीय ई-कचरा दिवस
दि २२ आंतरराष्ट्रीय ऊर्जा दिवस
दि २४ आंतरराष्ट्रीय हवामान कृती दिवस

## नोव्हेंबर

दि १
जागतिक परिसंस्था दिन
दि १२
जागतिक पक्षी दिन

## डिसेंबर

दि ४ वन्यजीव संवर्धन दिवस
दि ५ जागतिक माती दिवस
दि ११ आंतरराष्ट्रीय पर्वत दिवस
दि १४ राष्ट्रीय ऊर्जा संवर्धन दिवस
दि २३ राष्ट्रीय शेतकरी दिवस

## ५.३ स्पर्धा, जनजागृती उपक्रम राबवून माझी वसुंधरा अभियानाची जनजागृती














*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

## ५.४ तरुणांचा सहभाग आणि पर्यावरण दूतांची निवड

**गुण ३००**

**पर्यावरण दूत म्हणजे पर्यावरण संवर्धनासाठी अतुलनीय कार्य करणारे नागरिक. माझी वसुंधरा अभियानाची व्यापक उद्दिष्टे साध्य करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी पर्यावरण दूतांच्या सहकार्याने कार्यक्रम आयोजित केले पाहिजेत. या कार्यक्रमांमध्ये पर्यावरण जतन आणि संवर्धन कार्यात पर्यावरण दूतांसह तरुणांचा सक्रिय सहभाग असणे आवश्यक आहे. या माध्यमातून तरुणांच्या मनात पर्यावरण जतन आणि संवर्धन अशा उपक्रमांचे महत्त्व निर्माण होते. स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये पर्यावरण दूतांची संख्या आणि त्यांच्या माध्यमातून युवकांचा सहभाग तसेच त्यांच्या सहामाही कामगिरीचे मूल्यांकन या निर्देशकाच्या माध्यमातून केले जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | निवड केलेल्या पर्यावरण दूतांची संख्या **(Relative Marking)** | | ५० |
| २. | पर्यावरण दूत म्हणून निवडलेल्या तरुणांची संख्या **(Relative Marking)** | | ५० |
| ३. | पर्यावरण दूतांसह स्थानिक स्वराज्य संस्थानी आयोजित केलेल्या उपक्रम/कार्यक्रमांची संख्या **(Relative Marking)** | | २०० |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची पहिली तिमाही (एप्रिल - जून) **(Relative Marking)** | ५० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची दुसरी तिमाही (जुलै – सप्टेंबर) **(Relative Marking)** | ५० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची तिसरी तिमाही (ऑक्टोबर – डिसेंबर) **(Relative Marking)** | ५० | |
| | माझी वसुंधरा अभियान ६.० ची चौथी तिमाही (जानेवारी - मार्च) **(Relative Marking)** | ५० | |

**आवश्यक तपशील:**

- ☐ विहित केलेल्या एक्सेलमध्ये भरावयाचा तपशील:
  - स्थानिक स्वराज्य संस्थानी निवड केलेल्या पर्यावरण दूतांची माहिती;
  - नाव, वय, शिक्षण, आधार क्रमांक व आयोजित केलेल्या उपक्रम/कार्यक्रमांची संख्या
  - आयोजित करण्यात आलेल्या उपक्रमांच्या सोशल मीडिया पोस्टची लिंक
- ☐ स्थानिक संस्थेकडून घोषणापत्र, वर्तमानपत्र/सोशल मीडिया पोस्ट
- ☐ स्पर्धांची जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- ☐ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| | | |
|---|---|---|
| | **SDG ४. गुणवत्तापूर्ण शिक्षण** | ४.७ : २०३० पर्यंत, शाश्वत विकास आणि शाश्वत जीवनशैली, मानवी हक्क, लैंगिक समानता, शांतता आणि अहिंसेच्या संस्कृतीला प्रोत्साहन देण्यासाठी इतरांसह, शाश्वत विकासाला चालना देण्यासाठी आवश्यक ज्ञान आणि कौशल्ये सर्व विद्यार्थ्यांनी आत्मसात केल्याची खात्री करणे. , जागतिक नागरिकत्व आणि सांस्कृतिक विविधता आणि शाश्वत विकासासाठी संस्कृतीच्या योगदानाचे कौतुक करणे. |

# ५.४ तरुणांचा सहभाग आणि पर्यावरण दूतांची निवड











***सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.***

## ५.५ सार्वजनिक ठिकाणी माझी वसुंधरा तत्त्वे दर्शवणाऱ्या बाबींच्या माध्यमातून प्रचार आणि प्रसिध्दी — गुण ८००

**माझी वसुंधरा अभियान पर्यावरणाच्या सुधारणेसाठी निसर्गाच्या पाच घटकांच्या (पंचमहाभूते) अंतर्गत संभाव्य कृती बिंदू ओळखण्यावर लक्ष केंद्रित करते. सार्वजनिक ठिकाणी पंचमहाभूतांचा (भूमी, वायु, जल, अग्नि आणि आकाश) प्रचार केल्याने नागरिकांमध्ये पर्यावरण जतन आणि संवर्धनाविषयी जनजागृती निर्माण होईल आणि अभियानात सक्रिय सहभाग मिळण्यास प्रोत्साहन मिळते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान माझी वसुंधरा तत्त्वांवर लक्ष केंद्रित करून विकसित केलेल्या नवीन ठिकाणांची संख्या<br>**(विकसित केलेल्या प्रत्येक नवीन ठिकाणांसाठी १०० गुण दिले जातील.)** | ५०० |
| २. | **अपकिप (Upkeep):**<br>माझी वसुंधरा अभियान २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान तयार करण्यात आलेल्या माझी वसुंधरा तत्त्वांवर लक्ष केंद्रित करून नूतनीकरण केलेल्या ठिकाणांची संख्या. | १०० |
| ३. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान कचऱ्याचा पुनर्वापर करून विकसित केलेल्या नाविन्यपूर्ण ठिकाणांची संख्या<br>**(Relative Marking)** | १०० |
| ४. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान वॉल पेंटिंग्स केलेल्या भिंतींची संख्या **(Relative Marking)** | १०० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ माझी वसुंधरा अभियानाच्या तत्वांचा प्रचार व प्रसार करणाऱ्या ठिकाणांची निर्मिती (किमान ०५) माझी वसुंधरा अभियानाची तत्त्वे विहित एक्सेल स्वरूपात, उदा.-
  - माझी वसुंधरा अभियानाच्या मार्गांवर सौर दिवे आणि रस्त्याच्या कडेला वृक्षारोपण
  - पाण्याचा पुनर्वापर दर्शविण्यासाठी कारंज्यांची निर्मिती.
- ❑ माझी वसुंधरा अभियानाच्या तत्वांचा प्रचार व प्रसार करणाऱ्या ठिकाणांच्या नूतनीकरणाचे नाव आणि तपशील.
- ❑ माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान पुनर्वापर करण्यात येणाऱ्या कचऱ्याचा वापर करून तयार केलेल्या नाविन्यपूर्ण प्रचार व प्रसार करणाऱ्या ठिकाणांचे नाव आणि तपशील.
- ❑ फक्त माझी वसुंधरा अभियानाची तत्त्वे दर्शवणाऱ्या वैयक्तिक वॉल पेंटिंग्सचे तपशील विहित एक्सेल फॉरमॅटमध्ये.
- ❑ निर्माण करण्यात आलेले प्रमोल्गेशन स्पॉट्स आणि त्यांची देखभाल - जिओटॅग केलेली छायाचित्रे (Size १ ते २ MB)
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.
- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेली माहिती माझी वसुंधरा अभियान २.०, ३.०, ४.० आणि ५.० दरम्यान MIS मध्ये भरलेल्या माहितीशी जुळत नसल्यास, कोणतेही गुण दिले जाणार नाहीत. (केवळ अपकीपसाठी (Upkeep) लागू)

| SDG | | |
|---|---|---|
| 12 RESPONSIBLE CONSUMPTION AND PRODUCTION | SDG १२. संसाधनांचा जाणीवपूर्वक वापर आणि उत्पादन | १२.५: २०३० पर्यंत, प्रतिबंध, कपात, पुनर्वापर आणि पुनर्वापर याद्वारे कचरा निर्मिती मोठ्या प्रमाणात कमी करणे.<br>१२.८: २०३० पर्यंत, शाश्वत विकासासाठी आणि निसर्गाशी सुसंगत जीवनशैलीसाठी सर्वत्र लोकांना संबंधित माहिती आणि जागरूकता असल्याची खात्री करणे. |

# सार्वजनिक ठिकाणी माझी वसुंधरा तत्त्वे दर्शवणाऱ्या वॉल पेंटींगच्या माध्यमातून प्रचार आणि प्रसिध्दी







टीप-

वॉल पेंटिंगमध्ये माझी वसुंधरा लोगोसह सर्व ५ थीमॅटिक क्षेत्रांचा समावेश असावा.

तसेच, वॉल पेंटिंगचे छायाचित्र वरील दिलेल्या प्रमाणे जिओटॅग आणि अपलोड करावे.

# ५.५ सार्वजनिक ठिकाणी माझी वसुंधरा तत्त्वे दर्शवणाऱ्या बाबींच्या माध्यमातून प्रचार आणि प्रसिध्दी












*सदर छायाचित्रे केवळ उदाहरणादाखल दिलेली आहेत.*

# ५.६ बचत गटांचा सहभाग

**गुण १००**

**बचत गट (SHG) व्यक्तींच्या छोट्या अनौपचारिक संघटना आहेत, ज्या त्यांच्या समस्या आणि समस्यांचे स्वयं-मदत आणि सामुदायिक कृतीद्वारे निराकरण करण्याच्या समान हेतूने एकत्रत येतात.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | स्थानिक स्वराज्य संस्थेत पर्यावरणीय उपक्रमांसाठी नोंदणीकृत बचत गटांची संख्या.(Relative Marking) | | २० |
| २ . | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान बचत गटांनी राबविलेल्या उपक्रमांची संख्या (Relative Marking) | | ५० |
| | सेवाभिमुख | ३० | |
| | जनजागृती मोहिमा | २० | |
| ३. | माझी वसुंधरा ६.० दरम्यान पर्यावरणीय उपक्रमांसाठी स्थानिक स्वराज्य संस्थेसोबत करार केलेल्या बचत गटांची संख्या (Relative Marking) | | ३० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये नोंदणीकृत बचत गटांचे नाव आणि तपशील विहित एक्सेल फॉरमॅटमध्ये
- ❑ पर्यावरणीय उपक्रमांमध्ये सहभागी असलेल्या बचत गटांचे तपशील जसे:
  - पर्यावरण, माझी वसुंधराबद्दल जनजागृती मोहीम
  - हरित आच्छादन आणि जैवविविधतेसाठी वृक्ष लागवड, रोपवाटिका, बागांची देखभाल
  - जलसंधारणासाठी विहिरी आणि जलस्त्रोतांचे व्यवस्थापन आणि जल गुणवत्ता परीक्षण
  - घनकचरा व्यवस्थापनेचे उपक्रम - कचरा संकलन, विलगीकरण आणि प्रक्रिया
  - स्वच्छता उपक्रम – शौचालय व्यवस्थापन आणि देखभाल
- ❑ बचत गट आणि स्थानिक संस्था यांच्यात स्वाक्षरी केलेल्या करारांच्या प्रती.
- ❑ बचत गटांद्वारे आयोजित पर्यावरणीय उपक्रमांचे जिओटॅग केलेली छायाचित्रे (size १ ते २ mb )
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध / सुवाच्य नसल्यास आणि गूगल मॅप लिंक चुकीची असल्यास या निर्देशकासाठी कोणतेही गुण दिले जाणार नाहीत

| | | |
|---|---|---|
| | **SDG ११. शाश्वत शहरे व समुदाय** | ११.६: २०३० पर्यंत, हवेच्या गुणवत्तेवर आणि नगरपालिका आणि इतर कचरा व्यवस्थापनावर विशेष लक्ष देऊन शहरांच्या प्रति व्यक्ती पर्यावरणावरील प्रतिकूल परिणाम कमी करणे. |
| | **SDG १३. वातावरणीय कृती** | १३.१ : सर्व देशांमध्ये हवामान-संबंधित धोके आणि नैसर्गिक आपत्तींसाठी लवचिकता आणि अनुकूली क्षमता मजबूत करणे. |

# माझी वसुंधरा अभियानात सहभागी असलेल्या बचत गटांद्वारे केले जाऊ शकणारे उदाहरणात्मक उपक्रम



महिला बचत गट: “स्वच्छता ही सेवा” चे चेंजमेकर




घरोघरी कचरा संकलनात बचत गटांचा सहभाग



गाळ काढणे



जलसंधारण उपक्रम, महाराष्ट्र



वृक्षारोपण



जनजागृती कार्यक्रम



वृक्षवाटिका निर्मिती



स्वच्छता उपक्रम

| ५.७ | पर्यायी निधी मिळवण्याचे मार्ग : CSR, सामुदायिक सहभाग व इतर | गुण २०० |
|---|---|---|

**माझी वसुंधरा अभियानाच्या अंतर्गत आयोजित करण्यात येणाऱ्या विविध उपक्रमांसाठी विविध स्त्रोतांकडून प्राप्त झालेल्या निधीचा वापर करण्यात येतो. व्यावसायिक सामाजिक जबाबदारी (CSR) आणि समुदाय सहभाग इ. माध्यमातून स्थानिक स्वराज्य संस्थानी निधी गोळा करून आयोजित केलेल्या उपक्रमांची माहिती या निर्देशकात घेतली जाते.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | पर्यायी निधी स्त्रोतांच्या मार्फत प्राप्त झालेल्या निधीच्या माध्यमातून आयोजित करण्यात आलेल्या माझी वसुंधरा अभियान ६.० अंतर्गतच्या उपक्रमांची/ प्रकल्पांची संख्या **(Relative Marking)** | १०० |
| २. | पर्यायी निधी स्त्रोतांद्वारे मिळालेल्या रकमेचा विनियोग **(Relative Marking)** | १०० |

**आवश्यक तपशील:**

- ❑ संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये पर्यायी निधी स्त्रोतांच्या माध्यमातून प्राप्त झालेल्या निधीतून हाती घेतलेल्या प्रकल्पांची एकूण संख्या.
- ❑ माझी वसुंधरा तत्त्वांचे प्रचार करणारे प्रकल्प मूल्यमापनासाठी विचारात घेतले जातील.
- ❑ निधी हस्तांतरणाची प्रत, पावत्या, वाटप केलेल्या व्यावसायिक सामाजिक जबाबदारी (CSR) रकमेचा आर्थिक पुरावा.
- ❑ कार्यारंभ आदेशाची प्रत
- ❑ काम पूर्ण करण्याबाबत व्यावसायिक सामाजिक जबाबदारी (CSR) अंमलबजावणी संस्थेकडून प्राप्त झालेले प्रमाणपत्र.
- ❑ सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

| ५.८ | निसर्गपर्यटन (Ecotourism) | गुण १०० |
|---|---|---|

निसर्गपर्यटन/इकोटुरिझम हे निसर्गाभिमुख पर्यटनाचा एक प्रकार आहे ज्याचा उद्देश नैसर्गिक पर्यावरणाच्या संवर्धनात योगदान देणे आहे. पर्यावरणाचे रक्षण करणे, स्थानिक संस्कृतींचा आदर करणे व त्या समुदायांच्या आर्थिक विकासाला मदत करणे हा उद्देश आहे. इकोटूरिझम हा पर्यावरण संरक्षण व शाश्वत विकासासाठी महत्त्वाचा मार्ग आहे. जर योग्य प्रकारे नियोजन केले, तर पर्यावरणाचा समतोल राखून निसर्गाचा आनंद घेता येऊ शकतो. स्थानिक स्वराज्य संस्थानी इकोटुरिझमला चालना व प्रोत्साहन देण्या करीत काय उपाययोजना/ जनजागृती उपक्रम केले आहे या सगळ्या बाबींचे मूल्यमापन या निर्देशकाच्या माध्यमातून केले जाते.

| | मूल्यमापन कार्यपद्धती | | गुण |
|---|---|---|---|
| १. | स्थानिक स्वराज्य संस्थेने ईकोटुरिसम करीता पर्यटन स्थळे शोधली आणि विकसित केली आहेत का? | | २५ |
| | होय | २५ | |
| | नाही | ० | |
| २. | ईको टुरिसम चा प्रचार करण्यासाठी जनजागृती उपक्रम राबविण्यात आले आहेत का? (Relative Marking) | | २५ |
| ३. | स्थानिक स्वराज्य संस्थेने इको टुरिझमसाठी काही मार्गदर्शक तत्त्वे विकसित केली आहेत का? | | ५० |

## आवश्यक तपशील:

- ईकोटुरिसम करीता पर्यटनस्थळांचा तपशील- विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- जनजागृती उपक्रमांचा तपशील- विहित केलेल्या एक्सेलमध्ये.
- ईकोटुरिसम स्थळांचे जिओ टॅग केलेले छायाचित्र.
- इकोटुरिझमसाठी मार्गदर्शक तत्वांची प्रत

**SDG ४. गुणवत्तापूर्ण शिक्षण**

४.७ : २०३० पर्यंत, शाश्वत विकास आणि शाश्वत जीवनशैली, मानवी हक्क, लैंगिक समानता, शांतता आणि अहिंसेच्या संस्कृतीला प्रोत्साहन देण्यासाठी इतरांसह, शाश्वत विकासाला चालना देण्यासाठी आवश्यक ज्ञान आणि कौशल्ये सर्व विद्यार्थ्यांनी आत्मसात केल्याची खात्री करणे. , जागतिक नागरिकत्व आणि सांस्कृतिक विविधता आणि शाश्वत विकासासाठी संस्कृतीच्या योगदानाचे कौतुक करणे.

# ५.९ पर्यावरण सेवा योजनेत शाळांचा सहभाग

**गुण २००**

पर्यावरण सेवा योजना (ESS), पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग महाराष्ट्र शासना मार्फत राबविली जाते. या योजनेचे उद्दिष्ट शालेय विद्यार्थ्यांना स्थानिक पर्यावरणाशी निगडीत समस्या विद्यार्थ्यांच्या प्रत्यक्ष सहभाग व कृती समजून घेऊन त्यावर उपाययोजना करण्यास प्रोत्साहन देणे. निसर्ग व मानव यांच्यातील नातेसंबंध समजून घेऊन ते जोपासण्याचे महत्व बालवयातच बिंबवणे. पर्यावरण विषयक कृती, प्रतिनिधित्व व संवाद कौशल्य या बाबी विकसित करणे, शाश्वत विकासासाठी आवश्यक आचार-विचारांचे आदान-प्रदान, जडणघडण करणे व त्याद्वारे पर्यावरण संवर्धनासाठी नेतृत्वगुण विकसित करणे. स्थानिक-पातळीवर नैसर्गिक संसाधनाच्या व्यवस्थापनाबाबत, स्थानिक लोकांच्या सहभागाने प्रत्यक्ष कृती कार्यक्रम राबवणे.शालेय स्तरावर केवळ एक विषय म्हणून पर्यावरणावर लक्ष केंद्रित न करता याद्वारे पर्यावरण संवर्धनाच्या उपक्रमांमध्ये विद्यार्थ्यांना प्रेरित केले जाते. विद्यार्थ्यांच्या पुढाकारातून राबविण्यात येणाऱ्या पर्यावरण विषयक उपक्रमांचा विचार करून स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कामगिरीचे मूल्यमापन या निर्देशांकात केले जाते. पर्यावरण शिक्षण केंद्र, राज्य सानियंत्रण संस्था म्हणून कार्यरत आहे.

| | मूल्यमापन पद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | माझी वसुंधरा अभियान ६.० दरम्यान पर्यावरण सेवा योजनेत (ESS) सहभाग नोंदविलेल्या शाळांची टक्केवारी **(Relative Marking)** | ४० |
| २. | पर्यावरण सेवा योजनेसाठी प्रत्येक सहभागी शाळेतून संबंधित योजना प्रमुख शिक्षकांची नियुक्ती करणे आणि त्यांनी सहभाग नोंदवलेल्या कार्यशाळा (ऑनलाईन किंवा प्रत्यक्ष) | ४० |
| ३. | विद्यार्थ्यांचा गट तयार करणे (प्रत्येक गटात ५० पेक्षा जास्त विद्यार्थी नसावे)- (मुले आणि मुली सम समान असावे) एक विद्यार्थी आणि एक विद्यार्थीनी गटप्रमुख म्हणून निवडणे | ४० |
| ४. | ESS गटाद्वारे योजनेच्या शिक्षक हस्तपुस्तिकेतील एकूण राबवविलेल्या पर्यावरणीय कृती उपक्रमांची संख्या, शाळांमार्फत आयोजित केलेल्या वार्षिक थीमॅटिक शिबिरे **(Relative Marking)** | ४० |
| ५. | पर्यावरण सेवा योजना गटांद्वारे आयोजित समुदाय सभा / बैठक कार्यक्रमांची संख्या **(Relative Marking)** | ४० |

**आवश्यक तपशील:**

❑ **विहित केलेल्या एक्सेलमध्ये भरावयाची माहिती:**

- ULB हद्दीत एकूण (शासनमान्य ) शाळांची संख्या, आणि त्या पैकी पर्यावरण सेवा योजनेत (ESS) नोंदणीकृत शाळांची संख्या
- नोंदणीकृत शाळेत ESS योजना प्रमुखांची नियुक्ती आणि क्षमता बांधणी कार्यशाळेत नोदणी आणि सहभाग (ऑनलाईन /प्रत्यक्ष)
- ESS योजना प्रमुख यांनी ५० विद्यार्थ्यांचा (मुले आणि मुली समान) ESS गट स्थापन करणे, एक विद्यार्थी आणि एक विद्यार्थीनी गटप्रमुख म्हणून निवडणे आणि गटाची यादी उपलोड करणे.
- ESS गटामार्फत- पाणी, घनकचरा व्यवस्थापन, ऊर्जा, जैवविविधता, संस्कृती आणि वारसा, प्रदूषण नियंत्रण, पर्यावरणपूरक जीवनशैली आणि जागतिक तापमान वाढ हवामान बदल या विषयातील प्रत्येक विषयातील किमान तीन कृती पाठ/उपक्रम राबविणे आणि अहवाल उपलोड करणे.
- ESS गटाद्वारे १ शिबिर आणि १ लोकसहभाग सभा / बैठक आयोजित करणे, इतिवृतांत आणि जीओ टॅग छायाचित्रे उपलोड करणे.
- नोंदणीकृत शाळेत निश्चित करून दिलेले कृती उपक्रम राबवविल्याचा अहवाल आणि जीओ टॅग छायाचित्रे उपलोड करणे.

**टीप-**

- माझी वसुंधरा अभियान ५.० मध्ये ऑनलाईन नाव नोंदणी केलेल्या शाळांनी ६.० पुन्हा नाव नोंदणी करण्याची आवश्यकता नाही.
- o ऑनलाईन अहवालामध्ये अवैध सांख्यिकी /माहिती भरल्यास, निर्देशांकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.उपक्रम राबविताना घेण्यात आलेल्या जीओटॅग छायाचित्रांचा आकार १ ते २ MB इतका असावा.

| | | |
|---|---|---|
| 4 QUALITY EDUCATION | **SDG ४. गुणवत्तापूर्ण शिक्षण** | ४.७ : २०३० पर्यंत, शाश्वत विकास आणि शाश्वत जीवनशैली, मानवी हक्क, लैंगिक समानता, शांतता आणि अहिंसेच्या संस्कृतीला प्रोत्साहन देण्यासाठी इतरांसह, शाश्वत विकासाला चालना देण्यासाठी आवश्यक ज्ञान आणि कौशल्ये सर्व विद्यार्थ्यांनी आत्मसात केल्याची खात्री करणे. , जागतिक नागरिकत्व आणि सांस्कृतिक विविधता आणि शाश्वत विकासासाठी संस्कृतीच्या योगदानाचे कौतुक करणे. |

# पर्यावरण सेवा योजना- (ESS)

पर्यावरण संवर्धन व संरक्षण याचे महत्व शालेय स्तरावर बाल वयात विद्यार्थामध्ये प्रत्यक्ष कृतीद्वारे बिंबवण्यासाठी राज्य शासनाने दि. १४-१-२०११ रोजी शासन निर्णयद्वारे राज्यातील माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमध्ये "पर्यावरण सेवा योजना" (Environment service scheme) सुरु करण्यात आली आहे. योजनेची परिणामकारक अंमलबजावणी, यशस्विता, लक्षप्राप्ती लक्षात घेता माननीय (वित्त) मंत्री महोदय यांनी सन २०२३ रोजीच्या अर्थसंकल्पिय भाषणामध्ये पर्यावरण सेवा योजना राज्यभरातील ७५०० शाळांमध्ये राबविण्याची घोषणा केली आहे. ही योजना पूर्ण राज्यभरात लागू असून योजनेचा दुसरा टप्पा म्हणून आगामी पाच वर्षात राज्यभरातील ७५०० शाळांमध्ये योजना राबविण्यात येत आहे. शिक्षकांसाठी प्रत्यक्ष कृतीद्वारे प्रशिक्षणे ज्यामध्ये शिक्षकांसाठी पाठ्यपुस्तक संलग्न शैक्षणिक साहित्य प्रदान करण्यात येईल, ज्याच्या माध्यमातून विद्यार्थ्यांना पर्यावरणपूरक जीवनशैली अंगिकारणे सोयीचे होईल. योजनेच्या माध्यमातून विद्यार्थ्यांच्या अनुभव विश्वानुसार, स्थानिक पर्यावरणाशी निगडीत प्रत्यक्ष कृती कार्यक्रम आखणे आणि राबविणे यावर भर असणार आहे. विद्यार्थ्यामध्ये पर्यावरण विषयक गुंतागुतीच्या प्रक्रिया समजून घेऊन त्यावर पर्यावरण संवर्धन कृती करण्या सोबतच नेतृत्वगुण, संवादकौशल्य अशा क्षमता विकसित करणे अपेक्षित आहे.

उद्देश: प्रत्यक्ष कृतीतून पर्यावरण संवर्धन, संवेदनशील व सजग नागरिक तयार करणे, लोकसहभागातून स्थानिक पर्यावरणीय समस्या सोडवणे, विद्यार्थ्यांचे कौशल्य विकसन, स्थानिक संसाधन वापराबाबत जागरुकता निर्माण करणे.

- शाळांची ऑनलाईन नोंदणी **(जून ते ऑगस्ट)**
- योजना प्रमुख शिक्षक नियुक्ती व नोंदणी **(जून ते ऑगस्ट )**
- शाळा स्तरावर-विद्यार्थ्यांचा गट स्थापना- ५० विद्यार्थ्यांची गटाची यादी(मुले,मुली सम समान) **(जून ते ऑगस्ट )**
- शाळा गटाद्वारे ई-प्लेज *(ऑनलाईन)* **(जून ते ऑगस्ट )**

**नोंदणी प्रक्रिया**

- योजना प्रमुख शिक्षकांचा ऑनलाईन/प्रत्यक्ष परिचय/प्रशिक्षण कार्यशाळेमध्ये सहभाग **(जुलै ते सप्टेंबर )**
- योजना प्रमुखांद्वारे शाळा स्तरावर विद्यार्थी गटासमवेत घटकसंच आधारित कृती कार्यक्रम नियोजन व अंमलबजावणी **(जून ते जानेवारी )**
- शाळा आणि समुदाय स्तरावर शिबिरे/सभा आयोजन-*(विषयपत्रिका, इतिवृत्तांत/ बैठकीचा तपशील)* ***(डिसेंबर ते फेब्रुवारी )***

**प्रशिक्षणे/ प्रशिक्षणे/ कृती कार्यक्रमे कार्यक्रमे**

- शाळांसाठी विहित कृती उपक्रम छायाचित्रासह पूर्णत्व अहवाल **(फेब्रुवारी-ते मार्च)**
- शाळांनी राबविलेल्या कृती उपक्रमांची मुल्यांकन प्रक्रिया **(फेब्रुवारी ते एप्रिल)**

**अहवाल**

**शाळा सक्रिय सहभागातून "पर्यावरण सेवा योजना" कृती कार्यक्रम-उपक्रम खालील प्रमाणे राबवू शकतातः**
खाली नमुद केल्याप्रमाणे शाळा सक्रिय सहभागाद्वारे "पर्यावरण सेवा योजना (ESS)" ला प्रोत्साहन देऊ शकतातः

| उपक्रमांचे प्रकार | उपक्रमांचा तपशील |
|---|---|
| **पर्यावरण जनजागृती** | 1. जलः विद्यार्थ्यांना पाणी संवर्धनाचे महत्त्व आणि त्यांच्या दैनंदिन जीवनात पाण्याची बचत करण्याच्या पद्धतींबद्दल शिक्षित करणे.<br>2. घनकचरा व्यवस्थापन पर्यावरणपुरक पद्धतीः पुनर्वापर केलेल्या कागदी पिशव्यांचा वापर, कापडी पिशव्या वापरण्यास प्रोत्साहन आणि एकल वापर प्लॅस्टिक बंदी आणि प्लॅस्टिक मुक्त शाळा .<br>3. जैवविविधताः वन्यजीव संरक्षण, रानभाजी महोस्तव, वन्यजीव संरक्षण, दसऱ्याच्या दिवशी आपट्याच्या रोपांचे वाटप, संवादात्मक सत्रे, चित्रकला स्पर्धा इ<br>4. ऊर्जा: भारतीय मानक (BIS) द्वारे ऊर्जा बचत उपकरणांचा वापर, ऊर्जा वापर कमी करणे, नूतनीकरणयोग्य ऊर्जा स्रोतांचा अवलंब करणे तसेच शाश्वत जीवनशैलीला प्रोत्साहन देणे.<br>5. संस्कृती आणि वारसा- पर्यावरणपुरक सणः पर्यावरणपुरक दिवाळी, नैसर्गिक रंगांचा वापर करून पर्यावरणपुरक रंगपंचमी, नायलॉन मांजा न वापरता पतंगोत्सव साजरा करणे, स्थानिक पारंपारिक ज्ञान व वारसा अभ्यास<br>6. जागतिक तापमान वाढ हवामान बदल: (सर्व विषय अंतर्गत जनजागृती मोहीम)<br>7. प्रदूषण :वायू प्रदूषण, हवामान बदल, पाणी आणि कचरा व्यवस्थापन, ऊर्जा संवर्धन इत्यादी विषयांवर जनजागृती मोहिमा राबविणे.<br>8. शाश्वत आणि सुरक्षित वाहतूक-जागरूकता कार्यक्रम: कार्यशाळा, मॉक ड्रिल, पथनाट्य., झेब्रा क्रॉसिंग, स्पीड ब्रेकर, ट्रॅफिक सिग्नल आणि शाळांजवळ नियुक्त केलेले पादचारी मार्ग.सुरक्षित आणि शाश्वत वाहतुक, रस्त्यावरील चिन्ह ओळखा, आपत्कालीन तयारी, आवश्यक क्रमांक जाणून घ्या<br>9. जनजागृती मोहीमः वायू प्रदुषण,पर्यावरण पूरक वाहनाबाबत जनजागृती, हवामान बदल, पाणी आणि कचरा व्यवस्थापन, ऊर्जा संवर्धन इत्यादी विषयांवर जनजागृती मोहिमा राबवविणे.<br>10. पर्यावरणपूरक जीवन शैली व पर्यावरण दिन विशेष : स्थानिक संसाधने जसे, माती, पाणी जैवविविधता, आणि ऊर्जा यांच्या सद्यःस्थितीचा अभ्यास करून त्याचे संवर्धन करणे, पर्यावरण दिवस आणि स्पर्धा: पर्यावरण दिन आणि पर्यावरण दिवसकरिता विविध स्थानिक विशिष्ट पर्यावरणीय समस्यांवर विविध स्पर्धाचे आयोजन करणे, वन्यजीव साप्ताह , जागतिक पर्यावरण दिन जनजागृती, लोकसहभागातून पर्यावरण संवर्धन व उपाययोजना घरगुती व गावपातळीवर करणे. |
| **माहिती संकलन प्रकल्प आणि सर्वेक्षण** | 1. जल व्यवस्थापनः दैनंदिन पाणी वापर मोजमाप, पाणी गळती मोजमाप (ऑडिट), **पर्जन्यमान,** पावसाचे पाणी मोजमाप अभ्यास व कृती<br>2. घनकचरा व्यवस्थापन: ओला आणि सुका कचरा विलगीकरण, विघटनशील कचरा निर्मिती सर्वेक्षण, प्लास्टिक कचरा सर्वेक्षण शाळा आणि सामुदायिक स्तरावर.<br>3. जैवविविधताः बियाणे संकलन, रोपांची संख्या, स्थानिक प्रजातींचे अनुवांशिक सर्वेक्षण,झाडांचे ऋतू अभ्यास करणे, वृक्षारोपण मोहीम, पक्षी सर्वेक्षण, फुलपाखरू-कीटक-सरपटणारे प्राणी सर्वेक्षण इ.<br>4. ऊर्जा: विद्युत मीटर व वीज बिल अभ्यास,**विद्यार्थी आणि शिक्षकांच्या प्रवास पद्धती अभ्यास, ऊर्जा कार्यक्षम उपकरणे**, घराचे ऊर्जा लेखा परीक्षण, सौर क्षमता मोजणे इ.<br>**5. शाश्वत आणि सुरक्षित वाहतूक- शाळेमध्ये येण्याजाण्या साठीची प्रवास पद्धती अभ्यास, हेल्मेट कसे कार्य करते, शाळा परिसरातील वाहतूक सुरक्षेचा अभ्यास,शालेय सुरक्षिततेसाठी विद्यार्थ्यांची जनजागृती मोहीम,** |
| **पुरावा आधारित प्रकल्प/कृती/परिणाम** | 1. जल संवर्धन उपचारात्मक कृतीः गळती नळ बदल, शोषखड्डे, पावसाचे पाणी साठवण प्रणाली, **पाणी तपासणी,** भूजल पुनर्भरण, सांडपाणी व्यवस्थापन पुनर्वापर आणि सांडपाणी शुद्धीकरणासाठी वनस्पतीचा वापर करणे (Root Zone Technology), परसबागेतील अभ्यास ), हरित शाळा व शाळेतील पाणी व स्वच्छतेबद्दल सुधारणा इकोव्हिलेज / इकोसिटी<br>2. घनकचरा व्यवस्थापनः कचरा कंपोस्टिंग, गांडूळ खत, कंपोस्टिंग मॉडेल्सची आधुनिक तंत्रे, जैविक खत निर्मिती व वापर.कुजणाऱ्या कचऱ्यापासून खत निर्मिती, इकोसॅन (इकॉलॉजिकल सॅनिटेशन)<br>3. जैवविविधताः शाळेच्या आवारात रोपांची निर्मिती करून वृक्षारोपण कार्यक्रम आयोजित करणे आणि त्यांचे संगोपन करणे, शालेय जैवविविधता रजिस्टर, गाव जैवविविधता रजिस्टर अद्ययावत करणे आपली परिसंस्थेचा / अधिवास अभ्यास ( जंगल, नदी, तलाव, गवताळ ), रस्त्याच्या लगत हरितपट्टा विकसित करणे, स्मृती वने, औषधी वनस्पती उद्यान इ.<br>4. ऊर्जा: ऊर्जा कार्यक्षम साधने आणि उपकरणे,**जळावू लाकूड फाटा अभ्यास**, बायोगॅसचा वापर,अपारंपरिक उर्जा स्रोत - सौर उर्जा व पवन उर्जाऊर्जा संवर्धन पद्धतींसाठी शालेय स्तर आणि सामुदायिक स्तरावरील पोस्टर्स,<br>5. स्थानिक स्वराज्य संस्था आणि इतर विभाग शालेय सहभागातून विद्यार्थी आणि समुदायांना सहभागी करून संवर्धन उपक्रमाची अंमलबजावणीत करू शकतात.<br>**6. शाश्वत आणि सुरक्षित वाहतूक- रस्त्यावर,काळजीपूर्वक वागा, आपण शाळेत कसे जातो, वाहतूक पद्धतींची तुलना**<br>**टीप- पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग महाराष्ट्र शासन,राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद(SCERTM) व पर्यावरण राज्य सनियंत्रण संस्थे मार्फत विकसित शिक्षक हस्तपुस्तिकेतील उपक्रम गुणांकासाठी ग्राह्य धरण्यात येतील.** |

| ५.१० | महाराष्ट्र युथ फॉर क्लायमेट ॲक्शन (MYCA) उपक्रमाद्वारे वातावरणीय बदलाबाबत तरुणांमध्ये जनजागृती | गुण २०० |
|---|---|---|

**माझी वसुंधरा अभियान, वातावरणीय बदलासाठी राज्य कृती आराखडा आणि मिशन LiFE अंतर्गत वातावरणीय कृतींच्या एकत्रीकरणासाठी तरुणांची महत्त्वपूर्ण भूमिका आहे. महाराष्ट्र युथ फॉर क्लायमेट ॲक्शन (MYCA) हा युनिसेफ महाराष्ट्र आणि डेव्हलपमेंट पार्टनर्सने तरुणांना वातावरणीयविषयक कृतींमध्ये सक्षम बनवणारा एक युवांसाठी कार्यक्रम आहे.**

| | मूल्यमापन कार्यपद्धती | गुण |
|---|---|---|
| १. | ‘द यूथ लीडरशिप फॉर क्लायमेट ॲक्शन’ या ऑनलाइन अभ्यासक्रमासाठी नोंदणी केलेल्या तरुणांची संख्या. (Relative Marking) | ५० |
| २. | ‘द युथ लीडरशिप फॉर क्लायमेट ॲक्शन’ हा ऑनलाइन अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या तरुणांची संख्या. (Relative Marking) | ५० |
| ३. | “वाय वेस्ट” YEWS ॲप्लिकेशनवर पाणी संवर्धनाची रिपोर्टिंग करणाऱ्या तरुणांची संख्या (लिटर मध्ये केलेली पाण्याची बचत) . (Relative Marking) | ५० |
| ४. | MYCA ने आयोजित केलेल्या वातावरणीय कृती कार्यशाळा/वेबिनार/परिषद/कार्यक्रमांमध्ये सहभागी झालेल्या तरुणांची संख्या. (Relative Marking) | ५० |

**आवश्यक तपशील:**

- https://www.mahayouthnet.in/ **वर** ‘द यूथ लीडरशिप फॉर क्लायमेट ॲक्शन’ या ऑनलाइन अभ्यासक्रमासाठी नोंदणी केलेल्या तरुण सहभागींची यादी.
- अभ्यासक्रम पूर्ण केल्याची प्रमाणपत्रे ‘युथ लीडरशिप फॉर क्लायमेट ॲक्शन’ अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांची यादी.
- “वाय वेस्ट” YEWS ॲप्लिकेशन द्वारे लिटर मध्ये पाण्याची बचत करणाऱ्या तरुणांची यादी.
- MYCA द्वारे आयोजित केलेल्या स्थानिक वातावरणीय कृती कार्यशाळा/वेबिनार/परिषद/कार्यक्रमांमध्ये सहभागी झालेल्या तरुणांचा तपशील. उदा. जागतिक पृथ्वी दिवस, जागतिक पर्यावरण दिवस, जागतिक जल दिवस, इत्यादी.
- सादर केलेली कागदपत्रे वैध/सुवाच्य नसल्यास, या निर्देशकासाठी कुठलेही गुण दिले जाणार नाहीत.

**SDG ४. गुणवत्तापूर्ण शिक्षण**

४.७ : २०३० पर्यंत, शाश्वत विकास आणि शाश्वत जीवनशैली, मानवी हक्क, लैंगिक समानता, शांतता आणि अहिंसेच्या संस्कृतीला प्रोत्साहन देण्यासाठी इतरांसह, शाश्वत विकासाला चालना देण्यासाठी आवश्यक ज्ञान आणि कौशल्ये सर्व विद्यार्थ्यांनी आत्मसात केल्याची खात्री करणे. , जागतिक नागरिकत्व आणि सांस्कृतिक विविधता आणि शाश्वत विकासासाठी संस्कृतीच्या योगदानाचे कौतुक करणे.







**नैसर्गिक परिसंस्थेचे रक्षण करण्याच्या महत्त्वाबद्दल नागरिकांना जागरूक करण्यासाठी प्रमोल्गेशन स्पॉट्स.**

# माझी वसुंधरा अंतर्गत जनजागृती उपक्रम





**नैसर्गिक परिसंस्थेचे रक्षण करण्याच्या महत्त्वाबद्दल नागरिकांना जागरूक करण्यासाठी प्रमोल्गेशन स्पॉट्स.**

# १. भूमी

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| | **१.१ हरित आच्छादन आणि जैवविविधता** | |
| १.१.१ | माझी वसुंधरा अभियानादरम्यान ५.० लावलेली आणि जगवलेली एकूण झाडे | • ग्रीन इंडिया मिशन – पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रालय, भारत सरकार<br>• वनमहोत्सव- महाराष्ट्र वन विभाग, महाराष्ट्र शासन तर्फे वृक्षारोपण<br>• पंचायतन वन उद्यान निर्मिती, महसूल व वन विभाग महाराष्ट्र शासन शासन, १० एप्रिल २०२३ चे शासन निर्णय<br>• बेलवन वन उद्यान निर्मिती, महसूल व वन विभाग महाराष्ट्र शासन शासन, १० एप्रिल २०२३ चे शासन निर्णय<br>• 'एक पेड़ माँ के नाम' |
| १.१.२ | जिओ- टॅगिंगसह वृक्षगणना - तयारी आणि प्रकाशन | ----------- |
| १.१.३ | रोपवाटीकांची निर्मिती | |
| १.१.४ | नवीन हरित क्षेत्रांचा विकास व देखभाल (उदा. अमृत वने, सार्वजनिक उद्याने) | |
| १.१.५ | लोकजैवविविधता नोंदवही (PBR) तयारी आणि दास्यावजीकरण | • जैव विविधता अधिनियम, २००२<br>• जैव विविधता नियम, २००४<br>• जैविक विविधता (संशोधन) अधिनियम , २०२३ |
| १.१.६ | मातीच्या माध्यमातून कार्बन सिंक करणे. | • मृदा स्वास्थ्य कार्ड योजना |

# १. भूमी

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| **१.१ हरित आच्छादन आणि जैवविविधता** | | |
| १.१.७ | बांबू/ खस/शेवगा लगवड | • राष्ट्रीय बांबू मिशन.<br>• महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी कायदा.<br>• PoCRA - नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प. (फक्त 16 जिल्ह्यांसाठी)<br>• अटल बांबू समृद्धी योजना. |
| १.१.८ | बीज संकलन केंद्र | |
| १.१.९ | शाश्वत शेती | • सेंद्रिय शेतीला चालना देण्यासाठी परमपरागत कृषी विकास योजना-केंद्रीय योजना |

# १. भूमी

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| | **१.२. घनकचरा व्यवस्थापन** | |
| १.२.१ | घनकचरा व्यवस्थापन: निर्मितीच्या ठिकाणी विलगीकरण आणि संकलन | • स्वच्छ भारत अभियान 2.0 (ग्रामीण), भारत सरकार<br>• पेयजल आणि स्वच्छता विभाग, जलशक्ती मंत्रालय, भारत सरकार<br>• राष्ट्रीय बायोगॅस कार्यक्रम<br>• गैल्वनाइजिंग ऑर्गेनिक बायो-एग्रो रिसोर्सेज धन (GOBARdhan) |
| १.२.२ | ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया | |
| १.२.३ | सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया /विल्हेवाट | |
| १.२.४ | जुन्या साठलेल्या कचऱ्यावर (Legacy Waste) शास्त्रोक्त प्रक्रिया | • वर्षानुवर्षे साठून राहिलेल्या कचऱ्याची विल्हेवाट लावण्यासाठी केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळाद्वारे मार्गदर्शक तत्त्वे<br>• SWM नियम, २०१६ च्या अनुसूची-I चे खंड 'J' नुसार<br>• स्वच्छ भारत अभियान 2.0 (ग्रामीण), जलशक्ती मंत्रालय, भारत सरकार |
| १.२.५ | प्लास्टिक कचरा व्यवस्थापन (सिंगल युज प्लास्टिकवर (SUP) बंदी) | • १ जुलै २०२२ पासून लागू केलेल्या एकल वापर प्लास्टिकच्या वस्तूंवर बंदीची अधिसूचना, भारत सरकार. G.S.R. 571 (E) दिनांक १२ ऑगस्ट २०२१<br>• महाराष्ट्र प्लास्टिक आणि थर्माकोल उत्पादने (MUSTH&S) अधिसूचना, २०१८<br>• स्वच्छ भारत अभियान 2.0 (ग्रामीण), भारत सरकार |
| १.२.६ | जैववैद्यकीय (बायो-मेडिकल) कचरा व्यवस्थापन | • जैववैद्यकीय कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ |
| १.२.७ | ई-कचरा व्यवस्थापन | • ई-कचरा व्यवस्थापन नियम, २०२२<br>• ई-कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ |
| १.२.८ | हागणदारीमुक्तीचा (ODF) दर्जा | • स्वच्छ भारत अभियान 2.0 (ग्रामीण), भारत सरकार |

# २. वायू

| अ. क्र | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
| --- | --- | --- |
| २.१ | वायू गुणवत्ता परिक्षण - पर्यावरण, वने आणि वातावरणीय बदल मंत्रालय (MoEF&CC) किंवा NABL मान्यताप्राप्त प्रयोगशाळेद्वारे | • महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ- श्रेणीबद्ध प्रतिक्रिया कृती आराखडा<br>• केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळ - वायू गुणवत्ता परीक्षणाची संकल्पनात्मक मार्गदर्शक तत्त्वे व सामान्य पद्धती<br>• राष्ट्रीय परीवेशी वायू गुणवत्ता मानक (NAAQS)<br>• **राष्ट्रीय वायू गुणवत्ता निगरानी कार्यक्रम**(NAMP) |
| २.२.१ | फटाक्यांवर बंदी घालण्याकरिता पुढाकार | --------------------- |
| २.२.२ | कृषी कचरा व्यवस्थापन (शेतातील कचरा उघड्यावर जाळणे.) | • पीक अवशेष व्यवस्थापनासाठी राष्ट्रीय धोरण (NPMCR)<br>• औष्णिक वीज प्रकल्पात इंधन म्हणून जैवभाराचा (बायोमासचा) वापर करण्यासाठी राष्ट्रीय अभियान, उर्जा मंत्रालय, भारत सरकार |
| २.२.३ | गॅस कनेक्शन | • प्रधानमंत्री उज्वला योजना, पेट्रोलियम आणि नैसर्गिक वायू मंत्रालय, भारत सरकार |

# २. वायू

| अ. क्र | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| २.३.१ | इलेक्ट्रिक वाहन (EV) धोरण : इलेक्ट्रिक वाहनांची संख्या | • महाराष्ट्र इलेक्ट्रीक वाहन धोरण, २०२१, महाराष्ट्र शासन<br>• शासन निर्णय क्रमांक: MSEVP-२०२१/CR २५/TC ४, पर्यावरण आणि हवामान बदल विभाग, महाराष्ट्र शासन<br>• इलेक्ट्रिक वाहन संवर्धन स्कीम ,२०२४ |
| २.३.२ | इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्टेशनची संख्या | |
| २.४ | ध्वनी प्रदूषण कमी करणे | • ध्वनी प्रदूषण (नियंत्रण व नियमन) नियम, २००० |
| २.५ | वातावरणीय बदल (Climate Change) - जनजागृती | *सर्वोच्च न्यायालयाने म्हटले आहे की हवामान बदलाचे परिणाम हे भारत. |
| २.६ | आपत्ती व्यवस्थापनाची तयारी | • आपदा प्रबंधन अधिनियम, २००५<br>• राष्ट्रीय आपदा प्रबंधन नीती, २००९<br>• राष्ट्रीय आपदा प्रबंधन योजना. २०१९<br>• महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन योजना |

# ३. जल

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| ३.१ | जल संसाधन संवर्धन आणि पुनरुज्जीवन | • प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजना (हर खेत को पानी), जलशक्ती मंत्रालय, भारत सरकार अंतर्गत जलस्रोतांची दुरुस्ती, नूतनीकरण आणि जीर्णोद्धार.<br>• जल युक्त शिवार अभियान, महाराष्ट्र शासन<br>• अमृत सरोवर, जल शक्ती अभियान, कॅच द रेन, २०२२<br>• महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना (MNREGS),ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार |
| ३.२.१ | सार्वजनिक इमारतींवर पावसाच्या पाण्याचे संधारण (रेन वॉटर हार्वेस्टिंग) | • कॅच द रेन: जलशक्ती अभियान, जलशक्ती मंत्रालय जल संसाधन विभाग, नदी विकास आणि गंगा पुनरुज्जीवन |
| ३.२.२ | पावसाचे पाणी झिरपणारे पाझरखड्डे | --------- |
| ३.२.३ | भूजल पुनर्भरण (विहिरी/ विंधन विहिरी) | --------- |
| ३.३ | जल अंदाजपत्रक आणि लेखापरीक्षण (वॉटर ऑडिट) | • महाराष्ट्र शासन, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, परिपत्रक क्र. RWS १००४/ CR २४/WS-०७ तारीख: २५ मे २००४<br>• केंद्रीय जल आयोग – जल लेखापरीक्षण आणि जलसंवर्धनासाठी सामान्य मार्गदर्शक तत्त्वे, २०१७ |
| ३.४.१ | जल कार्यक्षम शेती | • प्रधानमंत्री कृषि सिंचाई योजना, कृषी विभाग, भारत सरकार |
| ३.४.२ | पाणी पुरवठा व्यवस्थापन | --------- |

# ३. जल

| अ. क्र. | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| ३.४.३ | सांडपाण्याचे नियोजन | • स्वच्छ भारत अभियान ग्रामीण २.० |
| ३.५ | शाश्वत सणांचा प्रचार | • मूर्ती विसर्जनासाठी केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळाद्वारे सुधारित मार्गदर्शक तत्त्वे, २०२० |
| ३.६ | पाणथळ जागांचे संवर्धन | • पाणथळ क्षेत्र संवर्धन आणि व्यवस्थापन नियम, २०१७, पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रालय, भारत सरकार |
| ३.७ | पंचायत विकास निर्देशांक | • पंचायत विकास निर्देशांक योजना |

# ४. अग्नि

| अ. क्र | निर्देशकाचे नाव | योजना/कायदे यांची नावे |
|---|---|---|
| ४.१ | नुतनीकरणयोग्य ऊर्जा स्रोत आणि निव्वळ शून्य कार्बन उत्सर्जनाबाबत प्रसार व प्रचार | --------- |
| ४.२.१ | हरित पथदिवे | • पथदिवे राष्ट्रीय कार्यक्रम, उर्जा कार्यक्षमता सर्व्हिसेस लिमिटेड, उर्जा मंत्रालय अंतर्गत सार्वजनिक क्षेत्रातील संयुक्त उपक्रम , भारत सरकार |
| ४.२.२ | स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये अक्षय ऊर्जा प्रकल्प बसवणे | • ग्रिड कनेक्टेड रूफटॉप सौर उपक्रम, नवीन आणि अक्षय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार. |
| ४.२.३ | अक्षय उर्जेचा स्त्रोत म्हणून बायोगॅस संयंत्रे | • राष्ट्रीय बायोगॅस आणि खत व्यवस्थापन कार्यक्रम<br>• नवीन राष्ट्रीय बायोगॅस आणि सेंद्रिय खत कार्यक्रम, नवीन आणि अक्षय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार<br>• राष्ट्रीय बायोगॅस कार्यक्रम.<br>• गॅल्वनाइजिंग सेंद्रिय जैव-कृषी संसाधने धन (GOBARdhan) |
| ४.२.४ | सौर पंप | • प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा आणि उत्थान महाभियान (PM KUSUM), नवीन आणि अक्षय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार |
| ४.२.५ | विकेंद्रित सौर उर्जा संयंत्रे | • मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना २.० (MSKVY 2.0), महाराष्ट्र शासन<br>• प्रधान मंत्री किसान ऊर्जा सुरक्षा इवम् उत्थान महाभियान (पीएम कुसुम), नवीन आणि अक्षय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार. |

